# अलंकार प्रदीप



लेखक :

ग. त्र्यं. देशपांडे, एम्. ए., एल्एल्. बी.

पु. गो. निजसुरे, एम्. ए., बी. टी., टी. डी. (लंडन)

१ ऑगस्ट १९५४

मूल्य साडेतीन रुपये

— प्रकाशक —

ठाकूर आणि कंपनी लिमिटेड, अमरावती

# लेखकांचें निवेदन



अलंकारांचें स्वरूप विद्यार्थ्यांना स्पष्टपणें कळावें ही दृष्टि समोर ठेवून आम्ही प्रस्तुत ग्रंथ लिहिला आहे; अलंकारमीमांसेचा हा प्रबंध नव्हे. विद्यार्थ्यांना उपयोगी पाठ्यपुस्तक या दृष्टीनेच या ग्रंथाकडे पाहावें अशी आमची विनंती आहे.

काव्यप्रकाशांत मम्मटाने सांगितलेले अलंकार येथे विवेचनाला घेतले आहेत. मात्र त्यांचा क्रम रुय्यकाच्या अलंकारसर्वस्वाप्रमाणे, किंचित् फरक करून, ठेवला आहे. हा ग्रंथ संस्कृत व मराठी या दोन्हीहि विषयांचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना सारखाच उपयोगी होईल.

मराठींतील आजवरच्या अलंकारग्रंथांतून एक तर केवळ लक्षणें व उदाहरणें दिलेलीं आढळतात किंवा अलंकारांवरील केवळ तात्त्विक विवेचन सापडतें. केवळ लक्षणें व उदाहरणें यांवरून विद्यार्थ्यांना अलंकारांचें नीट आकलन होत नाही. तात्त्विक विवेचनांत तर अलंकारांचें ज्ञानच गृहीत धरलेलें असतें. त्यामुळे हीं दोन्हीहि प्रकारचीं पुस्तकें विद्यार्थ्यांच्या आटोक्याबाहेर जातात. शिक्षणशास्त्राच्या तत्त्वांना धरून निगमपद्धतीने अलंकारांचें विवेचन करणारा एखादा ग्रंथ विद्यार्थ्यांच्या हातीं असला तर त्यांना हा विषय सहजपणें आकलन करतां येईल असें आम्हाला अनेक वर्षांच्या अध्यापनाच्या अनुभवावरून दिसून आलें; म्हणून आम्ही हा ग्रंथ लिहिण्यास प्रवृत्त झालों.

या ग्रंथांतील विवेचनपद्धतीचें सामान्य स्वरूप असें —

१. प्रत्येक अलंकाराचें विवेचन करतांना अगोदर नेहमीच्या बोलण्यांतील व परिचयांतील कांही उदाहरणें घेऊन त्यांची उकल केली आहे.

२. त्यावरून त्यांत आढळणारे विशेष स्पष्ट करून कोणत्या प्रकारच्या व्यावहारिक अनुभवावर तो अलंकार आधारला आहे हें दाखविलें आहे व त्या त्या अलंकाराचें सामान्य स्वरूप विशद केलें आहे.

३. त्या त्या अलंकाराचा इतर अलंकारांशीं असणारा संबंध व त्यांचें साम्य–भेद इत्यादि दाखवून सोदाहरण तुलना केली आहे.

४. त्या त्या अलंकाराचा अभ्यास करतांना कोणत्या विशेष गोष्टी लक्षांत ठेवावयाच्या हें एकत्र दिलें आहे.

५. अशा प्रकारें अलंकाराचें स्वरूप पूर्णपणें उकलून दाखविल्यावर त्याचें लक्षण दिलें आहे. त्यामुळे तें तें लक्षण त्या त्या विवेचनांतून निष्पन्न झाल्याचा विद्यार्थ्याला प्रत्यय येतो व अलंकाराची संपूर्ण कल्पना स्पष्ट होते.

६. यानंतर त्या त्या अलंकाराचे भेद सांगून त्यांचा परस्परसंबंध दाखविला आहे व सुलभतेकरिता तक्त्यांचा भरपूर उपयोग केला आहे.

हें झालें अलंकारांच्या विवेचनासंबंधीं. याशिवाय विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें ग्रंथांत पुढील गोष्टी घातल्या आहेत.

१. अलंकारांची नीट कल्पना येण्यास विद्यार्थ्यांना शब्दशक्तीचें ज्ञान अवश्य असतें. म्हणून "शब्दशक्ति व अलंकार" नांवाचें एक प्रकरण प्रस्तावना म्हणून सुरुवातीस घातलें आहे.

२. अर्थालंकारांचें रुय्यकानुसार वर्गीकरण दाखविणारा एक तक्ता प्रारंभींच जोडला आहे. त्यामुळे त्या त्या वर्गांतील अलंकार परस्पर संबद्ध कसे आहेत हें विद्यार्थ्यांना कळेल. अलंकारांचें विवेचन करतांना एका अलंकारांतून दुसरा अलंकार कसा निघतो हें ठिकठिकाणीं सांगितलें आहे. त्या वेळीं या तक्त्याचा चांगला उपयोग होईल.

३. तक्त्यांतील वर्गक्रमानेच अलंकार विवेचिले आहेत व प्रत्येक वर्गाच्या शेवटी त्या त्या वर्गाचीं वैशिष्टयें दाखविलीं आहेत.

४. उदाहरणें भरपूर दिलेलीं आहेत. त्यांची निवड प्राचीन व अर्वाचीन मराठी साहित्यांतून केली आहे. विशेष म्हणजे गद्य वाङ्मयांतूनहि अनेक उदाहरणें दिली आहेत. अलंकार केवळ पद्यांतच सांपडतात अशा विद्यार्थ्यांच्या समजुतीचा निरास होण्यास त्यामुळे मदत होईल. याशिवाय प्रत्येक अलंकार-वर्गाच्या शेवटीं अभ्यासार्थ भरपूर उदाहरणें दिलीं आहेत.

५. विवेचनाच्या शेवटीं कांहीं परिशिष्टें घातलेलीं आहेत. मम्मटाने न मानलेले पण विश्वनाथादिकांनी मानलेले काही अलंकार एका परिशिष्टांत दिले आहेत. श्री. काळेले यांनी विवेचिलेल्या ' नव्या अलंकारां ' पैकी कांही नवे अलंकार एका स्वतंत्र परिशिष्टांत दिले आहेत.

अशा प्रकारें पुस्तक विद्यार्थ्यांना सर्वतोपरी उपयुक्त व्हावें अशा तऱ्हेचा प्रयत्न आम्ही केला आहे. किमतीच्या दृष्टीने सुद्धा विद्यार्थ्यांना पुस्तक परवडावें, म्हणून किमत शक्य तेवढी कमी ठेवली आहे. विद्यार्थीवर्ग या ग्रंथाचा फायदा घेईल अशी आशा आहे.

हें पुस्तक तयार करतांना आम्हाला अनेक संस्कृत व मराठी ग्रंथांचा उपयोग झाला. उदाहरणाकरिता जेथून जेथून पद्यें किंवा वाक्यें घेतली त्यांचा निर्देश तेथेच केला आहे. त्या सर्वांचे आम्ही अत्यंत ऋणी आहोंत.

पुस्तकाच्या प्रकाशनाची जबाबदारी ठाकूर कंपनीचे संचालक श्री. द. ना. ठाकूर यांनी अत्यंत आपुलकीने उचलली. तसेंच मुद्रणाच्या कामीं महेश्वर मुद्रणालयाचे व्यवस्थापक श्री. मनोहरपंत खांडेकर, श्री. वसंतराव सुळे आणि श्री. अण्णासाहेब बेनोडेकर यांचें अत्यंत साह्य झालें. या सर्वांचे आम्ही अत्यंत आभारी आहोंत.

पुस्तक छापतांना अनेक कारणांमुळे त्यांत कांही मुद्रणदोष राहण्याचा संभव असतो. त्यांपैकी एक महत्त्वाची चूक दुरुस्त करणें अवश्य वाटतें. ती म्हणजे पान सहावरील यमकाच्या व्याख्येंत तिसऱ्या ओळींत " वर्णसमूहास अर्थ असून " असें छापलें आहे ही होय. त्याऐवजीं " वर्णसमूहास अर्थ असेल तर " अशी दुरुस्ती करून वाचण्याची कृपा करावी. पुस्तक निर्दोष व्हावें अशी शक्य तेवढी काळजी घेतली आहे. तरीहि कांही दोष राहिले असणें शक्य आहे. अधिकारी वाचकांनी ते आमच्या नजरेस आणावेत अशी आमची त्यांना विनंती आहे. पुढील आवृत्तींत ते आम्ही अवश्य दुरुस्त करूं.

टिळक पुण्यतिथी
१-८-१९५४

ग. त्र्यं. देशपांडे
पु. गो. निजसुरे



# प्रस्तावना



## शब्दशक्ति आणि अलंकार

" **वाक्यं रसात्मकं काव्यम्** " विश्वनाथाने केलेलें हें काव्याचें लक्षण काव्याचें स्वरूप व त्याचें पर्यवसान या दोहोंचेंहि निदर्शक आहे. काव्य शब्दार्थमय असतें. या शब्दार्थांचें पर्यवसान रसांत होतें. शब्दार्थ प्रत्यक्ष-सिद्ध आहेत. रस अनुभवसिद्ध आहे. काव्यांत वापरले जाणारे शब्दार्थ व्यवहारांतील शब्दार्थच असतात. काव्याचा शब्दकोष वेगळा आणि व्यव-हाराचा शब्दकोष वेगळा असा प्रकार नसतो. असें असतांहि लौकिक व्यवहारांत रसाभिव्यक्ति होत नाही; काव्यांत मात्र ती होते हें कसें ? या प्रश्नाचें उत्तर शोधावयास अलंकारशास्त्र किंवा साहित्यशास्त्र प्रवृत्त झालें आहे.

### काव्याचे तीन घटक

या प्रश्नाचा विचार करतांना आलंकारिकांना असें दिसून आलें की, व्यवहारांतील शब्दार्थच जेव्हा काव्यांत येऊन रसाभिव्यक्तीला समर्थ होतात तेव्हा त्या शब्दार्थांवर विशिष्ट संस्कार झालेले असतात. हे संस्कार म्हणजे गुणालंकार होत. म्हणूनच ' गुणालंकारसंस्कृतयोरेव शब्दार्थयोः काव्य-शब्दः प्रवर्तते ' असें वामन म्हणतो. सारांश, काव्यशास्त्राचा अभ्यास करतांना आपल्याला शब्दार्थ, रस आणि गुणालंकार असे तीन विभाग दिसून येतात.

येथे एक गोष्ट मात्र लक्षांत ठेवली पाहिजे. काव्याचे हे तीन विभाग म्हणजे तीन वेगवेगळे खंड नव्हेत. या तीन गोष्टी एकत्र येतात व त्यांच्या संयोगाने काव्य निर्माण होतें असा याचा अर्थ नाही. कवि काव्यनिर्मिति करतो किंवा रसिक काव्याचा आस्वाद घेतो तेव्हा हे शब्दार्थ, हे गुणा-लंकार आणि हा रस, असा त्याचा अनुभव नसतो. काव्यनिर्मिति आणि

काव्यपरिशीलन या दोन्हीहि गोष्टींमध्ये अखंड बुद्धि व अखंड व्यापार असतो. कवीचा काय किंवा रसिकाचा काय अनुभव एकघन असतो. हा अनुभव आल्यानंतर रसिक मीमांसक जेव्हा कवीच्या अखंड निर्मिति-व्यापाराचें, आपल्या एकघन अनुभूतीचें किंवा काव्यांतून येणाऱ्या अखंड जाणिवेचें विश्लेषण करण्याचा प्रयत्न करतो तेव्हा त्याला शब्दार्थ, गुणालंकार आणि रस असे शास्त्रतः विवेच्य पण व्यवहारतः अविभाज्य ( Logically distinguishable but practically inseparable ) घटक काव्यांत दिसून येतात. " अखंड बुद्धीने काव्याचा आस्वाद घेतल्यानंतर अपोद्धार बुद्धीने आपण ही विभागकल्पना करितों " असें अभिनवगुप्त म्हणतो.

## गुण आणि अलंकार

काव्यांतील शब्दार्थ गुणालंकारांनी संस्कृत झालेले असतात असें वर सांगितलें. यापैकी माधुर्यादि गुणांचा शब्दार्थांशीं साक्षात् संबंध नाही. माधुर्य, ओज आणि प्रसाद हे रसधर्म आहेत. ते चित्तवृत्तीचे द्रुति, दीप्ति आणि विकास असे अवस्थाविशेष आहेत. ते रसाचे साक्षात् धर्म असून रसव्यंजक शब्दार्थांवर ते उपचाराने आरोपित केले आहेत. शब्दगुण आणि अर्थगुण असें केवळ उपचाराने म्हटलें जातें. उलट अलंकार हे शब्दार्थांशीं साक्षात् संबद्ध आहेत. शब्दार्थांवर संस्कार करून त्यांना रसाभिव्यक्तीला समर्थ करणें हें त्यांचें कार्य आहे. अलंकार शब्दार्थद्वाराने रसाला उपकारक ठरतात.

या अलंकारांचें सामान्य स्वरूप कोणतें, शब्दार्थांवर हे संस्कार कोणत्या प्रकारें होतात, शब्दार्थ संस्कारक्षम असतात म्हणजे काय, शब्दार्थ रसाभिव्यक्तीला कसे समर्थ होतात इत्यादि अनेक प्रश्न या ठिकाणीं उद्भवतात. त्यांचा आपण थोडक्यांत विचार करूं म्हणजे अलंकारांची पार्श्वभूमि, त्यांचें स्वरूप व त्यांचें प्रयोजन आपल्या लक्षांत येईल.

२

## शब्दबोध: अभिधा, लक्षणा, व्यंजना

शब्दाच्या अर्थबोधक शक्तीला वृत्ति किंवा व्यापार अशी शास्त्रांत संज्ञा आहे. साहित्यशास्त्रांत शब्दव्यापाराचे अभिधा, लक्षणा आणि व्यंजना असे तीन प्रकार मानले आहेत. शब्द उच्चारतांच ज्या अर्थाचा बोध होतो तो त्या शब्दाचा मुख्यार्थ होय. मुख्यार्थालाच वाच्यार्थ असेंहि म्हणतात. हा मुख्य अर्थ व त्याचा बोधक शब्द यांचा वाच्यवाचक संबंध असतो. अर्थ हा वाच्य, शब्द हा वाचक व हा संबंध ज्या वृत्तीमुळे किंवा व्यापारामुळे निर्माण होतो तो अभिधा व्यापार. उदा. 'राम' हा शब्द उच्चारतांच रघुकुलांतील एका विशिष्ट व्यक्तीचा (दशरथपुत्राचा) आपल्याला बोध होतो. येथे दशरथपुत्र ही विशिष्ट व्यक्ति आणि राम हा शब्द यांचा वाच्यवाचक संबंध आहे. येथे दशरथपुत्र हा राम या शब्दाचा मुख्यार्थ झाला. 'रामाने चौदा वर्षे वनवासांत काढलीं.', 'रामाने अयोध्येस राज्य केलें', 'रामाच्या राज्यांत प्रजा सुखी होती' इत्यादि वाक्यांत राम हा शब्द मुख्यार्थाने आला आहे.

पण आपण बोलत असतांना नेहमी मुख्यार्थानेच शब्दांचा उपयोग करतों, असें नाही. 'रामराज्य' या शब्दाचा मुख्यार्थ 'प्राचीन काळीं रामाने अयोध्येस केलेलें राज्य' हा आहे. पण आपण आजहि 'रामराज्य' असावें असें म्हणतोंच. येथे रामराज्य या शब्दाचा मुख्यार्थ घेऊन निभाव लागत नाही. येथे 'रामराज्य' म्हणजे 'रामाने केलेलें राज्य' असा अर्थ नसून 'ज्यांत प्रजा सुखी आहे असें राज्य' असा अर्थ आहे. हा अर्थ रामराज्य या शब्दाच्या मुख्यार्थाहून वेगळा आहे. पण वेगळा असला तरी मुख्यार्थाशीं तो संबंधित आहे. पूर्वी रामाच्या राज्यांत प्रजा जशी सुखी होती तशा प्रकारें सुखी प्रजा ज्या राज्यांत आहे असें आजचें राज्य—अशा सादृश्यसंबंधाने हा नवीन अर्थ मुख्यार्थाशीं संबंधित आहे. अशा प्रकारें मुख्यार्थाहून वेगळा पण त्याशीं संबंधित असा अर्थ घेऊन आपण

निर्वाह करतों. अशा अर्थाला 'लाक्षणिक अर्थ' किंवा लक्ष्यार्थ असें नांव आहे. लक्ष्यार्थाचा ज्या शब्दावरून बोध होतो त्या शब्दाला लक्षक म्हणतात. तो अर्थ व तद्बोधक शब्द यांचा लक्ष्यलक्षक संबंध असतो. हा संबंध जीमुळे निर्माण होतो तिला लक्षणावृत्ति म्हणतात.

पण साहित्यशास्त्रांत शब्दाचा आणखीहि एक अर्थ मानला आहे. त्याला व्यंग्यार्थ म्हणतात. रामाने लोकापवादावरून सीतेचा त्याग केला. त्यानंतर बारा वर्षांनी एका निरपराध शूद्र तपस्व्याचा वध करण्याचा प्रसंग रामावर आला. त्या तपस्व्यावर खड्ग चालविण्यास त्याचा हात कचरूं लागला त्या वेळीं राम म्हणतो—

"माझ्या दक्षिण हस्ता! या निरपराध शूद्र मुनीवर खुशाल खड्ग चालव. असा कचरतोस कां? निरपराध सीतेला गर्भभरावस्थेंतहि घराबाहेर लोटणाऱ्या रामाचाच तूं हात ना!"

या वाक्यांत राम या शब्दाचा अर्थ 'दशरथपुत्र' असा मुख्यार्थ नसून 'क्रूर कर्म करणारा दुष्ट' असा लक्ष्यार्थ आहे. पण वरील वाक्याची अर्थप्रतीति एवढ्यावरच थांबत नाही. या अर्थाबरोबरच सीतेला आपल्या हातून अन्याय झाला या गोष्टीची रामाला झालेली जाणीव, त्यामुळे त्याला स्वतःबद्दलचा वाटणारा तिरस्कार, इत्यादि अनेक अर्थवलयें आपल्याला प्रतीत होतात. हा अर्थ व्यंग्यार्थ होय. हा व्यंग्यार्थ राम या शब्दावरूनच ज्ञात होतो. म्हणून येथे राम हा शब्द त्या व्यंग्यार्थाचा व्यंजक होय. त्यांच्यांत व्यंग्यव्यंजक संबंध आहे. राम या व्यंजकावरून हा व्यंग्यार्थ ज्या व्यापारामुळे कळतो तो व्यंजना व्यापार होय.

## काव्यांतील विशिष्ट वृत्ति : व्यंजना

अशा प्रकारें १. शब्द—वाचक, लाक्षणिक किंवा व्यंजक असतात; २. अर्थ—वाच्य, लक्ष्य, किंवा व्यंग्य असतात; व ३. व्यापार—अभिधा, लक्षणा

किंवा व्यंजना असतात. यांपैकी अभिधा व लक्षणा इतर शास्त्रांनीहि मानल्या आहेत. पण व्यंजक शब्द, व्यंग्य अर्थ, व्यंग्यव्यंजक संबंध आणि व्यंजना व्यापार या गोष्टी साहित्यशास्त्रानेच मानल्या आहेत. किंबहुना हाच साहित्य-शास्त्राचा विशेष विषय होय, म्हणूनच मम्मट "स्याद्वाचको लाक्षणिकः शब्दोऽत्र व्यंजकस्त्रिधा–" यावर वृत्ति लिहितांना 'अत्र' म्हणजे 'काव्ये' अशी टीप देतो.

वृत्तिभेदाने शब्द वाचक, लाक्षणिक किंवा व्यंजक असतो. याचा अर्थ असा नव्हे की कांही शब्द केवळ वाचक, तर कांही केवळ लाक्षणिक, तर कांही केवळ व्यंजकच असतात. वृत्तिभेदाने तोच शब्द वाचक, लाक्षणिक किंवा व्यंजक असू शकतो. उदाहरणार्थ 'आई' हा शब्द घेऊं. आई म्हणजे जन्म देणारी स्त्री. हा आई शब्दाचा मुख्यार्थ झाला. 'रामाची आई कौसल्या' या वाक्यांत आई हा शब्द मुख्यार्थाने आला आहे. या मुख्यार्थाचा आई हा शब्द वाचक होय. उलट 'गरज' ही कल्पकतेची आई होय" ( Necessity is the mother of invention ) येथे आई शब्दाचा मुख्यार्थ घेऊन निभाव लागत नाही. येथे आई=उत्पत्तीचें कारण असा अर्थ घ्यावा लागतो. हा लक्ष्यार्थ असून येथे आई शब्द लाक्षणिक आहे. परंतु भक्त जेव्हा देवाला "आई ऽऽ" म्हणून हाक मारतो किंवा—

तूं माझी माऊली मी वो तुझा तान्हा।<br>
प्रेमे सोडी पान्हा, पांडुरंगे ॥

असें आळवतो त्या वेळीं त्याच्या 'आई', 'माऊली' या हाकेंतून द्योतित होणारी त्याची आर्तता, करुणा, ओढ इत्यादि भावना म्हणजे व्यंग्यार्थ होय. या व्यंग्यार्थाची अभिव्यक्ति करणारा आई हा शब्द व्यंजक होय. अशा प्रकारें एकच शब्द वृत्तिभेदाने वाचक, लक्षक किंवा व्यंजक होऊं शकतो.

## व्यंग्यार्थ हा काव्याचा परमार्थ

व्यंग्यार्थ हा काव्याचा परमार्थ होय. मुख्यार्थ किंवा लक्ष्यार्थ यांना काव्यांत स्थान नसतें असा याचा अर्थ नाही; काव्यांतील शब्दहि इतर वाङ्मयप्रकारांप्रमाणेच मुख्यार्थाने किंवा लक्षणेने वापरलेले असतात; पण त्याबरोबरच काव्यांत त्या शब्दांतून सहृदय वाचकाला एक वेगळाच अर्थ प्रतीत होत असतो. या वेगळ्या अर्थांतच मुख्यार्थाचें किंवा लक्ष्यार्थाचें पर्यवसान होत असतें. काव्यार्थ हा अभिधेजवळ किंवा लक्षणे जवळच न थांबतां आणखी पुढे जातो व एका वेगळ्याच अर्थांत विश्रांत होतो. शब्दार्थसाहित्याचें काव्यांतील पर्यवसान हेंच होय. यालाच आनंद-वर्धन ध्वनि किंवा व्यंग्य म्हणतो, तर कुंतक त्याला 'शब्दार्थसाहित्याचा परमार्थ' असें नांव देतो. व्यवहारांतील शब्दार्थ काव्यांत वापरले जात असतां या परमार्थाकडे धावतांना अलंकारांच्या मार्गांतून जातात. हाच शब्दार्थावरील संस्कार होय.

## अभिधेचे प्रकार

शब्दाची अभिधाशक्ति तीन प्रकारें प्रवृत्त होते. योग, रूढि आणि योगरूढि असे ते तीन प्रकार होत. पाचक, याचक, गांगेय इत्यादि शब्दांत योगाने येणारी अभिधाशक्ति आहे. या शब्दांचे अवयव केले तर मूळ धातु किंवा नाम व प्रत्यय यांचे स्वतंत्र अर्थ आणि त्यापासून बनलेल्या शब्दांचा अर्थ हें परस्परसंवादी असतात. अशा प्रकारें योगरूप अभिधेंत अवयवशक्ति असते. रूढीने येणाऱ्या अभिधेंत अशी अवयवशक्ति नसते. तेथे केवळ समुदायशक्ति असते. उदा.—मंडप, आखंडल इत्यादि शब्दांचे प्रकृति-प्रत्यय यांचे स्वतंत्र अर्थ आणि या शब्दांचे अर्थ यांचा परस्परसबंध नाही. या शब्दांना आलेला अर्थ केवळ रूढीने आला आहे. योगरूढ शब्दामध्ये योगाने आलेला अर्थ रूढीने मर्यादित झालेला असतो. 'पंकज' हा शब्द याचें उदाहरण होईल. पंकज या शब्दाचा यौगिक म्हणजे योगाने आलेला अर्थ 'चिखलांत जन्मलेलें' असा आहे. हा यौगिक अर्थ कमल, शेवाळ, कृमिकीटक या सर्वांना लागूं शकेल. पण रूढीने तो शब्द कमल या अर्थीच मर्यादित केला आहे.

## लक्षणेचें स्वरूप

आता लक्षणेचे प्रकार पाहूं. लक्षणाशक्ति ही सर्वत्र प्रवृत्त होत नाही. ज्या ठिकाणीं मुख्यार्थ घेऊन निर्वाह लागत नाही अशा ठिकाणींच लक्षणा प्रवृत्त होते. लक्षणेच्या प्रवृत्तीकरिता पुढील तीन गोष्टी असाव्या लागतात—

१. मुख्यार्थबाध—लक्षणा तेव्हाच प्रवृत्त होईल की जेव्हा शब्दाचा मुख्यार्थ घेणें अयोग्य किंवा अनुपपन्न ठरेल.

२. मुख्यार्थयोग—मुख्यार्थाचा त्याग करून जो दुसरा अर्थ घ्यावयाचा तो कोणताहि अर्थ घेऊन चालत नाही. त्याचा मुख्यार्थाशीं संबंध असला पाहिजे.

३. रूढि किंवा प्रयोजन—तशा प्रकारचा वेगळा अर्थ घेण्याची रूढी तरी असली पाहिजे; किंवा त्यामागे कवीचा कोणता तरी हेतु असला पाहिजे.

या गोष्टी उदाहरणाने स्पष्ट होतील. "तो मुलगा म्हणजे शुद्ध बैल आहे" हें वाक्य आपण घेऊं. या वाक्यांत बैल हा शब्द वाच्यार्थाने घेऊन चालत नाही. कारण मुलगा स्वरूपतः बैल असूं शकत नाही. म्हणून त्याचा अर्थ मंदबुद्धीचा, मूर्ख, कसलीहि समज नसलेला असा करावा लागतो. येथे आपण केलेला हा अर्थ आणि बैल यांच्यांत 'बुद्धिमांद्य' या धर्माच्या बाबतींत सादृश्य आहे. म्हणून येथे मुख्यार्थ व लक्ष्यार्थ यांच्यांत सादृश्य-संबंध आहे व मुलाला बैल म्हणण्यांत तिरस्कार दाखविणें हा बोलणाऱ्याचा हेतु आहे. अशा प्रकारें येथे लक्षणेला आवश्यक असलेल्या तीन्हीहि गोष्टी आहेत. ही प्रयोजनवती लक्षणा होय. कांही शब्दांच्या लक्ष्यार्थाच्या मागे रूढि असते. उ. 'पांढरा गाडीला चांगला चालतो तर काळा नांगराला चांगला चालतो' असें आपण सहज बोलून जातों. पांढरा आणि काळा हे वस्तुतः रंग होत. पण येथे पांढरा बैल व काळा बैल असे अर्थ घ्यावे लागतात, कारण मुख्यार्थ येथे अनुपपन्न होतो. मुख्यार्थ व लक्ष्यार्थ यांच्यांत येथे समवायसंबंध आहे. असा अर्थ घेण्यांत बोलणाऱ्याचा विशेष हेतु नाही; तशी रूढि आहे. ही रूढलक्षणा[1] होय.

## काव्यांतील लक्षणा प्रयोजनवती असते

काव्यशास्त्रांत प्रयोजनवती लक्षणेचा विचार केलेला आहे, रूढ लक्षणेचा नाही. याला कारण आहे. कवि काव्यामध्ये लक्षणेने शब्द योजतो त्यामागे त्याचा हेतु किंवा प्रयोजन असतें. रूढ लक्षणेंत प्रयोजन नसतें. प्रयोजन नसतें असें म्हणण्यापेक्षा त्यामागे प्रारंभीं असलेलें प्रयोजन नष्ट झालेलें असतें असें म्हणणें अधिक योग्य होईल. उदा.—कुशल शब्द हा घेऊं. कुशल या शब्दाचा मूळ अर्थ कुश तोडणारा असा आहे. कुश तोडण्या-करिता फार चातुर्य पाहिजे. त्यावरून कुशल=चतुर असा अर्थ आला. सुरु-वातीला हा अर्थ आला असेल तेव्हा त्यामागे बोलणाऱ्याचें प्रयोजन होतें. पण हें प्रयोजन हळूंहळूं नष्ट होऊन आता कुशल=चतुर असा रूढ अर्थ झाला. त्या मागील प्रयोजन आता नष्ट झालें, म्हणून तो लक्ष्यार्थ राहिलाच नाही. यामुळेच हेमचंद्र रूढ लक्षणा मानावयास तयार नाही, कारण लक्षणेला आवश्यक असणारा उपचार रूढ लक्षणेच्या बाबतींत शिल्लकच राहिला नाही. माणिक्यचंद्र तर रूढ लक्षणेला 'भ्रष्टोपचारप्रतीति' असेंच म्हणतो.

### लक्षणेचे प्रकार

प्रयोजनवती लक्षणेचें मम्मटाने असे प्रकार दिले आहेत.



उदाहरणें—

१. उपादान लक्षणा—किल्ल्यांतुन बाहेर निघाला
एकजात सरदारी भाला ॥

२. लक्षणलक्षणा—काशीक्षेत्र गंगेवर वसलें आहे.

३. सारोपा शुद्ध लक्षणा—तूप म्हणजे रूपच.

४. साध्यवसाना शुद्ध लक्षणा—एकास तूप पितांना पाहून दुसरा म्हणतो, 'तो आयुःपान करीत आहे.'

५. सारोपा गौणी लक्षणा—तो मुलगा गाढव आहे.

६, साध्यवसाना गौणी लक्षणा—त्या गाढवास हाक मार.

मागे सादृश्यावर आधारलेल्या लक्षणेचें उदाहरण दिलें आहे. सादृश्या-प्रमाणे इतर संबंधावरहि लक्षणा असूं शकते. 'तो मुलगा बैल आहे' येथे सादृश्यमूल लक्षणा आहे. तर 'तूप म्हणजे रूपच' येथे हेतुहेतुमद्भावावर लक्षणा आधारली आहे. आपण लक्षणेचे दोन मुख्य भाग करूं. (१) सादृश्यमूल लक्षणा व (२) सादृश्येतरसंबंधमूल लक्षणा. पहिल्या प्रकारास **गौणी लक्षणा** म्हणतात. दुसऱ्या प्रकारास **शुद्ध लक्षणा** म्हणतात. गौणी लक्षणेचे सुद्धा दोन प्रकार आहेत. सादृश्यसंबंधाच्या आधाराने एका वस्तूचा दुसऱ्या वस्तूवर आरोप केला असेल. ही **सारोपा गौणी लक्षणा** होय. कित्येकदा सादृश्याच्या आधारावरच वर्ण्य वस्तु मूळ स्वरूपांत प्रतीत न होतां सदृश वस्तु म्हणूनच प्रतीत होत असेल. ती **साध्यवसाना गौणी लक्षणा होय.** सारोपा लक्षणा रूपक अलंकाराचें बीज आहे, तर साध्यवसाना लक्षणा अतिशयोक्तीचें बीज आहे. वर दिलेल्या उदाहरणांत 'तो मुलगा गाढव आहे' येथे रूपक आहे, तर 'त्या गाढवास हाक मार' येथे अतिशयोक्ति आहे. शुद्ध लक्षणेचे सुद्धा आरोप किंवा अध्यवसान असूं शकतें पण तें सादृश्यालेरीज इतर संबंधावर आधारलें असतें. त्यामुळे शुद्ध सारोपा लक्षणा व शुद्ध साध्यवसाना लक्षणा

असे दोन प्रकार होतात. 'तूप म्हणजे रूपच' आणि 'तो आयुःपान करीत आहे' हीं त्या प्रकारांचीं उदाहरणें होत. **शुद्ध सारोपा लक्षणा** कार्यकारणमूल अतिशयोक्तीचें बीज होय, तर **शुद्ध साध्यवसाना लक्षणा** हेतुअलंकाराचें बीज होय. याशिवाय शुद्ध लक्षणेचे आणखी दोन भेद आहेत. लक्ष्यार्थ घेतांना कित्येकदा वाच्यार्थ लक्ष्यार्थांत अंतर्भूत झालेला असतो. येथे वाच्यार्थाचाच अधिक विस्तार होत असतो, तर कित्येकदा वाच्यार्थ टाकून दुसराच अर्थ घ्यावा लागतो. 'किल्ल्यांतून भाला बाहेर पडला.' येथे भाला या शब्दाचा भाले घेतलेले सैनिक असा अर्थ आहे. येथे मुख्यार्थ टाकला नाही. मुख्यार्थाचा विस्तार झाला आहे. अशा लक्षणेस **उपादान लक्षणा** किंवा **अजहल्लक्षणा** म्हणतात. "येथे दही ठेवलें आहे. जरा मांजराकडे लक्ष ठेव" असें मोठ्या मुलीला सांगून आई कामाला निघून जाते. आईच्या या बोलण्यांत उपादानलक्षणा असते. येथे मांजर म्हणजे नुसतेंच मांजर एवढाच अर्थ अभिप्रेत नाही. मांजराबरोबरच कावळे वगैरेहि अभिप्रेत आहेत. एवढेंच नव्हे तर त्या मुलीचा धाकटा भाऊ चोरून दही खाऊं लागला तर तोहि तेथे अभिप्रेत आहे. आपल्याला लक्षणेचें स्वरूप कळो किंवा न कळो, पण आपण ती रोजच्या व्यवहारांतसुद्धा कशी वापरतों हें यावरून कळेल. कित्येकदा लक्षणेंत मूळ वाच्यार्थाचा त्याग करून त्या ठिकाणीं दुसराच अर्थ अभिप्रेत असतो. गंगा म्हणजे गंगाप्रवाह. पण गंगेवर काशी वसली आहे या वाक्यांत गंगाप्रवाह असा अर्थ घेऊन चालत नाही. तो अर्थ टाकून 'गंगातीर' असा सान्निध्यसंबंधावर आधारलेला अर्थ घ्यावा लागतो. या लक्षणेला **लक्षणलक्षणा** किंवा **जहल्लक्षणा** म्हणतात. लक्षणेचे हे दोन प्रकार लक्षणामूल ध्वनीचे आधार होत.

## लक्षणामूल ध्वनि

काव्यांतील लक्षणा प्रयोजनवती असते. लक्षणेच्या मागे असलेलें हें प्रयोजन किंवा हेतु व्यंग्य असतो. मागे शंबुकवधाचें उदाहरण दिलें, त्यांत

'रामाचा हात' याचा दाशरथि रामाचा हात असा अर्थ नसून 'क्रूर कर्मे करणाऱ्याचा हात' असा अर्थ आहे. हा लक्ष्यार्थ होय. जो निरपराध सीतेचें निर्वासन करण्याइतका क्रूर बनला त्याने तिऱ्हाईत शंबूकाला मारण्यास कां कचरावें या प्रश्नाच्या द्वारें सीतेला झालेल्या अन्यायाची जाणीव, स्वतःबद्दलचा तिरस्कार इत्यादि अनेक गोष्टी सूचविणें हें या लक्षणेमागील प्रयोजन आहे. हें प्रयोजन म्हणजे लक्ष्यार्थ नव्हे. कारण तें प्रयोजन अभिव्यक्त होण्याकरिताच 'राम' शब्द लक्ष्यार्थाने घेतला आहे. म्हणून हें प्रयोजन व्यंग्य किंवा ध्वनि होय. या ध्वनीचा आधार लक्षणा असल्यामुळे याला लक्षणामूल ध्वनि म्हणतात.

## अभिधामूल ध्वनि

ज्याप्रमाणे ध्वनि लक्षणामूल असूं शकतो त्याप्रमाणेच तो अभिधामूलहि असूं शकतो. तो असा— भाषेमध्ये कित्येक शब्द अनेकार्थी असतात. पण विशिष्ट सान्निध्य, संदर्भ इत्यादिकांनी त्यांचा एक अर्थ प्रकृत म्हणून निश्चित होतो. उदा. 'राम' हा शब्द दाशरथि राम, परशुराम आणि बळिराम यांचा वाचक आहे. अर्जुन हा शब्द पार्थ धनंजय आणि सहस्रार्जुन यांचा वाचक आहे. पण असे त्यांचे अनेक अर्थ असले तरीहि प्रत्येक वेळीं त्यांचा एकच अर्थ प्रस्तुत असतो. जसें रामलक्ष्मण म्हटलें म्हणजे दाशरथि राम हाच अर्थ प्रकृत ठरतो. इतर अर्थ येथे प्रवृत्त होत नाहीत. रामकृष्ण म्हटलें म्हणजे बळिराम हा अर्थ येतो. भीमार्जुन यांत पांडव अर्जुन आहे तर रामार्जुन यांतील परशुराम व सहस्रार्जुन आहेत. विशिष्ट संदर्भांत प्रस्तुत ठरणारे हे अर्थ वाच्यार्थ असल्याने अभिधेने ज्ञात होतात. सारांश अनेकार्थ शब्दांची अभिधाशक्ति प्रकरण, संदर्भ इत्यादिकांनी एकाच अर्थी नियंत्रित होत असते.

पण कित्येकदा असेंहि होतें. अनेकार्थ शब्दांची अभिधाशक्ति एका अर्थी नियंत्रित झाली असतांच दुसराहि एक अर्थ मनांत तरळत जातो. उदाहरणार्थ—एक कवि पावसाचें वर्णन करतांना म्हणतो—

उन्नत प्रोल्लसद्धार कालागुरुमलीमस ।
पयोधरभराने या न होई कोण उत्सुक ॥

येथे पावसाचें वर्णन अभिप्रेत आहे. म्हणून या पद्याचा अर्थ असा--अगदी डोक्यावर आलेल्या (उन्नत), धारांचा सारखा वर्षाव करणाऱ्या (प्रोल्लसद्+धारा) व काजळाप्रमाणे काळाकुट्ट असणाऱ्या या मेघसमूहामुळे कोणाच्या मनांत उत्सुकता निर्माण होणार नाही ? हा अर्थ त्या पद्याचा प्रकृतार्थ झाला. हा वाच्यार्थ होय व येथे अभिधाशक्ति आहे. पण हें वाचत असतांच पुढील-प्रमाणे अर्थ रसिकाच्या मनांत तरळतो--उन्नत, हाराने शोभणारा ( प्रोल्लसत्+हार ) व कृष्ण चंदनाच्या लेपामुळे किंचित् काळसर दिसणारा हा (तरुणीचा) स्तनप्रदेश कोणाच्या मनाला आकृष्ट करणार नाही ? हा तरळणारा अर्थ प्रकृत नसल्यामुळे वाच्यार्थ नाही. मेघवर्णन वाचत असतां तो ध्वनित होतो, म्हणून व्यंग्यार्थ होय. हें पद्य जर संदर्भाबाहेर काढलें तर असें दिसेल की हे दोन्हीहि अर्थ परस्परनिरपेक्ष असे वाच्यार्थ आहेत. म्हणजे संदर्भाची मर्यादा नसतांना दोन्हीहि ठिकाणीं अभिधाच प्रवृत्त होते. पण येथे संदर्भाने अभिधा पावसाळयाला लागू पडणाऱ्या अर्थाच्या बाबतींत मर्यादित झाली असल्यामुळे हा तरळत जाणारा अर्थ केवळ ध्वनित होतो. अशा प्रकारें ध्वनित झालेला हा अर्थ अभिधेवर आश्रित झालेला असल्याने त्याला अभिधामूल ध्वनि असें म्हणतात. हा अभिधामूल ध्वनि दिसावयास श्लेषा-सारखा दिसतो पण त्यांच्यांत महत्त्वाचा भेद आहे. अभिधामूल ध्वनींत अभिधा एका अर्थी मर्यादित असते, पण श्लेषांत ती मर्यादित नसते. यासंबंधीं विवेचन श्लेषालंकाराच्या संदर्भांत येईल.

## शब्दवृत्ति आणि अलंकार

वर अभिधा लक्षणा आणि व्यंजना यांची स्थूल कल्पना दिली आहे. यांचा अलंकारांचें स्वरूप कळावयास फार उपयोग होतो. किंबहुना वरील गोष्टींची कल्पना असल्याशिवाय अनेक अलंकारांचें स्वरूप कळतच नाही.

या प्रस्तावनेच्या शेवटीं अलंकारांचें वर्गीकरण दाखविणारा एक तक्ता दिलेला आहे त्यावरून असें दिसेल की कांही अलंकार वाच्यावर आधारलेले आहेत तर कांही व्यंग्यावर आधारलेले आहेत. केवळ साधर्म्यमूळ अलंकार घेतले तरी त्यांत उपमा, स्मरण इत्यादि वाच्य-साधर्म्य-मूल आहेत, तर दीपक, सहोक्ति, इत्यादि व्यंग्य-साधर्म्य-मूल आहेत. रूपक, अतिशयोक्ति इत्यादींत गौणी लक्षणा आहे. लक्षणेच्या इतर प्रकारावर आधारलेले अलंकार लक्षणेच्या वेळीं मागे सांगितलेच आहेत. अप्रस्तुतप्रशंसा, समासोक्ति, पर्यायोक्त, इत्यादिकांतील सौंदर्य व्यंग्यनिष्ठ आहे, तर सूक्ष्म, उदात्त, वक्रोक्ति इत्यादि अलंकारांत तर वस्तुध्वनि प्रतीतच होतो. कोणत्या अलंकाराच्या मूळाशीं कोणत्या वृत्तीचा खेळ आहे हें त्या त्या अलंकाराच्या विवेचनांत स्पष्ट करून सांगितलें आहे.

## अलंकारांचा धर्मः वैचित्र्य आणि रसोपकारित्व

वैचित्र्य किंवा चमत्कृति हा अलंकाराचा प्रधान धर्म होय. वैचित्र्य म्हणजे चटकदारपणा. अलंकारांचें वर्गीकरण ज्या गोष्टींच्या आधारें केलें आहे त्या सर्व गोष्टी व्यावहारिक आहेत. सादृश्य, विरोध, कार्यकारणभाव, सामान्य-विशेष, परिवृत्ति इत्यादि लौकिक व्यवहारांत दिसणारे संबंधच कवीने घेतलेले असतात. पण हे संबंध घेऊन त्या द्वारें कवि ज्या गोष्टी समोर मांडतो त्यांच्या रससमर्पकतेवर अलंकारांचें वैचित्र्य अवलंबून असतें. आपण असंख्य गोष्टी जीवनांत पाहत असतों. कवि सुद्धा त्याच गोष्टी पाहत असतो. पण कवीला त्या गोष्टींत आपल्याहून नवनवीन संबंध प्रतीत होत असतात. ते आपल्यासमोर आले म्हणजे आपल्या मनाचा वेध घेतात. हेंच अलंकारांचें वैचित्र्य किंवा चमत्कृति होय. अलंकारांचें वैचित्र्य केवळ शृंगारिक गोष्टींतच असतें असें नाही. व्यवहारतः घृणास्पद वाटणाऱ्या गोष्टींतून सुद्धा कवि सौंदर्य निर्माण करूं शकतो. आपल्या समोर जर कोणी नुकताच कापलेल्या मांसाचा रक्ताने लिडबिड झालेला गोळा आणून ठेवला तर बरें

वाटणार नाही, किळस येईल. पण या गोष्टीला सुद्धा कवि कसें मनोरम स्वरूप देतो हें पुढील उदाहरणावरून दिसेल. राज्यवर्धनाचा शशांकाने कपटाने घात केला या प्रसंगाचें वर्णन बाणाला हर्षचरितांत करावयाचें आहे. हा प्रसंग बीभत्स आहे. याची पार्श्वभूमि तयार करीत असतांना सूर्यास्तवर्णनप्रसंगीं बाण म्हणतो, " सूर्य अस्तास जातांना आज अगदी लालभडक दिसत होता. त्याला पाहतांना वाटत असे की विश्वकर्म्याने आपल्या चाकावर त्याला बसवून तासल्यामुळे सूर्याचा गोलाकार मांसखंड झाला आहे व त्यांतून भळभळ रक्त वाहत आहे. " एरवी किळस आणणारी गोष्टहि या उत्प्रेक्षेंत आपल्या मनाचा चटका घेते म्हणून तींत वैचित्र्य आहे. येथे हा अलंकार अभिप्रेत रसपरिपोषाला उपकारक होत आहे म्हणूनच येथे वैचित्र्य आहे. किंवा, एक दरिद्री शिक्षक सायंकाळीं विषण्ण अवस्थेंत बसला असतां आकाशाकडे पाहतो. फिकट निळ्या आकाशांत लुकलुकणाऱ्या तारकांना पाहून त्याच्या मनांत एकदम कल्पना येते, " विटलेल्या निळ्या पातळावर निजलेलीं जणूं लेकरेंच तीं ! "— टाकाऊ, विटलेलें निळें पातळ सुद्धा येथे चित्तवेधक बनतें. या उलट, रसभंग करणारे, किंवा रसपरिपोषाला आवश्यक नसलेले उत्तम कल्पनाविलासहि रसिकाला व्यथित करतात व त्यांनी वैचित्र्यहानि होते. अशा वैचित्र्यहानीचीं उदाहरणें वाचकांना सहज शोधतां येतील.

सारांश, अलंकारांचा वैचित्र्यधर्म रसापेक्षी असतो. म्हणूनच अलंकार रसोपकारक असावा असें म्हणण्यांत येतें. अलंकाराने अपेक्षित रसाचा उठाव झाला पाहिजे. त्याला बाध येऊं नये. अलंकार हे रसाची शोभा वाढविणारे धर्म आहेत. रसाला उपकारक असणें हेंच अलंकारांचें औचित्य होय. उचित-स्थानीं अलंकार घातले तरच ते खुलतात; नाही तर रडतात. क्षेमेंद्र म्हणतो—

> कण्ठे मेखलया नितंबफलके तारेण हारेण वा
> पाणौ नूपुरबंधनेन चरणे केयूरपाशेन वा ।
> शौर्येण प्रणते रिपौ करुणया नायान्ति के हास्यता—
> मौचित्येन विना रतिं प्रतनुते नालंकृतिर्नो गुणाः ॥

मेखला व हार हे अलंकार खरे. पण मेखला गळ्यांत घातली व हार कमेरभोवती गुंडाळला तर कांही शोभावयाचे नाहीत.

## शब्दालंकार व अर्थालंकार यांचा निर्णय

वैचित्र्याला अनुलक्षून साहित्यशास्त्राने शब्दालंकार व अर्थालंकार असे भाग केले आहेत. अनुप्रास, यमक, इत्यादि शब्दालंकार होत. उपमा, रूपक इत्यादि अर्थालंकार होत. पण कांही अलंकाराला शब्दालंकार म्हणावें की अर्थालंकार म्हणावें हा प्रश्न येतो. उदाहरणार्थ श्लेष हा शब्दालंकार की अर्थालंकार? यावर साहित्यशास्त्राचें उत्तर असें—वैचित्र्य किंवा चमत्कृति हा अलंकाराचा प्राण होय. हें वैचित्र्य शब्दनिष्ठ असेल तर तेथे शब्दालंकार असतो. वैचित्र्य अर्थनिष्ठ असेल तर तो अर्थालंकार होय. पण हें शब्दनिष्ठ किंवा अर्थनिष्ठ वैचित्र्य कसें ओळखावयाचें? यावर उत्तर असें. ज्या शब्दामुळे किंवा शब्दसमूहामुळे वैचित्र्य निर्माण झालें तो शब्द किंवा शब्दसमूह काढून त्या ठिकाणीं त्याचे पर्याय घालावेत म्हणजे अर्थ तोच राहतो. अशा प्रकारें पर्याय शब्द घातल्यावर अर्थ तोच राहूनहि जर मूळ शब्दांनी आलेलें सौंदर्य नष्ट झालें तर तो शब्दालंकार होय. पण अशा प्रकारें पर्याय घालूनहि जर वैचित्र्य कायम राहिलें तर तो अर्थालंकार होय. शब्दालंकाराला शब्दपरिवृत्ति म्हणजे मूळ शब्दाचा बदल चालत नाही. शब्द बदलला तर अलंकार निघून जातो. अर्थालंकाराला शब्दाचा बदल खपूं शकतो. "शब्दपरिवृत्तिसहत्वमर्थालंकारत्वम्, शब्दपरिवृत्त्यसहत्वं शब्दालंकारत्वम्" असें या संबंधांत म्हटलें आहे.

## ग्रंथाचा हेतु आणि स्वरूप

पुढील पानांतून केलेलें अलंकारांचें विवेचन समजण्यास एवढी प्रस्तावना पुरे होईल. प्रस्तुत ग्रंथाचा हेतु काव्यालंकारांचें स्वरूप समजावून सांगणें एवढ्यापुरताच मर्यादित आहे. अलंकारांची संख्या किती असावी, ती वाढलेली कमी कशी करतां येईल, इत्यादि आज विद्वानांत चर्चिल्या

जाणाऱ्या गोष्टींचें विवेचन येथे केलें नाही. तो प्रश्न या ग्रंथांत सोडविण्याचा हेतुहि नाही. हा ग्रंथ विद्यार्थ्यांकरिता आहे; विद्वानांकरिता नाही. केवळ लक्षण व उदाहरणें सांगून अलंकारांचें स्वरूप विद्यार्थ्यांना नीट कळत नाही. प्रत्येक अलंकाराच्या स्वरूपाचा ऊहापोह करून व इतर अलंकारांशीं त्याचा संबंध दाखवून मग लक्षण व उदाहरणें दिलीं तर विद्यार्थ्यांना तीं आकलन होतात व त्यांच्या मनांत नीट ठसतात असें अनुभवानें दिसून आलें आहे. म्हणूनच आम्ही प्रस्तुत ग्रंथांत त्या पद्धतीचा अवलंब केला आहे. विवेचनाला काव्यप्रकाशांतील अलंकार घेतले आहेत. यांत हेतु असा कीं या पुस्तकाचा उपयोग काव्यप्रकाशाचे ९, १० उल्लासांचा अभ्यास करणाऱ्यासहि व्हावा. अलंकारांचा क्रम मात्र रुय्यकाच्या अलंकारसर्वस्वाप्रमाणे क्वचित् फरक करून घेतला आहे. कारण त्यामुळे अलंकारांचे पुढील तक्त्यांत दाखविल्या-प्रमाणे वर्गीकरण करतां येतें. काव्यप्रकाशाचें अध्यापन करतांना आम्हाला प्रो. सुखठणकर यांची विवेचनपद्धति अतिशय उपयोगाची वाटली, व विद्यार्थ्यांनाहि ती ग्रहण करण्यास सुलभ वाटली म्हणून त्याच पद्धतीचा आम्ही येथे अवलंब केला आहे. या शिवाय जरूर तेथे काव्यप्रकाशाच्या इतर आवृत्त्यांचाहि उपयोग केला आहे. मराठी ग्रंथांपैकी वि. वा. भिडे यांचें अर्थालंकारांचें निरूपण व ग. मो. गोरे यांची अलंकारचंद्रिका यांचा भरपूर उपयोग केला आहे. या सर्वांचे आम्ही अत्यंत ऋणी आहोंत. सामान्यतः संस्कृताचे व मराठीचे विद्यार्थी ज्या ग्रंथांवरून अलंकारांचा अभ्यास करितात, व ज्यांवरून आम्हीहि अभ्यास केला आहे, तेच ग्रंथ आधाराला घेऊन आम्ही विवेचन केलें आहे. अलंकार समजावून घेण्याच्या दृष्टीने मराठी व संस्कृत या दोन्हीहि विषयांच्या विद्यार्थ्यांना या ग्रंथाचा सारखाच उपयोग होईल. या ग्रंथाचा मर्यादित हेतु लक्षांत घेऊन पुढील विवेचनाकडे पाहिल्यास तें पुरेसें वाटावें अशी अपेक्षा आहे.

———

# अलंकारांचें वर्गीकरण

## अर्थालंकार ६०

- सादृश्यप्रतीतिमूल २६
  - भेदप्रधान २०
    - वाच्यसाधर्म्य ४
      - उपमा
      - अनन्वय
      - स्मरण
      - उपमेयोपमा
      - ४
    - व्यंग्यसाधर्म्य १६
      - पदार्थ-गत २
        - दीपक
        - तुल्य-योगिता
        - २
      - वाक्यार्थ-गत ३
        - प्रतिवस्तूपमा
        - दृष्टान्त
        - निदर्शना
        - ३
      - अतिशय-गत ४
        - व्यतिरेक
        - प्रतीप
        - सहोक्ति
        - विनोक्ति
        - ४
      - विशेषण-गत ३
        - श्लेष
        - समासोक्ति
        - परिकर
        - ३
      - गुणीभूत-व्यंग्य ४
        - अ. प्रशंसा
        - पर्यायोक्त
        - व्याजस्तुति
        - आक्षेप
        - ४
  - अभेदप्रधान ६
    - आरोप ४
      - रूपक
      - ससंदेह
      - भ्रांतिमान
      - अपह्नुति ४
    - अध्यवसाय २
      - उत्प्रेक्षा
      - अति-शयोक्ति
      - २
- विरोधमूल ८
  - विभावना
  - विशेषोक्ति
  - असंगति
  - विषम, अधिक
  - विशेष, व्याघात
  - विरोध ८
- न्यायाश्रयमूल १७
  - व्यवहारन्याय १२
    - तर्कन्याय (कार्य-कारण) ३
      - अर्थान्तरन्यास
      - अनुमान
      - काव्यलिंग
      - ३
    - लोकन्याय (गुणसारूप्य) ७
      - सम
      - अन्योन्य
      - तद्गुण
      - अतद्गुण
      - मीलित
      - सामान्य
      - प्रत्यनीक
      - ७
    - युगपद्भाव २
      - समुच्चय
      - समाधि
      - २
  - वाक्यन्याय ५
    - क्रम ३
      - यथासंख्य
      - पर्याय
      - परिवृत्ति
      - ३
    - प्रश्नोत्तर २
      - परिसंख्या
      - उत्तर
      - २
- शृंखलामूल ४
  - सार
  - कारणमाला
  - एकावलि
  - मालादीपक
  - ४
- गूढार्थमूल ४
  - स्वभावोक्ति
  - उदात्त
  - व्याजोक्ति
  - भाविक
  - सूक्ष्म
  - ५

# अलंकारप्रदीप



## शब्दालंकार

वैचित्र्य किंवा चमत्कृति आणि रसानुकूलता हे दोन धर्म अलंकारांत असले पाहिजेत ही गोष्ट प्रस्तावनेंत सांगितली. रसाला अनुकूल होईल (निदान रसहानि तरी होणार नाही) अशा प्रकारें जेव्हा शब्दनिष्ठ चमत्कृति दिसून येते तेव्हा शब्दालंकार होतो. शब्दालंकार हा शब्दनिष्ठ असतो. म्हणजे तो अलंकार विशिष्ट शब्दरचनेवरच अवलंबून असतो. त्याच अर्थाचे वेगळे शब्द वापरून तोच अर्थ सांगितला, व त्यामुळे जर शब्दचमत्कृति नाहीशी झाली तर मूळ शब्दांनी साधलेला अलंकार हा शब्दनिष्ठ अलंकार होय. उदा. "सुंदरें मन्दिरें दिव्य दामोदरें वास कीजे तिथे नित्य दामोदरें ॥" या ओळी "देखणीं तीं गृहें दिव्य तीं दालनें वास कीजे तिथे नित्य नारायणें ॥" अशा म्हटल्या तर अर्थांत फरक होत नाही. पण मूळच्या ओळींतील नादमाधुर्य निघून जातें. अर्थात् मूळ ओळींमध्ये द्, र्, इत्यादि वर्णांच्या आवृत्तीने कांहीतरी विशेष चमत्कृति निर्माण झाली आहे. तसेंच, "त्या राजाच्या राज्यांत **करग्रहण** फक्त विवाहप्रसंगींच दिसत असे." यांतील करग्रहणाच्या ऐवजी पाणिग्रहण हा शब्द घातला तर चमत्कृति निघून जाते. येथे शब्दश्लेष हा शब्दालंकार आहे. म्हणून चमत्कृति जेथे शब्दाश्रित असते तेथे शब्दालंकार होतो.

असे शब्दालंकार सहा आहेत— (१) अनुप्रास, (२) यमक, (३) श्लेष, (४) वक्रोक्ति, (५) पुनरुक्तवदाभास, आणि (६) चित्र. या अलंकारांचें आतां आपण विवेचन करूं.

# १. अनुप्रास

**रसाला पोषक अशी चमत्कृति निर्माण करणारी व्यंजनांची जेथे आवृत्ति होते तेथे अनुप्रास अलंकार होतो.** अनुप्रासामध्ये एका किंवा अनेक वर्णांचीहि आवृत्ति होऊं शकते. त्यांची रसपोषकता ही रसिकानुभवाने ठरत असते.

या आवृत्तीचे अनेक प्रकार आहेत. त्यांना अनुसरून अनुप्रासाचे पुढील प्रकार होतात—




१. **वृत्त्यनुप्रासः**—जेव्हा एका पद्यांत किंवा वाक्यांत एका वर्णाची किंवा स्वतंत्रपणें अनेक वर्णांचीहि अनेकदा आवृत्ति होते तेव्हा **वृत्त्यनुप्रास** होतो.

उदाहरणें—

( १ ) वंशी नादनटी तिला कटितटीं खोवोनि पोटीपटीं ।
कक्षे वामपुटी स्वशृंग, निकटीं वेताग्रिही गोमटी ॥
जेवी नीरतटी तरूतळवटी श्रीश्यामदेहीं उटी ।
दाटी व्योमतटीं सुरां, सुखलुटी घेती जटी धूर्जटी ॥

—वामनपंडित, वनसुधा.

वरील पद्यांत ट् हें व्यंजन अनेकवार आलें आहे, म्हणून वृत्त्यनुप्रास झाला.

( २ ) पल्यंकावरि पडला पांडुपृथापुत्र पावला पीडा; ।
वैरिविजित विक्षितवपु विमुखत्वें वीरवर वरी व्रीडा ॥

—मोरोपंत, कर्णपर्व.

वरील आर्येच्या पहिल्या ओळींत प् या व्यंजनाची अनेकवार आवृत्ति झाली आहे. तसेंच दुसऱ्या ओळींत व् व्यंजन वारंवार आलें आहे. येथेंहि वृत्त्यनुप्रास झाला.

( ३ ) विकटविपिनवाटिकेनिकट विस्तृतविटपांच्या तळीं
मंडळी मिळते टोळींतली;

—बी, ' बंडवाला '

वरील ओळींत ' व् ' आणि ' ट् ' या व्यंजनांची अनेकवार आवृत्ति झाली आहे.

( ४ ) उषःकालच्या सुगंध शीतल मृदुल मंद वाता ।
विहार कर ये पराग उधळित अवनीवर आता ।।

——बालकवि.

पहिल्या ओळींत ल् व्यंजन तीन वेळा आणि म् व्यंजन दोन वेळा आलें असून दुसऱ्या ओळींत र् व्यंजन चार वेळा आलें आहे.

( ५ ) हरभरा जिथे ये भरा शाळु सळसळते ।
वाऱ्यांत शीळ भिरभिरते ।।

—ग. दि. माडगूळकर " रानांत—"

वरील ओळींत ' ळ 'ची तशीच ' ळ 'ची अनेकवार आवृत्ति झाली आहे. म्हणून येथे वृत्त्यनुप्रास झाला.

( ६ ) तुमच्या चौदा चौकड्यांच्या राज्यांत राहून रौरवाची राणी होण्यापेक्षा दुर्दैवाची दासी होऊन दुःखांत दिवस कंठीन.

——गडकरी, एकच प्याला.

वरील वाक्यांत प्रारंभीं ' च ' नंतर ' र ' व पुढे ' द ' या अक्षरांच्या आवृत्तीने तीन वेगवेगळे वृत्त्यनुप्रास साधले आहेत.

२. **छेकानुप्रास**:—जेथे अनेक वर्णांची पद्यांत एकवारच आवृत्ति होते तेथे **छेकानुप्रास** होतो. ( छेक = चतुर. ) अशा अनुप्रासांतून चातुर्य दिसून येतें म्हणून याला छेकानुप्रास म्हणतात.

उदाहरणार्थः—

( १ ) तो शर शरागरवरसा, प**विसा** र**विसा** स्मरारि सायकसा ।
पार्थभुजांतरिं शिरला वल्मीकामाजि नागनायकसा ॥
—मोरोपंत कर्णपर्व.

या आर्येत ' वि सा ' या दोन वर्णांची एकवारच आवृत्ति झाल्यामुळे छेकानुप्रास झाला. शिवाय ' र् ' वर्णाची अनेकवार आवृत्ति झाल्यामुळे वृत्त्यनुप्रासहि साधला आहे.

( २ ) जरि य**वन**, क**वन**क**रणीं** स्म**रणीं** आणूं नको कबीर कसा ।
भक्तिवधू धरि करिं ज्या भगवज्जनकंकणांत हीरकसा ॥
—गोविंदाग्रज ' सत्कुसुमदाम '

येथे पहिल्या ओळींत ' वन ' या दोन वर्णांची एकवार आवृत्ति झाली आहे. तसेंच ' रणी ' हे वर्णहि एकदाच आवृत्त झाले. म्हणून येथे छेकानुप्रास झाला.

( ३ ) जेव्हा तोच शब्द त्याच अर्थाने वाक्यांत अनेकदा येतो, मात्र प्रत्येक वेळीं तो शब्द निराळ्या प्रकारें अन्वित झालेला असतो, तेथे **लाटानुप्रास** होतो. अशा प्रकारचा अनुप्रास वापरण्याची हौस लाट देशांतील लोकांत फार दिसून येई; म्हणून त्याला लाटानुप्रास असें नांव पडलें. यालाच शब्दानुप्रास असेंहि म्हणतात.

उदाहरणार्थः—

( १ ) देउनि सुतरत्न करीं घेउनि पतिचित्तवित्त ती गेली ।
नेत्रोदकें तिघांच्या **गंगा गंगा**तटीं नवी केली ॥
—मोरोपंत, आदिपर्व.

या आर्येत 'गंगा' हा शब्द त्याच अर्थाने पण वेगळ्या संदर्भाने आवृत्त झाला आहे.

( २ ) शारंगपाणी धरितां पाणी कशि जाशिल ग सुटून ?

—रामजोशी.

येथे 'पाणी' हा शब्द त्याच अर्थाने (पाणी=हात) पण वेगळ्या-प्रकारें जुळून पुन्हा आला आहे. म्हणून येथेहि लाटानुप्रास झाला.

( ३ ) तूं **भाग्य** अ**भाग्या**चें आशे ! कांचन अकिंचना जगतीं ।

—डॉ. वि. भि. कोलते.

येथे 'भाग्य' शब्द त्याच अर्थाने परंतु भिन्न रीतीने जुळून आवृत्त झाला आहे म्हणून 'लाटानुप्रास' झाला.

**३. श्रुत्यनुप्रास**:—अनुप्रासाच्या वरील प्रकारांत त्याच वर्णांची आवृत्ति झालेली दिसते, पण अनुप्रासाचा आणखीहि एक वेगळा प्रकार आहे. त्यांत त्याच वर्णांची आवृत्ति अपेक्षित नसते, तर एकस्थानीय वर्णांची आवृत्ति असते. म्हणजे जेव्हा एखाद्या पद्यांत कण्ठ्य, तालव्य, मूर्धन्य, दन्त्य किंवा ओष्ठ्य यांपैकी कोणत्याहि एका प्रकारचे वर्ण अनेकवार आलेले असतात तेव्हा **श्रुत्यनुप्रास** होतो. श्रुत्यनुप्रासाची गोडी कळण्यास रसिकताच पाहिजे. कारण यांतील गोडी कांहीशी सूक्ष्म असल्याने ती सुसंकृत रसिकांसच आकलन होऊं शकते. प्रसिद्ध वैदर्भी रीतींत श्रुत्यनुप्रासाचाच उपयोग दिसून येतो.

उदा.—विख्यात नामें लवली लता जे
फलावलीने लवली विराजे ।
चंद्रोदयीं घोस तिचे फुलांचे
होती विसावे अलिनी–कुलांचे ॥

—वामन पंडित, गजेंद्रमोक्ष

वरील श्लोकांत त्, द्, न्, ल्, स् या दन्तस्थानीय वर्णांची अनेकवार आवृत्ति झालेली आहे. म्हणून येथे श्रुत्यनुप्रास आहे.

## २. यमक

अलीकडील कांही थोडी मराठी कविता सोडली तर सर्वच मराठी कविता सयमक आहे; यमक अलंकार मराठी कवितेच्या अतिशय अंगवळणीं पडला आहे. अंत्य यमक हा मराठीचा नेहमीचा प्रकार आहे. यमकामध्ये त्याच वर्णांची पुनः आवृत्ति होते व क्रमहि तोच असतो; मात्र अर्थ भिन्न असतो. "देवयानी ती, देव या नीति; संततिचा, संत तिचा; प्रभाव सती, प्रभा वसती; हीं यमकाचीं कांहीं उदाहरणें देतां येतील. प्रत्येक जोडींत तेच वर्ण त्याच क्रमाने आले आहेत; पण त्यांचा अर्थ भिन्न आहे. तेव्हा यमकाची व्याख्या अशी—

**जेव्हा एखाद्या पद्यांत दोन किंवा अधिक वर्ण ज्या क्रमाने आले असतील त्याच क्रमाने त्यांची मागील स्वरासहित पुनरावृत्ति होते; आणि त्या आवृत्त झालेल्या वर्णसमूहास अर्थ असून प्रत्येक वेळीं तो अर्थ भिन्न असतो तेव्हा यमक हा अलंकार होतो.**

**यमक आणि अनुप्रास**:—अनुप्रासांत वर्णांची आवृत्ति असते, पण तीं अक्षरें सार्थ असतातच असें नाही. शिवाय अनुप्रासांत व्यंजनांचीच आवृत्ति अपेक्षित असते. उलट यमकांत आवृत्त झालेल्या वर्णसमूहाला अर्थ असतो; आणि यमकांतील आवृत्ति स्वर व्यंजनांसहित असते. लाटानुप्रासांत अशी आवृत्ति असते, पण ती त्याच शब्दाची असते. म्हणजे लाटानुप्रासांत आवृत्त शब्दांचा तोच अर्थ असतो. पण यमकांत प्रत्येक वेळीं अर्थ भिन्न असतो.

या व्याख्येप्रमाणे मराठी कवितेकडे पाहिलें तर काय दिसते ?

गीतध्वनि स्तुतिध्वनि वाद्यध्वनि पुष्पवृष्टि लक्षा या।
न पुरे ब्रह्मांड, प्रभु रुचिसहि शक्रादि दृष्टि लक्षाया ॥

येथे 'लक्षा या' आणि 'लक्षाया' हें यमक आहे. कारण यांना अर्थ असून प्रत्येक वेळीं तो भिन्न आहे. पण—

पत्नी सखी सचिवहि मम तूं मनोज्ञ ।
शिष्या मदीय प्रिय तूं ललितांत सुज्ञ ।

—भाषान्तर.

येथे यमक आहे असें जरी आपण म्हणत असलों, तरी वरील व्याख्येप्रमाणे यमक नाही. कारण आवृत्त झालेल्या अक्षराच्या आधींचा स्वर एकच नाही.

**शुद्ध आणि अशुद्ध यमक**:—अंत्य यमक ही मराठी काव्याची प्रकृति आहे असें म्हटलें तरी चालेल. म्हणून त्याबद्दल अधिक लिहिलें पाहिजे. ज्या दोन किंवा अधिक अक्षरांचें यमक साधावयाचें असेल त्यांच्या आधीचा स्वर तोच असला पाहिजे. यमकांतील अक्षरें तींच व त्याच क्रमाने आलीं असलीं पाहिजेत आणि यमकाचा अर्थ भिन्न असला पाहिजे. या तिन्ही अटी पाळल्या तर तें यमक शुद्ध होय. पण यांपैकी एखादी अट मोडली तर तें अशुद्ध यमक होय. उदाहरणार्थ—

शुद्ध यमकें—कुलगीतें, मुलगीते; उद्धत रे, शुद्ध तरे; चांगले काने, आंग लेकाने.

अशुद्ध यमकें—ताक, एक; डौल, कमल; रामचंद्र हो, श्रीकृष्ण हो.

## यमकाचे प्रकार.

(१) **अंत्य यमक**:—दोन चरणांच्या अंतीं त्याच क्रमाने अक्षरांची पुनरावृत्ति झाली असतां अंत्ययमक होतें. ( अर्थात वरील विवेचनांत सांगितल्याप्रमाणे आवृत्त झालेलीं अक्षरें भिन्न अर्थाने यावीं लागतात. )

दृगें मळकट झाकोनि चंद्रिकेला ।
तिच्या केलें उद्विग्न चांदण्याला ॥
हास्यलहरींनी फोडुनी कपाट ।
प्रकाशाचे वाहवी शुद्ध पाट ॥

—बी, माझी कन्या.

वरील श्लोकांतील पहिल्या दोन चरणांच्या शेवटी ‘ ला ’ हें समान अक्षर असलें तरी तेथे यमक मानतां येत नाही. कारण आवृत्त झालेल्या

अक्षराच्या मागील स्वर भिन्न आहे. तिसऱ्या व चौथ्या ओळींत दोन अक्षरांचें यमक आहे. आवृत्त झालेल्या 'पाट' या दोन अक्षरांच्या आधी 'अ' हा स्वर प्रत्येक ठिकाणीं असल्यामुळें हें दोन अक्षरांचें यमक झालें. अंत्य यमक एकाक्षरी असल्यास त्यांत मौज नसते, परंतु आवृत्त झालेल्या अक्षरांची संख्या जितकी अधिक तितकी शब्दचमत्कृति जास्त दिसते.

( १ ) तीन अक्षरी यमकाचें उदाहरण पाहा:—

सदैव अपराध मी रचितसे असे **कोटि, गा !**
स्वयेंचि कथितों, नसे तिळहि लाज, मी **कोटिगा.**

—मोरोपंत.

( २ ) चार अक्षरी यमकाचें उदा:—

संतोषतो नंद-कु**मार साचा ।**
बाळांत तैशा पर**मा रसाचा ।**

—वामन

स्वर्गद्वार उघडलें, हें दुर्लभ पुण्यपर्व; **कां मरणीं ।**
भ्यावें ? त्यजितां नश्वर वपु, साधति नित्य सर्व **काम रणीं ।।**

—मोरोपंत.

( ३ ) सहा अक्षरी यमक पाहा:—

तो सुरेंद्रहि **तुला नत याची ।**
हा असो वर **तुला न तयाची ।।**

—रघुनाथ पंडित

वरील दोन चरणांत सहा अक्षरी यमक असून तीं अक्षरें त्याच क्रमानें पण भिन्न अर्थानें आवृत्त झालीं आहेत. (तुला नत याची=तुला नम्रपणें प्रार्थना करतो; तुला न तयाची=त्याला तुलना नाही.)

२. **आदियमक**:—जेव्हा एखाद्या पद्यांतील दोन ओळींच्या प्रारंभीं यमक असतें तेव्हा त्यास आदियमक म्हणतात. मराठी कवितेंत अन्त्ययमक सर्रास आढळतें, पण आदि यमक क्वचितच आढळतें.

**अश्वत्था मागावा** वर पूजुनि, परि नव्हे भला मुंजा ।
**अश्वत्थामा गावा, कीं** तो गुरु, खंडिजेचि शरपुंजा ॥

—मोरोपंत.

प्रस्तुत आर्येत सहा अक्षरांचें आदियमक साधलेलें आहे. प्रथम व तृतीय पाद यांच्या यमकास **संदंश यमक** म्हणतात. वरील उदाहरण संदंश यमकाचेंहि होऊं शकतें.

३. **दामयमक**:—एका चरणाचा अन्त व दुसऱ्या चरणाचा प्रारंभ जर यमकाने जोडलेला असल तर दामयमक होतें. (दाम = माला, हार).

मान्य कसा न मला हो गोरा जरि होय हीन कुं**भार** ।
**भार** जयाचा प्रभुवर वंद्य मला रोहिदास चां**भार** ॥

—गोविंदाग्रज, सत्सुमदाम.

येथे 'भार' या दोन अक्षरांचें अन्त्ययमक आहे. शिवाय पहिल्या ओळीचा शेवट व दुसऱ्या ओळीचा प्रारंभ त्याच दोन अक्षरांनी साधला आहे. म्हणून येथे दामयमक झालें. एका चरणाचा शेवट व दुसऱ्याचा प्रारंभ याप्रमाणे दोहोंपेक्षाहि अधिक चरणांत यमक साधलें असल्यास त्यांत जास्त मौज दिसते. उदाहरणार्थः—

श्रीपति झाला दशरथ-सुत राम दशाननासि **माराया** ।
**मा राया** जनकाची होय सुता त्रिजगदाधि **साराया** ।
**साराया** प्रभुची हे लीला गाती सदवहां **सु-कवी** ।
**सुकवी** भवजलनिधितें, निरुपमसुख रसिक जनमनीं **पिकवी** ॥

—मोरोपंत.

४. **संदष्टकयमक**:—पद्याचें द्वितीय चरण व चतुर्थ चरण एकरूप असल्यास **संदष्टक यमक होतें**.

तुजाविण न दीपिके ! सति ! **कृष्णे ! तरतो नयज्ञहि तमाते ।**
करितों जरि तरि गमता **कृष्णेतर तो न यज्ञ हित मातें ।।**
—मोरोपंत, वनपर्व

आणखी एक उदाहरण पाहा:—
कुरु सैन्यांत गमे ज्या-**परि रंभा काननांत वारा हो ।**
त्या विजयश्री देऊनि **परिरंभा कां न नातवा राहो ।।**
—मोरोपंत.

५. **समुद्गकयमक**:—पद्याच्या प्रथमार्धाची आवृत्ति द्वितीयार्धात झाली असल्यास **समुद्गक यमक** होतें. उदाहरणार्थ:—

अनल समीहित साधी राया वारा महीवरा कामा ।
अनलस मीहि तसा धीरा यावा रामही वराका मा ।।
—मोरोपंत.

या आर्येतील पूर्वार्ध व उत्तरार्ध एकरूप आहेत म्हणून येथे समुद्गक यमक झालें.

**समुद्गक** यमकाचें आणखी एक उदाहरण:—
सुरसाधरावरी ते शिवा सकुतुका गिरीशजा या हो ।
सुरसाधरा वरीते शिवास कुतुका गिरीशजाया हो ।।
—राधारमण.

६. **युग्मकयमक**:—प्रथम चरणाचें द्वितीय चरणाशीं आणि तृतीय चरणाचें चतुर्थ चरणाशीं यमक साधलेलें असल्यास त्यास **युग्मक** यमक म्हणतात. उदाहरणार्थ:—

**हरित सन्नगमंडन मानस ।**
**हरित—सन्नगमंडन—मानस ।।**
**सुरस—सारस—सार—समाकुल ।**
**सुरस—सार ससारस मा—कुल ।।**
—राधारमण.

७. **पंक्तियमक**:—श्लोकांतील चारहि चरण एकरूप असल्यास **पंक्ति** नामक यमक होतें. उदाहरणार्थः—

धरा धराया महती स–मान ।
धरा धरा या मह तीसमान ॥
धरा धरायाम–हतीस मान ।
धराधरा या महती स्मा न ॥

—राधारमण.

८. **महायमक**:—पहिला श्लोक व दुसरा श्लोक एकरूप असून अर्थदृष्ट्या भिन्न असतो तेव्हा **महायमक** होतें, उदाहरणार्थः—

साधुनी पवना योगी रमे पद्मानिषेवणीं ।
पवमानजन ध्यात माधवास वसे वनीं ॥
साधु–नीप–वनाऽयोगी रमे पद्मानिषेवणी ।
पवमान जनध्यात माधवाऽसत–सेवनीं ॥

——साधुदास, वनविहार.

९. **चरणमध्ययमक**:–पद्याच्या कोणत्याहि एका चरणामध्ये कोठेहि तींच अक्षरें त्याच क्रमाने पुन्हा आल्यास **चरणमध्ययमक** होतें. याचे दोन प्रकार आहेत. आवृत्त झालेलीं अक्षरें पहिल्या अक्षरांस जोडून येतात तेव्हा '**संयुतावृत्ति यमक**' असें म्हणतात, आणि आवृत्त झालेलीं अक्षरें एकमेकांस जोडून येत नाहीत, म्हणजे आवृत्त अक्षरसंघांमध्ये दुसरीं कांहीं अक्षरें आलेलीं असतात, त्या वेळीं **असंयुतावृत्ति यमक** होतें.

( अ ) ग**जगती जगती**प्रति दाविते। व**सुमती सुमती** सुख भाविते।
**स्वतनुजा तनु** जाणतसे धरा । **नवरि ते वरिते** मणिकंधरा ॥

यांत आवृत्त अक्षर एकमेकांलगत आहेत. म्हणून येथे **संयुतावृत्ति यमक** झालें.

आणखी एक उदाहरण पाहाः—

( आ ) चपळ तो पळतो उदकावरी । उखळतो खळतो हरि आवरीं ।
कुलपती लपती फणि ते किती । भुजगती जगती तळ टाकिती ॥

( इ ) पण्डित करिती अखण्डितपणें मण्डित वाक्संसारा ।

—रे. टिळक.

वरील ओळींत ‘ ण्डि ’ हें जोडाक्षर अनेकवार आवृत्त झालें असून तें एकमेकांस जोडून आलें नाही; त्या अक्षरामध्ये इतर अक्षरें आलेलीं आहेत, म्हणून असंयुतावृत्ति ( चरणमध्य ) यमकाचें हें उदाहरण होय.

आणखी एक उदाहरण पाहाः—

( ई ) राधापुत्र बहु करी बाधा पार्थासि; तेधवा त्याला ।
राधाहृच्चोर म्हणे, बा ! धाक प्राप्त कां तुला झाला ! ॥

—मोरोपंत.

येथे ‘ धा ’ हें अक्षर पूर्वस्वरासह चारी चरणांच्या प्रारंभीं आवृत्त झालें आहे. हेंहि असंयुतावृत्ति यमकाचें उदाहरण होय.

१०. अश्वधाटीयमकः--यमकाच्या पूर्वी आणि नंतर निराळें व्यंजन असून तें यमक अनेकवार आवृत्त झालें असल्यास त्याला अश्वधाटी यमक म्हणतात. अश्वाच्या विशिष्ट गतीप्रमाणे याची धाटणी असते. उदाहरणार्थ—

( अ ) वाजत गाजत साजत आज तया जतन करुनि आणा हो ।
मज मागे मत्स्यांचा हा रिपु—शशि—राहु—बाहु राणा हो ॥

—मोरोपंत.

वरील आर्येत पांच ठिकाणीं अश्वधाटी यमक आहे.

( आ ) न दिसे अग नग मग तग गगनीं खगनीच काय काढील ! ।
चित्तीं म्हणे समय हा मज काळाच्या मुखांत वाढील ॥

—मोरोपंत.

वरील आर्येच्या प्रथमार्धांत सहा ठिकाणीं अश्वधाटी यमक आहे.

११. **पुष्पयमकः**—वृत्ताच्या चरणांत यतीवर, म्हणजे विरामस्थानीं यमक असल्यास त्याला **पुष्पयमक** म्हणतात.

सुसंगति सदा **घडो**, सुजनवाक्य कानीं **पडो** ।
कलंक मतिचा **झडो**, विषय सर्वथा **नावडो** ।
सदंघ्रिकमळीं **दडो**, मुरडितां हटाने **अडो** ।
वियोग घडतां **रडो**, मन भवच्चरित्रीं **जडो** ।।

—मोरोपंत.

हा श्लोक पृथ्वीवृत्तांत असून त्या वृत्तांतील आठव्या व चरणान्तींच्या अक्षरांवर यति असतो. वरील श्लोकांतील प्रत्येक चरणाच्या आठव्या व चरणान्तीच्या अक्षरांवर यमक साधलें आहे. म्हणून त्या चारी चरणांत पुष्पयमक झालें.

यमकाचे मुख्य मुख्य प्रकार वर दिले आहेत. यमकें जोपर्यंत सुटसुटीत असतात तोपर्यंतच त्यांच्यांत मौज असते. परंतु कवीला यमकांचा हव्यासच लागला तर मग यमकापायीं क्लिष्टत्व निर्माण होतें. उदाहरणार्थ, पंक्ति व महायमक यांचीं उपरिनिर्दिष्ट उदाहरणें पाहा. यमकाचा हव्यास कोणत्या थराला जाऊं शकतो हें पुढील उदाहरणांवरून सहजच लक्षांत येईल—

वीराजते मत्त उदार पाहें वीरा धरीं शक्तिशराव साहें; ।
हें सावरा शक्ति शरीं धरावी हें पारदां उत्तम तेजरावी ।।

—विठ्ठल, रुक्मिणीस्वयंवर.

येथे **प्रतिलोम यमक** साधलें आहे; म्हणजे कवितेच्या पूर्वार्धांतील अक्षरें उलट क्रमाने वाचलीं कीं उत्तरार्ध सिद्ध होतो. आता दुसरें उदाहरण पाहा—

मराळगमनी मनीषिणि सवें
सवें उपरमे रमे मन जवें, ।
जवेंकरुनि घे निघे स्तुति करी,
करींद्रगति ये तिये शचिघरीं ।।

—विठ्ठल, रुक्मिणीस्वयंवर.

वरील श्लोकांतील अक्षरांकडे बारकाईने पाहिल्यास त्यांत मध्य, दाम, अन्त्य मिळून नऊ यमकें आढळतील. याला पादान्तमध्यदामयमक म्हणतां येईल. यमकाच्या हव्यासामुळे काव्य कसें दुर्बोध होतें हें कळण्यास वरील दोन श्लोकांचे मासले पुरेसे आहेत.

## ३. श्लेष

" शूद्रकाच्या राज्यांत चित्रामध्ये वर्णसंकर, विवाहाच्या वेळीं करग्रहण, आणि यतींच्या हातीं दण्ड दिसत असे." या वाक्यांत श्लेष आहे कारण वर्ण, कर आणि दण्ड हे शब्द श्लिष्ट आहेत.

श्लेषांत एका शब्दाचे दोन अर्थ होतात असें आपण म्हणतों. वर वर बोलतांना हें चालतें. पण शास्त्रीय दृष्टीने असें म्हणणें बरोबर नाही. वरील वाक्यांत वर्ण या शब्दाचे दोन अर्थ नाहीत. रंग या अर्थी ' वर्ण ' असा एक शब्द आहे व ब्राह्मणादि वर्ग या अर्थी वर्ण हा दुसरा शब्द आहे. या शब्दांचा उच्चार सारखा असल्याने हे दोन शब्द एक आहेत असे वाटतें.

पण याहीपेक्षा पुढील उदाहरणावरून हें अधिक स्पष्ट होईल. "औषध नलगे मजला" हें दमयंतीचें वाक्य श्लेषाचें प्रसिद्ध उदाहरण आहे. "नलगे" याचे दोन अर्थ होतात असें आपण म्हणतों. पण ' नलगे ' याचे दोन अर्थ व्हावयाला तो शब्द तरी आहे का ? ' नलगे ' हा कांहीं शब्द नाही. तर " न–लगे " असा एक शब्दसमुच्चय आहे. आणि ' नल–गे ' असा दुसरा शब्दसमुच्चय आहे. अशा प्रकारें ते दोन वेगवेगळे शब्दसमुच्चय असून प्रत्येकाला एकच अर्थ आहे. पण त्यांच्यांत असणाऱ्या उच्चार सादृश्या-मुळे ते एकच वाटतात आणि एकाचे दोन अर्थ आहेत असें आपल्याला भासतें. " नलगे " या उच्चाराचे प्रत्येक वेळीं वेगवेगळ्या प्रकारें भाग करावे लागल्याने आपल्याला हें शास्त्राचें म्हणणें पटेल. वर्ण, दंड किंवा कर यांचा असा भंग करावा न लागल्याने त्या उदाहरणाने आपल्याला तें पटलें नाही. पण तेथेंहि हेंच तत्त्व आहे.

म्हणून श्लेषाचा अर्थ आपल्याला असा करावा लागेल—

वेगळ्या वाच्याचा किंवा पदार्थाचा वाचक शब्द भिन्न असतो. असे वेगळे शब्द भाषणामध्ये एकदम उच्चारले गेले म्हणजे ते एकमेकांत मिसळतात व एकरूप भासतात. असें जेथे होतें तेथे श्लेष असतो. (श्लिष् = एकमेकांत मिसळणें, आलिंगन देणें, एकरूप भासणें.) शब्दांच्या या मिसळण्यामुळे त्यांच्यामधील भेद दिसत नाही; आणि एकाच शब्दाचे दोन अर्थ आहेत असें वाटतें.

## श्लेष हा शब्दालंकार आणि अर्थालंकार.

शब्दालंकार आणि अर्थालंकार यांचें निर्णायक तत्त्व कोणतें याचें विवेचन प्रस्तावनेंत केलें आहे. तें लक्षांत घेतलें म्हणजे श्लेष हा शब्दालंकार आणि अर्थालंकारहि कसा होऊं शकतो हें कळेल. पद्यामध्ये जे शब्द श्लिष्ट आहेत ते काढून त्याच अर्थाचे दुसरे शब्द घातले आणि त्यामुळे श्लेष नाहीसा झाला तर तो शब्दाश्रित श्लेष होय. उलट समानार्थक दुसरा शब्द योजूनहि श्लेष कायम राहिला तर तो अर्थाश्रित श्लेष होय. श्लेष जेव्हा केवळ शब्दाश्रित असतो तेव्हा तो शब्दाचा बदल सहन करीत नाही. म्हणजेच तो शब्दपरिवृत्ति सहन करीत नाही. अर्थाश्रित श्लेष असला तर त्याला शब्दपरिवृत्ति चालते. जेव्हा श्लेषाला शब्दपरिवृत्ति चालत नाही तेव्हा तो शब्दाश्रित असल्याने शब्दालंकार होय, आणि जेव्हा त्याला शब्द-परिवृत्ति चालते तेव्हा तो अर्थाश्रित असल्याने अर्थालंकार होय. "नलगे औषध मजला" किंवा वर्ण, कर, दण्ड, येथे शब्द बदलल्यास श्लिष्ट अर्थ राहात नाही. म्हणजे येथे श्लेषाला शब्दाची परिवृत्ति सहन होत नाही म्हणून येथील श्लेष शब्दालंकार होय. उलट—

"तूं मलिन, कुटिल, नीरस, जडहि पुनर्भवपणेंहि कचसाच
धरिला शिरीहि न स्वप्रकृतिगुण त्यजिसि नाम कच साच"

या पद्यांतील मलिन, कुटिल, नीरस, जड, पुनर्भव, हे शब्द बदलून समानार्थी दुसरे शब्द वापरले तरीहि श्लिष्ट अर्थ नाहीसा होत नाही म्हणून येथे अर्थश्लेष आहे व हा अर्थालंकार आहे.

## सभंगश्लेष आणि अभंगश्लेष

" नलगे औषध मजला " याचे दोन अर्थ करतांना ' नल—गे; ' आणि ' न—लगे ' असे वेगवेगळे तुकडे पाडावे लागतात. "जो पूतनामारण" लब्धकीर्ति " असे राम आणि कृष्ण यांचें एकत्र वर्णन केलें आहे. रामाकडे हा शब्द लावतांना ' पूतनामा ' आणि ' रणलब्धकीर्ति ' अशी फोड करावी लागते. तर कृष्णाकडे तो शब्द ' पूतनामारण लब्धकीर्ति ' अशी फोड करावी लागते, दोहींकडे अर्थ लावताना श्लिष्ट शब्दाचे जेव्हा वेगवेगळे तुकडे करावे लागतात तेव्हा त्याला **सभंगश्लेष** म्हणतात. पण वर्ण, दंड, कर, यांच तसे तुकडे करावे लागत नाहीत. तुकडे न करतांच दोहीकडे अर्थ लागतो तेव्हा त्याला **अभंगश्लेष** म्हणतात. शब्दश्लेषालंकार हा सभंग व अभंग अशा दोन्हीहि प्रकारचा असू शकतो. अर्थश्लेषालंकार मात्र अभंग-श्लेषच असू शकतो. श्लेषाचें स्वरूप थोडक्यांत असें दाखविता येईल.



शब्दश्लेषाचीं विशेष अंगें अशीं:—

१. भिन्न वाच्यांचे वाचक भिन्न शब्द एकदम उच्चारल्यामुळे एकरूप वाटतात तेव्हा श्लेष होतो.

२. हा श्लेष शब्दाश्रित असला तर शब्दश्लेष अलंकार होतो.

३. शब्दश्लेष शब्दाची परिवृत्ति सहन करीत नाही.

४. शब्दश्लेष सभंग किंवा अभंग असूं शकतो.

व्याख्या:—

**भिन्न वाच्यांचे वाचक भिन्न असतांहि उच्चारामुळे जेव्हा एकरूप वाटतात तेव्हा श्लेष होतो आणि हा श्लेष शब्दाश्रित असला तर शब्दश्लेष अलंकार होतो.** याचे दोन प्रकार आहेत. सभंग श्लेष व अभंग श्लेष. (अर्थश्लेषाचें विवेचन अर्थालंकारांत केलें जाईल.)

उदाहरणें—

म्हणोनि कवितासुता तुज समर्पितों; साजरी—
नसे बहुतशी गुणी, कनकपीतवासा, जरी—
तरी न इतरा वरी, हरि, करीं इला किंकरी;
मयूरहि निजात्मजाग्रहविमुक्त, जैसा करी.

—मोरोपंत, केकावलि.

चतुर्थ चरणांतील ‘ निजात्मजाग्रह ’ या सामासिक शब्दाचीं पदें दोन प्रकारें पाडतां येतात—

(१) निजात्मजा + आग्रह (२) निजात्मजा + ग्रह. पहिल्या प्रकारें पदच्छेद केल्यास—‘परमेश्वरास वरण्याबद्दल काव्यकन्यकेचा जो आग्रह आहे त्यांतून (तुम्ही तिचा स्वीकार करून) मला मोकळें करा. असा अर्थ लावतां येतो; व दुसऱ्या पदच्छेद प्रकारांत ‘कन्यारूप ग्रहापासून म्हणजे नक्रापासून (तिचा स्वीकार करून) या मयूराची मुक्तता करा’ असा अर्थ निघूं शकतो.

येथे गजेंद्रमोक्षाचें आख्यान लक्षांत घेतलें म्हणजे या श्लेषाचें स्वारस्य कळतें.

वरील उदाहरणांत एकाच सामासिक शब्दांतून भिन्न अर्थ निघाले, परंतु ते अर्थ काढण्यासाठी वेगवेगळ्या प्रकारें शब्दांची फोड करावी लागली, म्हणून हें सभंग श्लेषाचें उदाहरण होय.

( १ ) म्हणे वरुनि जग दिसतें सुंदर
'राम' जाणतो 'क्या है अंदर'
स्मशानांतलें गाणें सत्वर
अमोल म्हणुनी टाकी उधळुनि चहूंकडे जगतांत !

—गोविंदाग्रज, 'स्मशानांतलें गाणें'

वरील कडव्यांतील 'राम' शब्दाचे (१) राम (गणेश गडकरी) व (२) रामचंद्र (परमेश्वर) असे दोन अर्थ संभवतात म्हणून येथे श्लेष आहे. एकच शब्द, त्याची फोड न करतां, श्लिष्ट असल्यामुळे येथे अभंग श्लेष झाला.

(२) शुकभाषणानुकार प्रेमें करितो मयूर हें चित्र ।

—— मोरोपंत

येथे 'शुक' व 'मयूर' हे शब्द श्लिष्ट आहेत.

शुक = १ पोपट, २ शुकमुनि; मयूर = १ मोर, २ मोरोपंत.

पर्यायशब्द योजल्याने त्यांतील श्लेष नष्ट होतो म्हणून हेहि शब्द-श्लेषाचें उदाहरण होय.

(३) हे मेघा, तूं सर्व लोकांना **जीवन** देतोस.

या वाक्यांतील 'जीवन' हा शब्द श्लिष्ट आहे. जीवन म्हणजे पाणी किंवा प्राणधारणा यांपैकी कोणताहि अर्थ येथे लागू पडतो. तथापि जीवन शब्दाऐवजी जल, नीर, अंबु इत्यादि शब्द येथे घातल्यास श्लेष नष्ट होतो, म्हणून हें शब्दश्लेषाचें उदाहरण होय.

# ४. वक्रोक्ति

वक्रोक्ति --म्हणजे चमत्कृतिजनक किंवा चकित करून सोडणारें बोलणें. पुढील उदाहरण पाहा—

एकदा शंकराने पार्वतीला दार उघडायला सांगितलें.

तिने विचारलें—" कोण आहे ? "

शंकर—ओळखलं नाहीस का ? मी नीलग्रीव आहे. "

पार्वती—' कोण मोर का ? कां उगाच ओरडतोस ? "

शंकर—अग, मोर नाही. मी कालकूटधर आहे "

पार्वती—मग पाताळांत जा. सर्पाचे येथे काय काम ? "

येथे शंकर एका अर्थाने शब्द वापरतो व पार्वती त्यांचा दुसरा अर्थ घेते. दुसरें उदाहरण– लक्ष्मी आणि पार्वती यांचा संवाद चालू आहे.

लक्ष्मी—" काय पार्वतीबाई, आज भिक्षा कोठून येणार ? "

पार्वती—" बळीच्या घरून. "

लक्ष्मी—" म्हटलं आज नृत्याचा कार्यक्रम कुठे ? "

पार्वती—' वृंदावनांत. '

शंकर भिकारी आहे व तो तांडवनृत्य करतो याला अनुलक्षून लक्ष्मी विचारते, आणि वामनावतारीं विष्णूने बळीला जागा मागितली आणि कृष्णावतारीं रासनृत्य केलें याला अनुलक्षून पार्वतीने उत्तर दिलें. अशा बोलण्याला वक्रोक्ति म्हणतात. ही वक्रोक्ति श्लेषावर आधारली आहे. पण कित्येकदा ही केवळ उच्चार बदलून सुद्धा होऊं शकते. स्वरभेदाने अर्थभेद होण्याचीं उदाहरणें नाटकांत विपुल सांपडतात. म्हणून वक्रोक्तीचें लक्षण असें—

**" बोलणारा जेव्हा एका अर्थाने शब्दयोजना करतो पण ऐकणारा त्यांतून वेगळाच अर्थ काढून बोलणारास व आपणासहि चकित करून सोडतो तेव्हा वक्रोक्ति हा अलंकार होतो. "**

याचे दोन भेद आहेत. श्लेषवक्रोक्ति आणि काकुवक्रोक्ति.

## श्लेषवक्रोक्ति.

बोलणाऱ्याच्या भाषणांतील श्लिष्ट शब्दांच्या उपयोगामुळे जेव्हा ऐकणारा त्याचा वेगळाच अर्थ करतो तेव्हा श्लेषवक्रोक्ति हा प्रकार होतो.

या वक्रोक्तींत वापरलेला श्लेष हा जर अर्थश्लेष असेल व त्यावरून वक्रोक्ति साधली असेल तर तो वक्रोक्ति अर्थालंकार होतो. वक्रोक्ति हा शब्दालंकार आहे की अर्थालंकार आहे हें त्यांतील श्लेषाच्या स्वरूपावरून ठरवावें लागतें.

उदा.—

(अ) " तुमच्या घरापुढचा हा फूटपाथ फारच अरुंद दिसतो "

" अरुंद कशाने ? तो बरोबर एक फूट रुंदीचा आहे. तो बोलून चालून ' फूट-पाथ ' आहे.

—' विलायतेंतील अनुभव '

(आ) वैद्य— या पाहा मात्रा. यांस पाहून तुमचा वैद्यांबद्दलचा सारा विकल्प दूर होईल.

जनुभाऊ— अबब ! काय या मात्रा ! एखाद्या नवशिक्या कवीच्या पदांतून सुद्धा मात्रांचा इतका सुकाळ नसेल.

—गडकरी, एकच प्याला.

वरील दोन्ही उदाहरणांत बोलणारा एका अर्थाने शब्द वापरतो, तर ऐकणारा अगदी अनपेक्षित असा दुसराच अर्थ त्यांतून काढून बोलणारास चकित करून सोडतो.

(इ) बाला सत्राजिताची पुनरपि पुसते माधवो कोणता तूं ?
कंदर्पाचा सखा जो कुसुमनिधिकृती क्षांतिला की वसंतू ।
हा काळो शारदेचा सुख करि सकाळा नाहि गेला हिमंतू ।
येथे येणें अकाळीं अवचित घडलें सांग पां कोण हेतू ॥

— वामन, सत्यभामाविनोद

कृष्ण सत्यभामेला 'दार उघड' म्हणाला, तेव्हा तिने त्याला नांव विचारलें, तेव्हा 'माधव' हें आपलें नांव कृष्णाने तिला सांगितलें. येथे 'माधव' (मा + धव) म्हणजे 'लक्ष्मीपति' असा अर्थ अभिप्रेत असतांना सत्यभामेने 'वसंत' (मधुसंबंधी) हा निराळाच अर्थ घेतला आणि 'सध्या हिवाळ्याचे दिवस असतांना तूं अकालीं इकडे कसा आलास?' असें विचारलें.

येथे श्लेषावर आधारलेली वक्रोक्ति झाली.

### काकुवक्रोक्ति.

बोलतांना विवक्षित प्रकारें उच्चार करून किंवा विवक्षित हावभाव करून बोलणाऱ्याच्या वाक्यांतूनच ऐकणारा वेगळा अर्थ काढतो तेव्हा काकु-वक्रोक्ति हा प्रकार होतो. हा प्रकार गद्यांतच स्वाभाविकपणें असूं शकतो.

उदा.—

(अ) शान्ताबाई नलुताईकडे चहासाठी गेल्या होत्या. 'तिकडचा रुमाल द्या बरं तोंड पुसायला' शान्ताबाई म्हणाल्या. त्यावर नलुताई म्हणतात 'अग! तुझ्या **तिकडचा** रुमाल मिळावायला मला तुझ्या घरीं जावं लागेल ना!'

या उदाहरणांत 'तिकडचा' शब्द 'पलीकडे असलेला' या अर्थाने शान्ताबाईंनी वापरला. पण **तिकडचा** शब्द विशिष्ट स्वरांत उच्चारून दाखवून 'नवऱ्याचा,' असा अर्थ नलुताईंनी त्यांतून काढला! म्हणून येथे काकुवक्रोक्ति झाली.

## ५. पुनरुक्तवदाभास

पुनरुक्तवदाभास म्हणजे पुनरुक्ति झाल्यासारखें वाटणें. सिंहाचें वर्णन करतांना कवि म्हणतो—

"तनुवपु परि अतुलबळी—करिकुंजर, रुधिर रक्त होय जरी—"

येथे तनु–वपु, करि–कुंजर, रुधिर–रक्त, या शब्दांच्या जोड्यांमध्ये पुनरुक्ति झाल्यासारखी दिसते. पण वस्तुतः तसें नाही. तनु=लहान, कुंजर=श्रेष्ठ, रक्त=लाल रंगाचा, असे अर्थ येथे अभिप्रेत आहेत. हे शब्द केवळ जवळ जवळ आल्यामुळे पुनरुक्ति सारखे वाटतात म्हणून येथे पुनरुक्तीचा आभास होतो. पुनरुक्तवदाभासाचें लक्षण असें—

**शब्दांचें स्वरूप व त्या शब्दांचा अर्थ वस्तुतः वेगवेगळा असूनहि केवळ सान्निध्यामुळे ते एकाच अर्थी आहेत असें वाटून कवीने पुनरुक्ति केल्याचा जेथे भास होतो तेथे पुनरुक्तवदाभास हा अलंकार होतो.**

उदा.:—

(१) जाय तो रडत दाटत कंठ
प्राप्त होय मजला दशकंठ
पद्मिनी उपडुनी गज हस्तीं
ने तसा उचलुनी मज हस्तीं ॥ —वामन

या श्लोकांत गज व हस्तीं या दोन शब्दांचे अर्थ सान्निध्यामुळे सकृत् दर्शनीं सारखेच भासतात, परंतु वस्तुतः ते भिन्न आहेत ( गज = हत्ती; हस्तीं = सोंडेने ). कवीने त्याच अर्थाच्या शब्दाची पुनरुक्ति केल्याचा भास उत्पन्न होत असल्यामुळे हें पुनरुक्तवदाभासाचें उदाहरण झालें.

( २ ) हस्तीं करी वलय उंच अशा उपायीं ।
भूपें हळूच धरिला कलहंस पायीं ॥
—रघुनाथपंडित.

येथे ‘ हस्तीं ’ व ‘ करी ’ हे दोन्हीं शब्द सान्निध्यामुळे समानार्थी ( ‘हात’ या अर्थाचे ) भासतात. परंतु त्यांचे अर्थ भिन्न आहेत. ( हस्तीं = हाताने; करी = केलें ) येथेहि ‘ पुनरुक्तवदाभास ’ अलंकार झाला.

## ६. चित्र

कमल, खड्ग, पट्टिश इत्यादि पदार्थांची आकृति कल्पून त्या आकृतींत बसवितां येतील अशा प्रकारें जेथे वर्णयोजना केलेली असते व त्यामुळेच जेथे वैचित्र्य निर्माण झालेलें असतें तेथे चित्र किंवा चित्रबंध नांवाचा शब्दालंकार होतो—

या आकृति अनेक कल्पितां येतात—नमुन्याकरिता कांही दिल्या आहेत—

(१) **गोमूत्रिकाबंध**—(रस्त्यांत बैलाच्या मूत्राची रेषा जशी उमटते त्याप्रमाणे काढलेल्या आकृतींत श्लोकांतील अक्षरें बसवितां येतात.) पुढील श्लोक गोमूत्रिकाबंधांत बसूं शकतो हें आकृतीवरून दिसून येईल—

गुंजानाद करी भृंग फुलर्ली नव सारसें ।  
मुंजास्पदपरीतांग–कुललीन ससा वसे ॥

—साधुदास, वनविहार




(आकृति नं. १)

(२) **द्वादशदल कमलबंधः**—पुढील कविता बारा पाकळ्यांच्या कमलाच्या आकृतींत कशी बसूं शकते हें पाहा—

नाटोपे कृष्ण काळा कुटिल अघमळा कैं न लिंपे विटाळा,
चोरीचा त्यासि चाळा, **गवळणि** अबळा मोहिल्या, **चक्रचाळा** ।
घाली मंदारमाळा, अजगर बगळा मारिला, **काग काळा**,
त्या नेदीं राजबाळा, कवण करि बळात्कार पाहों नृपाळा ? ॥

—विठ्ठल, रुक्मिणीस्वयंवर




( आकृति नं. २ )

## (३) अम्लानपंकजमालाबंधः—



बाळा सोळा कळांची, छवि नवि रविची, तेवि दावी स्ववींची,
माळा ज्वाळानळाची, गुणिफणिमणिचा, हारि भारी मरीची, ।
झुंकारे कामुकाची, घटि कटितटिंची ख्याति गाती सतींची,
हंसाची साक्ष साची, गति, रतिपतिची, कांतिमा तीव्र तीची ॥

—विठ्ठल, रुक्मिणीस्वयंवर.

हा श्लोक वरील उत्फुल्लकमलमालिकेंत कशा प्रकारें बसवला आहे तें पाहा.

## शब्दालंकारांचा उपयोग

शब्दालंकार शब्दाची परिवृत्ति सहन करीत नाहीत. त्यामुळे कवीला कित्येकदा शब्दालंकार साधतांना अर्थदृष्टीने उचित शब्द वापरतां येत नांहीत. आणि कित्येकदा तर अर्थहानीच पत्करावी लागते. अलंकाराने वस्तुतः रसपरिपोष झाला पाहिजे. पण कवि शब्दालंकारांच्या आहारी गेला तर रसहानी हटकून होतेच. रसयुक्त कविता लिहितांना सहजासहजी शब्दालंकार साधला तर तो शोभून दिसतो. नाहीतर काव्य बेढब होतें.

शब्दालंकारांपैकी अनुप्रास व श्लेष मर्यादित स्वरूपांत वापरले तर रसाला पोषक होतात. यमक रसपरिपोष करावयास असमर्थ आहे. पण मर्यादित स्वरूपांत वापरलें तर निदान रसहानि तरी होत नाही. वक्रोक्ति हा अलंकार चमत्कृति निर्माण करतो. पण पुनरुक्तवदाभास हा केवळ शब्दाचा खेळ होतो. चित्रालंकार तर निश्चितच रसहानि करतो. त्यामुळे त्याला अलंकार म्हणण्यापेक्षा शब्दांची किंवा वर्णांची कसरत म्हणणेंच अधिक चांगलें.

———

**शब्दालंकारांचीं अभ्यासार्थ उदाहरणें:--**

( १ ) म्हणती हा रजनीचर आचारभ्रष्ट दुष्ट पापिष्ट ।
विष्टपकंटक कष्टद शिष्टद्वेष्टा धरा करा पिष्ट ॥

--मोरोपंत, मंत्ररामायण.

( २ ) वदला यापरि बा परि खापरिला परिस तेवि त्या बोध ।

—मोरोपंत, उद्योगपर्व.

( ३ ) आभाळ, जगाचें भाळ, मळवटीं नटतें
उगवतीस हासूं फुटतें ।
ज्या क्षणीं विरहि पक्षिणी सख्याला मिळते
मी भल्या पहाटे येतें ।

— ग. दि. माडगूळकर

( ४ ) न निश्चय कधीं ढळो, कुजनविघ्नबाधा टळो;
न चित्त भजनीं चळो, मति सदुक्तमार्गी वळो; ।
स्वतत्त्व हृदया कळो, दुरभिमान सारा गळो ।
पुन्हा न मन हें मळो, दुरित आत्मबोधें जळो ॥

—मोरोपंत, केकावलि.

( ५ ) श्री बुडविली महेंद्रश्रीतुल्या, मज इची नसे परवा, ।
पर वामलोचनेच्या ऐकों न शकेंचि या बिलापरवा ॥

--मोरोपंत.

( ६ ) तो वधिला पांडुसुतें कांतिजितस्वर्णवर्ण कर्ण रणीं; ।
शोकार्णवीं बुडालों; झालों हतपुत्रमित्र वृद्धपणीं ॥

--मोरोपंत.

( ७ ) प्रेरियले भेदाया पतिधैर्यद्विरदकट कटाक्ष तिने ।

--मोरोपंत.

( ८ ) तनू भववनीं त्रितापदव पावकें कावली
म्हणोनि करुणस्वरें करि मयूर केकावली ॥

—मोरोपंत

( ९ ) म्हातारी उडतां नयेचि तिजला, माता मदीया अशी ।
कांता काय वदों नवप्रसव ते साता दिसांची तशी, ॥
पाता त्या उभयांस मी मज विधी घातास योजीतसे
हातामाजि नृपा तुझ्या गवसलों, आता करावें, कसें ! ॥

—रघुनाथपंडित.

( १० ) असा पक्षी लक्षी बहु विहगलक्षीं न मिळता ।
सुवर्णी जे वर्णी वद कवण वर्णी कवइता ॥
अगाई ! हा बाई ! चपळ वरि जाईल पळुनी ।
धरूं जातें हातें हळुहळु तयातें न कळुनी ॥

—रघुनाथपंडित.

( ११ ) हयातटाने जटा रंगवुनि पटा धरिसि कां शिरी ।
मठाची उठाठेव कां तरी ?

—राम जोशी.

( १२ ) राजहंसा तया तोयीं, राजहंस विसावती ।
चक्रेंही चक्रवाकांचीं चक्राकार विराजती ॥

—रघुनाथपंडित.

( १३ ) मुलासकट माणुसकीला, सिंधूसकट संसाराला, सद्गुणांसकट सुखाला, जगासकट जगदीश्वराला, सुधाकराचा हा निर्वाणीच्या निराशेंतला शेवटचा प्रणाम !

—गडकरी, ‘ एकच प्याला ’

( १४ ) न शिके त्याच्या बोल न बाला; मंदार सारविल काय ?
पतनेच्छुचा न, न वरिल बाला मंदा; रसा वरिल काय ?

—मोरोपंत.

( १५ ) हरिजन अरिजन परिजन करि जननि प्राश जनसभे काय ।
हा दास यास हास त्रास नसो–शिशुस निंदिना माय ॥
——मोरोपंत.

( १६ ) हार विलासवतीने केला हा लक्ष्मण–प्रसूनें की ।
हाराविला सवतीने क्षितिने पुजिला सुरप्रसूनें की ॥
—मोरोपंत

( १७ ) सेवुनि संतत पाला, संत तपाला यदर्थ करितात ।
—मोरोपंत

( १८ ) वपू, विद्या, वक्तृत्व, वस्त्र, वित्त
वकारांना या लब्ध मनुजाचित्त ।
चित्त देवा पाहिजे, नको कांही
मला देवाविण कुणी जगीं नाही ।
—रे. टिळक, सुशीला

# अर्थालंकार



## ( १ ) उपमा अलंकार.

उपमा हा अलंकार आपल्या नित्याच्या ओळखीचाच आहे. " या औषधानें रोग तर असा पळतो की जसें हवेमुळे मच्छर ! " अशी जाहिरात आपण अनेकदा वाचतों. " तो हरणावाणी पळाला " असें एखादा खेडूत सहज बोलून जातो. असें बोलतांना, वाचतांना किंवा ऐकतांना आपण उपमेचा उपयोग केला आहे याचें आपणास भानहि नसतें; इतका हा अलंकार आपल्या अंगवळणीं पडला आहे. परिचित अशा या उपमा अलंकारापासूनच आपण अर्थालंकारांच्या अभ्यासास प्रारंभ करूं. वरील दोन उदाहरणांत आपणास काय दिसतें ? त्या औषधानें रोग किती वेळांत नाहीसा होतो हें आपणास माहीत नाही. त्याची कल्पना जाहिरातदार अशी आणून देतो. आपल्याला डासांचा त्रास होत असतां मध्येच हवेची झुळूक आली तर डास क्षणांत निघून जातात हें आपल्या सर्वांच्या परिचयाचें आहे. या परिचयाच्याच अनुभवाच्या साह्यानें जाहिरातदार आपल्याला औषधाचा गुण पटवून देतो. हवेमुळे डासांचें पळणें आणि औषधानें रोग नाहीसा होणें या दोन गोष्टी जवळ जवळ आणून आपणाला तो असें दाखवितो की डासांच्या जलद पळण्याप्रमाणेच रोगाचें नाहीसें होणेंहि जलदच घडून येतें. दुसऱ्या उदाहरणांतहि असाच प्रकार आहे. हरिण भीतीनें कसें पळतें हें आपणास ठाऊक असतें. तो मनुष्य भिऊन कसा पळाला हें आपण पाहिलेलें नसतें. त्याची कल्पना आपणास ठाऊक असलेल्या गोष्टीच्या सारखेपणावरून सांगणारा मनुष्य आणून देतो.

सारांश, आपणास ठाऊक असलेल्या एखाद्या वस्तूंतील गुणधर्माच्या सारखेपणावरून दुसऱ्या वस्तूंतील आपणास ठाऊक नसलेल्या गुणधर्माचा

परिचय करून देण्याचें कार्य उपमा करते. उपमा म्हणजे दोन वस्तूंची एखाद्या समान गुणधर्माच्या बाबतींत केलेली तुलना होय. मात्र जेथे जेथे अशी तुलना आढळते तेथे तेथे सर्वच ठिकाणी उपमा होत नाही. तुलनेबरोबरच उपमेला दुसरी एक आवश्यक गोष्ट पाहिजे. ती म्हणजे चमत्कृति ही होय. चमत्कृति म्हणजे चटकदारपणा. या चमत्कृतीलाच वैचित्र्य, हृद्यता, विच्छित्ति वगैरे नांवें आहेत. उपमेंतील तुलना ही चटकदार असली पाहिजे. म्हणूनच 'बैलाप्रमाणे रानबैल असतो.' 'कावळ्याचा रंग कोळशाप्रमाणे काळा असतो' इत्यादि उदाहरणांत उपमालंकार नाही. वाचकाच्या मनाला एकदम खेचून घेईल असें वैचित्र्यपूर्ण साम्य उपमेंत आढळलें पाहिजे. असें साम्य जेथे सापडतें तेथेच उपमा हा अलंकार होतो. ही चमत्कृति किंवा हें वैचित्र्य सर्वच अलंकारांच्या मुळाशीं असते. **म्हणून हें वैचित्र्य किंवा हा चटकदारपणा अलंकाराचें सामान्य लक्षण आहे असें म्हणतात.** ( वैचित्र्यम् अलंकारः । ).

आणखी एखाद्या उदाहरणाने हें अधिक स्पष्ट होईल. आदिकवि वाल्मीकि यांचेंच एक उदाहरण घेऊं. वाल्मीकि मुनि तमसा नदीवर स्नानाकरिता गेले. त्यांच्या बरोबर भरद्वाज नांवाचा त्यांचा शिष्य होता. नदीतीराने जातांना त्यांना एका ठिकाणी निर्मल व शांत असें पाणी दिसलें. तेव्हा त्यांनी एकदम थांबून आपल्या शिष्याला म्हटलें, " भरद्वाजा, हें पाणी पाहा. किती निर्मळ, किती रमणीय आणि किती प्रसन्न! अगदी सज्जनांचें हृदयच ! मी येथेच स्नान करीन."

'अकर्दममिदं तीर्थं भरद्वाज निशामय ।
रमणीयं प्रसन्नाम्बु सज्जनानां मनो यथा ॥'

तसें पाहिलें तर आपणहि आपल्या मित्रांबरोबर अनेकदा स्नानाला जातों व स्वच्छ प्रवाह पाहूनच स्नान करतों. त्या दृष्टीने वाल्मीकीची आणि आपली वागणूक सारखीच असते. पण पाणी व सज्जनाचें हृदय यांच्यामधील साम्य वाल्मीकीला जसें प्रतीत झालें तसें आपल्याला कधीच होत नाही. वाल्मीकीने

दाखविलेलें हें साम्य आपल्या मनाचा चटकन् वेध घेतें, आणि आपणहि पाण्याबरोबरच सज्जनांच्या पवित्र हृदयांतहि बुडी घेण्याचा विचार करतों. उपमेंतील हृद्यता ती ही !

सर्व महाकवींचें असेंच असतें. गीतेमध्ये प्रतिक्षणी अनुभवास येणाऱ्या नवीनतेची कल्पना ज्ञानेश्वर शंकर—पार्वतीसंवादाच्या रूपानें कशी आणून देतात तें पाहा—

> तया गीतार्थाची थोरी । स्वयें शंभू विवरी ।
> तेथ भवानी प्रश्न करी । चमत्कारोनी ॥
> तेथ हर म्हणे नेणिजे । देवि जैसें कां स्वरूप तुझें ।
> तैसें हें नित्य नूतन देखिजे । गीता तत्त्व ॥
>
> ( ज्ञा. १।७०,७१ )

गीतेचें तत्त्व आणि पार्वतीचें सौंदर्य यांच्यांतील नित्यनूतनता आपल्या मनाचा चटकन् वेध घेते.

या उपमेचें विश्लेषण केलें म्हणजे आपल्याला पुढील गोष्टी दिसून येतात—

(१) पार्वतीचें सौंदर्य व गीता तत्त्व या दोन गोष्टी येथे कवीनें घेतल्या आहेत.

(२) त्यांपैकी पार्वतीचें सौंदर्य हें बोलणारा ( शंकर ) आणि ऐकणारी ( पार्वती ) या दोघांच्याहि परिचयाचें आहे व त्याचा नित्यनूतनता हा गुणहि दोघांना ठाऊक आहे.

(३) गीता तत्त्वांतील नित्यनूतनतेचा गुण शंकरास ठाऊक आहे, पण पार्वतीस ठाऊक नाही.

(४) त्या गुणाच्या आधारावर पार्वतीचें सौंदर्य व गीता तत्त्व या दोन गोष्टींना शंकर एकत्र आणीत आहे.

( ५ ) व त्याच्या साह्याने गीतेंतील नित्यनूतनतेच्या गुणाचा प्रत्यय शंकरपार्वतीला व त्याचबरोबर ज्ञानेश्वर वाचकांसहि आणून देत आहेत.

उपमेमध्ये एक प्रकारें तोलण्याची किंवा मोजण्याची क्रिया असते. आपण दुकानांत जाऊन एक शेर साखर मागतों. दुकानदार आपल्या स्वाधीन एक पुडा करतो. आपण एकदम चमकतों व दुकानदाराकडे प्रश्नार्थक नजरेने पाहतों. तो चटकन् तो पुडा एका पारड्यांत टाकतो व दुसऱ्या पारड्यांत एका शेराचें वजन टाकतो. आपल्याला वजनाचा सारखेपणा दिसून येतो व पुडा उचलून आपण घरीं निघून जातों. लोखंडी वजनाची माहिती दोघांनाहि असते. पण पुड्याचें वजन फक्त दुकानदारासच ठाऊक असतें. त्या दोन गोष्टींना एकत्र आणून पुड्याच्या वजनाची कल्पना तो आपणास देतो. म्हणूनच उपमेला तुलना म्हणतात.

उपमेमधील जी गोष्ट दोघांनाहि ठाऊक असते तिला साहित्यशास्त्रांत " **उपमान** " असें नांव आहे. ज्या गोष्टीचा गुणधर्म कवीलाच ठाऊक असतो पण रसिकाला ठाऊक नसतो त्या गोष्टीला ' **उपमेय** ' म्हणतात. उपमान आणि उपमेय यांची तुलना उपमेंत केलेली असते. उपमान आणि उपमेय यांच्यांत ज्या बाबतींत साम्य असतें त्या गोष्टीला " **समान धर्म किंवा साधारण धर्म** " म्हणतात आणि उपमान व उपमेयांतील साम्य ज्या शब्दाच्या द्वारें व्यक्त करण्यांत येतें त्या शब्दांना उपमाप्रतिपादक किंवा साम्यदर्शक शब्द म्हणतात. उदा. जसें, तसें, जेवी-तेवी, सें, सारखें, सम, प्रमाणें, इ. उपमान, उपमेय, साधारण धर्म आणि साम्यदर्शक शब्द हीं उपमेचीं चार अंगें होत. वैचित्र्य किंवा चमत्कृति हा सर्वच अलंकारांचा आवश्यक धर्म होय. तो वेगळा सांगण्याची गरज नाही.

म्हणून उपमेची व्याख्या अशी करतां येईल—

**" दोन भिन्न पदार्थांतील रमणीय साधर्म्य किंवा सादृश्य ज्या वाक्यांतून प्रतीत होतें तेथे उपमालंकार होतो, किंवा उपमान व उपमेय यांच्यांतील रमणीय साधर्म्य म्हणजे उपमा."**

**उदाहरणें.**

(१) जलांत असूनहि जलापासून अलिप्त राहणाऱ्या नलिनीदलाप्रमाणे प्राचीन संतकवि तत्कालीन राजकीय परिस्थितीपासून अलिप्त राहिले.

यांत ' संतकवि ' हें उपमेय असून ' नलिनीदल ' हें उपमान आहे. ' अलिप्तता ' हा समान धर्म सांगितला असून 'प्रमाणे' हा साम्यदर्शक शब्द योजला आहे. म्हणून हें उपमेचें उदाहरण झालें.

(२) मृदु सबाह्य नवनीत । तैसें सज्जनाचें चित्त ॥

—तुकाराम.

यांत ' चित्त ' हें उपमेय, ' नवनीत ' हें उपमान, ' मृदुत्व ' हा साधारण धर्म व ' तैसें ' हा उपमादर्शक शब्द आहे. म्हणून येथेहि उपमा हा अलंकार आहे.

## उपमेचे प्रकार.

उपमान, उपमेय, साधारण धर्म आणि उपमाप्रतिपादक शब्द हीं उपमावाक्याचीं चार आवश्यक अंगें होत. कित्येक उपमावाक्यांत हीं चारहि अंगें स्पष्ट दिसतात. जसें, " तिचें मुख चंद्राप्रमाणे सुंदर आहे." या वाक्यांत चंद्र हें उपमान, मुख हें उपमेय सौंदर्य हा साधारण धर्म, आणि प्रमाणे हा उपमाप्रतिपादक होय. ज्या वाक्यांत हीं चारहि अंगें स्पष्टपणें दिसतात तेथे **पूर्णोपमा** असते. पण कित्येकदा हीं चारहि अंगें स्पष्ट दिसत नाहीत.

उदा.– " तिचें मुख चंद्राप्रमाणे आहे." येथे सौंदर्य हा साधारण धर्म स्पष्टपणें सांगितला नाही. पण तो रसिकास सहजासहजी प्रतीत होतो. अशा ठिकाणी **लुप्तोपमा** होते.

पूर्णोपमेचीं उदाहरणें—

(१) अप्सरेसारखी सुंदर बायको आपल्याला मिळावी असें कुणास बरें वाटत नाही !

या वाक्यांत 'बायको' हें उपमेय असून 'अप्सरा' हें उपमान आहे; 'सौंदर्य' हा साधारण धर्म सांगितलेला असून 'सारखी' हा उपमा-प्रतिपादक शब्दहि उक्त आहे. अशा प्रकारें उपमेची चारीं अंगें या वाक्यांत स्पष्ट दिसत असल्यामुळे येथे 'पूर्णोपमा' झाली.

(२) रवि गेला रे सोडुनि आकाशाला ।
घन जैसे दुर्भाग्याला ॥
अंधार वसे चोहिंकडे गगनांत ।
गरिबाच्या जेवि मनांत ॥
श्रम थकुनि कसा निजला हा इहलोक
मम आशा जेवि अनेक ॥

—दत्त, 'निज नीज माझ्या बाळा'

वरील पद्यांत तीन पूर्णोपमा आहेत. पहिल्या उपमेंत 'सोडून जाणें' दुसऱ्यामध्ये 'अंधार वसणें' व तिसऱ्यांत 'थकून निजणें' हे साधारण धर्म आलेले आहेत.

कवीने वरील पद्यांत निसर्गक्रियांचें वर्णन केलें असून त्यांच्या स्पष्टीकरणार्थ मनुष्यस्वभावांतील किंवा मानवी जीवनांतील उदाहरणें दिलेलीं आहेत. या उपमेंतील स्वारस्य असें की 'अंधार वसणें' व 'थकून निजणें' हे साधारण धर्म उपमेयाकडे वाच्यार्थाने तर उपमानाकडे लक्ष्यार्थाने लागतात. समर्पक अलंकारांमुळे रसपरिपोष कसा होतो याचें हें सुंदर उदाहरण होय. अशा प्रकारचीं मनुष्यस्वभावांतील उपमानें संतवाङ्मयांत व विशेषतः एकनाथी भागवतांत अनेक ठिकाणीं आढळतात.

(३) जे लोक चेष्टां समस्तां । जैसा निमित्तमात्र कां सविता ।
तैसा जगत्प्रभवीं पंडुसुता । हेतु मी जाणें ॥

ज्ञानेश्वरी अ. ९. १११

अर्थः—सर्व सृष्टींतील लोकांच्या हालचालीस ज्याप्रमाणे सूर्य हा केवळ निमित्त आहे त्याप्रमाणे जगाच्या उत्पत्तीला मी (ईश्वर) केवळ निमित्त आहे.

यांत सूर्य हें उपमान, ईश्वर हें उपमेय, निमित्त असणें हा साधारण धर्म आणि जैसा–तैसा हे उपमादर्शक शब्द असल्यामुळे येथे पूर्णोपमा झाली.

**लुप्तोपमेचीं उदाहरणें:—**

( १ ) जीवन हें पाण्यावरील बुडबुड्यासारखें आहे.

या वाक्यांत ' जीवन ' हें उपमेय असून ' बुडबुडा ' हें उपमान आहे. ' सारखें ' हा शब्द उपमादर्शक आहे. ' जीवन ' व ' बुडबुडा ' या दोहोंतील ' क्षणभंगुरता ' हा जो साधारण धर्म तो मात्र येथे उक्त नसून अध्याहृत आहे. म्हणून ही लुप्तोपमा होय. लुप्तोपमेंत एक किंवा दोन अंगें लुप्त असतात.

( २ ) व्हावा तुला जरि असेल पदार्थ काही
घे नांव—तो मग कुठे असु दे कसाही,
द्रोणागिरीसह जसा हनुमन्त येई,
बाजार आणिन इथे उचलून तेवी !

—केशवकुमार, 'सखे, बोल–बोल.'

येथे ' त्वरित ' किंवा ' लीलेने ' हा साधारणधर्म तिसऱ्या व चौथ्या ओळींतील उपमेमध्ये अध्याहृत आहे, म्हणून येथे लुप्तोपमा झाला.

(३) कळी करि मुनिर्मळीं परमउग्र दावा नळीं,
तयांत अविशुद्ध मी; शलभ जेवि दावानळीं;
**व्रणार्तपशुच्या शिरावरि वनीं उभे काकसे–**
**स्मरादि रिपु मन्मनीं**; अहि न काळ भेका कसे !

—मोरोपंत, केकावलि.

" जखमेने पीडित झालेल्या पशूच्या डोक्यावर जसे कावळे उभे असतात तसे कामक्रोधादि शत्रु माझ्या मनांत उभे आहेत " असें कवि म्हणतो. या ठिकाणीं ' स्मरादि रिपु ' व ' मन्मन ' हीं उपमेयें असून ' काक ' व ' व्रणार्त पशु ' हीं उपमानें होत. ' से ' हें उपमादर्शक पद आहे. या ठिकाणीं ' स्मरादि रिपु ' व ' काक ' यांमधील ' क्रूरपणा ' हा साधारणधर्म अनुक्त आहे. तसेंच ' मन्मन ' व ' व्रणार्त पशु ' यांमधील ' दौर्बल्य ' हा साधारणधर्महि लुप्त आहे; म्हणून येथे लुप्तोपमा हा अलंकार समजावा.

## लुप्तोपमेचे विविध प्रकार

**१. धर्मलुप्ता**— जेव्हा उपमानवाक्यांत साधारण धर्म शब्दानें सांगितलेला नसतो पण तो सूचित असतो तेव्हा धर्मलुप्ता उपमा होते.

उदाहरणें—

मागे दिलेलीं दोन उदाहरणें धर्मलुप्त उपमेचीं आहेत. शिवाय पुढील उदाहरणें पाहा—

(१) मालतीचें नाक चाफेकळीसारखें आहे.

वरील वाक्यांत उपमेय, उपमान व उपमावाचक शब्द उक्त आहेत, परंतु ' नाक ' व ' चाफेकळी ' या दोहोंमधील ' सरलत्व ' हा जो साधारण धर्म तो मात्र लुप्त आहे. म्हणून ' धर्मलुप्ता ' उपमेचें हें उदाहरण होय.

(२) यजमान निमंत्रितजनीं जसा वावरे,
हा मंद सुगंधित वायु तसा संचरे,
इतरांस सौख्य जें तें यांचें सुख खरें !

—रे. टिळक ‘ सृष्टीची करमणुकीची घटका ’

वरील ओळींमध्य ‘ यजमान ’ व ‘ वायु ’ या ‘ उपमेय ’ व ‘ उपमाना ’ मधील ‘ आतिथ्यशीलता ’ हा साधारण धर्म उक्त नाही. तो अध्याहृत आहे. म्हणून येथे धर्मलुप्ता उपमा झाली.

२. **वाचकलुप्ता**— जेव्हा उपमेंत सादृश्यवाचक शब्दाचा लोप होतो तेव्हा वाचकलुप्ता उपमा होते. उदा.—

घनश्याम सुंदरा श्रीधरा, अरुणोदय झाला

—होनाजी बाळ

येथे ‘ घनश्याम ’ यांत वाचकलुप्ता उपमा आहे. श्रीधर हें उपमेय, घन हें उपमान, श्यामता हा साधारण धर्म आहे. घनश्याम म्हणजे घनाप्रमाणे श्याम. वरील उदाहरणांत वाचकशब्द लुप्त आहे. म्हणून येथे वाचकलुप्ता उपमा झाली.

३. **धर्मवाचकलुप्ता**—कित्येकदा उपमा वाक्यांत उपमान व उपमेयच निर्दिष्ट असतात. साधारणधर्म आणि सादृश्यवाचक शब्द लुप्त असतात. अशा वेळीं धर्मवाचकलुप्ता उपमा होते. ही उपमा फक्त कर्मधारय समासांतच होऊं शकते. उपमेच्या या प्रकाराचा आणि रूपकाचा कित्येकदा गोंधळ होण्याचा संभव असतो. म्हणून त्यांच्यांतील भेद नीट ओळखला पाहिजे. हा भेद रूपकाच्या विवेचनांत स्पष्ट केला जाईल.

(१) मृगाक्षीच्या कटाक्षांनी तो विद्ध झाला.

वरील वाक्यांतील ‘ मृगाक्षीच्या ’ या शब्दांतून “ जिचे डोळे हरिणाच्या डोळ्यांसारखे सुंदर आहेत अशा त्या स्त्रीच्या इतका अर्थ

प्रतीत होतो. परंतु ‘ सौंदर्य ’ हा साधारण धर्म तसेंच सारखे हा सादृश्य वाचक शब्द हे दोन्हीहि वरील वाक्यांत लुप्त आहेत. येथे ‘ मृग ’ हा शब्द ‘ मृगाक्ष ’ ( म्हणजे मृगाचे डोळे ) याचा वाचक असून उपमान आहे; आणि अक्षि ( म्हणजे स्त्रीचे डोळे ) हें उपमेय आहे. ‘ सुंदरता ’ हा धर्म व ‘प्रमाणे’ हा वाचक शब्द हे लुप्त आहेत. म्हणून येथे धर्मवाचक-लुप्ता उपमा झाला.

( २ ) विराजे वाग्देवी अभयवर पाशांकुशधरा
करांबूजीं वीणा रुणझुणत शोभे स्वर बरा ।
त्रिनेत्री अर्धेंदूतिलक निटळीं शुभ्रवसना
प्रसन्ना श्री पद्मासनि नमुनि वंदीन चरणा ॥

—विठ्ठल, रुक्मिणीस्वयंवर.

वरील पद्यांतील ‘ करांबूजीं ’ शब्दाचा अर्थ ‘ कमलाप्रमाणे सुंदर अशा हातांत ’ इतका निघतो. ‘ प्रमाणे ’ हा उपमावाचक शब्द व ‘ सुंदरता ’ हा सामान्यधर्मदर्शक शब्द–हे दोन्ही शब्द लुप्त अस . ., येथे ‘ धर्मवाचकलुप्ता ’ किंवा ‘ द्विलुप्ता ’ उपमा झाली.

## उपमानलुप्त किंवा उपमेयलुप्त उपमा होऊं शकत नाही

मम्मटाने आपल्या काव्यप्रकाशांत उपमानलुप्त व उपमेयलुप्त उपमेचीं उदाहरणें दिलीं आहेत व त्याला अनुसरून अलंकारचंद्रिका-कारांनीहि उपमेचे विभाग केलेले आहेत. पण वस्तुतः संस्कृतांत काय किंवा मराठींत काय हे दोन्हीहि प्रकार संभवत नाहीत. लुप्तोपमेमध्ये लुप्त झालेलीं अंगें वस्तुतः असतातच. परंतु शब्दांनी निर्दिष्ट केलेलीं नसतात, एवढेंच. उपमावाचक शब्द किंवा धर्म हे लुप्त असले तरी सहजासहजी रसिकाला ओळखतां येतात. म्हणून त्यांच्या बाबतींत लुप्तोपमा होऊं शकते. पण

उपमान किंवा उपमेय लुप्त झालें तर तें ओळखतांच येणें अशक्य आहे; म्हणून त्यांचा लोप संभवत नाही.

चंद्रिकाकारांनी उपमानलुप्त किंवा उपमेयलुप्त उपमेचीं उदाहरणें म्हणून दिलेल्या पद्यांत लुप्त समजलीं जाणारीं अंगें वस्तुतः हजर आहेत. तीं अशीं—

" दृष्टीपुढे दिसतसे मज हे **मृगाक्षी** " येथे मृगाक्षी ह्या समासांत उपमान, धर्म आणि वाचक यांचा लोप झाला आहे, असें मानण्यात येतें. म्हणून संस्कृतांत येथे ' त्रिलोपा उपमा ' आहे असें मानण्यांत येतें. पण हा समास एका विशिष्ट तऱ्हेने ( मृगस्य अक्षिणी इव अक्षिणी यस्याः ) असा सोडविला तरच येथे उपमानलोप संभवतो; एरव्ही नाही, असें मम्मटच म्हणतो. वस्तुतः येथे मृग हा शब्द लक्षणेने ' मृगाक्षि ' या अर्थी सहज घेतां यतो व तसा घेतला म्हणजे व्याकरणाच्या एका तांत्रिक नियमाचा आधार घेऊन त्रिलोपा उपमा मानण्याचेंहि कारण राहत नाही ' मृगाक्षी ' या शब्दांत येथे वाचकधर्मलुप्ता उपमा होते.

चंद्रिकाकारांनी उपमेयलुप्तेचें उदाहरण घेतलें, तें असें—

" सूत म्हणे कविगुरुच्या जैसें रसिकास वाटलें कवनीं ।<br>
कीं उगवता अदितिचा पांथा जायास वाट लेक वनीं ॥<br>
किंवा जसें सुकंठ प्लवगाला वाटलें कपींद्रवधीं ।<br>
वेन-निधनी प्रजाला त्या पांचाळादिकां तसेंच **तधीं** ॥

—येथे तधीं=तेव्हा=भीमाने सुयोधनास मारलें त्या वेळीं, असा अर्थ आहे. भीमाने सुयोधनास मारलें त्या वेळीं, पांचाळादिकांस हर्ष झाला असा अभिप्राय आहे. येथे "भीम-सुयोधन वृत्तांताचा लोप आहे" असें चंद्रिकाकार म्हणतात; पण तें पटत नाही. ' तधीं ' या शब्दप्रयोगाने त्या प्रसंगाचा येथे निर्देश स्पष्ट झालेला आहे.

म्हणून लुप्तोपमेंत—धर्मलुप्ता, वाचकलुप्ता, आणि धर्मवाचकलुप्ता असे तीनच प्रकार आमच्या मतें संभवतात.

उपमेंतील अंगें उक्त असणें किंवा लुप्त असणें यावरून, वरील प्रकार केले आहेत. पण याशिवाय वेगळ्या प्रकारेंहि उपमेचें प्रकार होतात. ते असे—

**मालोपमा**—जेव्हा एकाच उपमेयास अनेक उपमानें असतात तेव्हा मालोपमा होते. ज्याप्रमाणे माळेमध्ये एकच दोरा अनेक पुष्पांमधून गेलेला असतो त्याप्रमाणे अनेक उपमानांशीं एकच उपमेय संबंधित असतें; म्हणून ती मालोपमा होय. या उपमेयाचें सर्व उपमानांशीं एकाच बाबतींत साधर्म्य असेल किंवा प्रत्येक उपमानाशीं वेगवेगळ्या बाबतींत साधर्म्य असेल. म्हणून ' एकच साधारण धर्म असलेली ' किंवा ' भिन्न साधारण धर्म असलेली ' असे मालोपमेचे दोन प्रकार होतात. उदा.—

( १ ) रस्त्याने होणारा प्रवास मोजायला जसे मैलांचे दगड, जप मोजायला जसे माळेचे मणी, किंवा काळ मोजायला जसे घड्याळाच्या तबकडी-वरील अंक, तसे इतिहासगणनेला लोकोत्तर राष्ट्रीय प्रसंग उपयोगी असतात.

—न. चिं. केळकर ' केळकरांचे लेख '

वरील वाक्यांत ' इतिहास ' व ' लोकोत्तर राष्ट्रीय प्रसंग ' हीं दोन उपमेयें आहेत त्यांतील ' इतिहास ' या उपमेयाशीं ' प्रवास ' ' जप' व ' काळ ' या तीन उपमानांचा संबंध आहे. " लोकोत्तर राष्ट्रीय प्रसंग", या उपमेयाचीं ' मैलांचे दगड ' ' माळेचे मणी ' व ' अंक ' हीं तीन उपमानें आहेत. म्हणजे वरील उदाहरणांत उपमेयांची जोडी एकच असून उपमानांच्या जोड्या तीन आहेत हें दिसून येतें म्हणून येथे मालोपमा हा अलंकार आहे. या मालोपमेंत " मोजण्यासाठी उपयोगी असणें " **हा एकच साधारण धर्म** आहे.

(२) जैसी पुष्पांमाजी पुष्प मोगरी ।
की परिमळांमाजीं कस्तुरी ।
तैसी भाषांमाजी साजिरी ।
मराठिया ॥

—फादर स्टीफन्स, ख्रिस्तपुराण.

वरील ओवींत 'भाषांमाजी मराठी' हें एकच उपमेय असून 'पुष्पांमाजी मोगरी' आणि 'परिमळांमाजी कस्तुरी' हीं दोन उपमानें आहेत. 'साजिरी असण्याचा' साधारण धर्म एकच आहे. **हेंहि एकच साधारण धर्म** असणाऱ्या मालोपमेचें उदाहरण ठरतें.

(३) परि मीनातें देखौनि बकु । जैसा निधानातें रंकु ।
कां स्त्री देखौनि कामिकु । प्रवृत्ति धरी ॥
जैसें खोलां धांवे पाणी । भ्रमर पुष्पाचिये घाणीं !
ना ना सुटला सांजवणी । वत्सुचि पां ॥
हें ना घनगर्जिता सरिसा । मोर वोवांडे आकाशा ।
ज्ञाता ज्ञेय देखोनि तैसा । धांवचि घे ॥

—ज्ञानेश्वरी, अ. १८ वा.

अर्थः—'माशाला पाहतांच जसा बगळा त्यास धरावयास धावतो, अथवा द्रव्याचा ठेवा पाहतांक्षणीं तो घेण्यास दरिद्री धावतो, किंवा स्त्री पाहतांच जसा कामुक पुरुष तिची प्राप्ति करून घेण्यास प्रवृत्त होतो, जसें पाणी उतरत्या जमिनीकडे धावतें, भ्रमर पुष्पाचा वास घेण्यास धावतो, अथवा धार काढण्याचे वेळीं वासरूं सोडल्यावर तें गाईकडे धावत जातें, मेघांची गर्जना होतांच मोर जसा आपल्याला आकाशावरून ओवाळून टाकतो—तसा ज्ञाता हा ज्ञेयास पाहून उडी घालतो.'

या उदाहरणांत उपमानांची लांबलचक मालिकाच आहे. तथापि उपमेय व उपमानें यांतील "धाव घेण्याचा" **साधारणधर्म सर्वत्र एकच** आहे. मालोपमेचीं असलीं सुंदर उदाहरणें ज्ञानेश्वरींत विपुल आहेत.

'एकच साधारण धर्म असलेलीं' मालोपमेचीं कांहीं उदाहरणें आपण आतापर्यंत पाहिलीं. 'भिन्न साधारण धर्म' असलेला मालोपमेचा जो दुसरा

जो धैर्यें धरसा, सहस्रकरसा तेजें तमा दूरसा
जो रत्नाकरसा गभीर, शिरसा भूपां, यशें हारसा
ज्ञाता जो सरसावला नवरसांमाझारि शृंगारसा
शोभे तामरसाक्ष तो नळ रसानाथ स्तवूं फारसा ॥

—रघुनाथपंडित, दमयंतीस्वयंवर.

या श्लोकांत नळ हें एकच उपमेय असून धर (पर्वत), सहस्रकर (सूर्य), रत्नाकर (समुद्र), शिर, हार व शृंगाररस इतकीं उपमानें आहेत.

या उदाहरणांतील प्रत्येक उपमानाबरोबर साधारणधर्म वेगवेगळा सांगण्यांत आला आहे. म्हणून मालोपमेंतील " **भिन्न साधारण धर्म** " असलेलें हें एक उदाहरण होय.

**रशनोपमा**—जेव्हा पहिल्या वाक्यांतील उपमेय दुसऱ्या वाक्यांत उपमान होतें; दुसऱ्या वाक्यांतील उपमेय तिसऱ्या वाक्यांत उपमान होतें; आणि अशा तऱ्हेने जेथे क्रमाने अनेक उपमेयें आणि उपमानें यांची साखळी तयार होते तेथे रशनोपमा हा अलंकार होतो.

एकच साधारण धर्म किंवा भिन्न साधारण धर्म यांना अनुसरून रशनोपमेचेहि दोन प्रकार होतात. उदा.

वाणीपरि मति, मतिपरि कृति, कृतिपरि कीर्ति त्या नृपालाची ।
विमला; जगतीवरती सुकृती ऐसा न अन्य झालाची ॥

—लक्ष्मणशास्त्री लेले.

या उदाहरणांत प्रारंभीं 'मति' हें उपमेय असून दुसऱ्या वाक्यांत तें उपमान झालें आहे. दुसऱ्या वाक्यांतील 'कृति' हें उपमेय तिसऱ्या वाक्यांत उपमान झालें आहे. अशा प्रकारें उपमेयें व उपमानें यांची उत्तरोत्तर रशना म्हणजे साखळी तयार झाली असल्यामुळे येथे रशनोपमा हा अलंकार झाला.

वरील उदाहरणांत 'विमलता' हा **एकच साधारणधर्म** आहे. रशनोपमेंत साधारण धर्म भिन्नहि असूं शकतात. पुढील उदाहरण पाहा:—

चंद्रापरी हंस शोभे शुक्लत्वाने, नारी गमनाने हंसापरी ।
नारीपरी जल सुखद स्पर्शाने, नभ स्वच्छत्वाने जलापरी ॥

—वि. वा. भिडे, 'अर्थालंकाराचें निरूपण'

वरील उदाहरणांत 'हंस' हें प्रारंभी उपमेय असून दुसऱ्या वाक्यांत उपमान झालें आहे. दुसऱ्या वाक्यांतील 'नारी' हे उपमेय तिसऱ्या वाक्यांत उपमान झालें आहे. तिसऱ्या वाक्यांतील 'जल' हें उपमेय चौथ्या वाक्यांत उपमान झालें आहे. अशा प्रकारें या ठिकाणी रशनोपमा झाली असून एकंदर चार उपमा आहेत. मात्र त्या चार उपमांमध्ये साधारण धर्म एकच नसून प्रत्येक उपमेंत **साधारण धर्म भिन्न** आहे. शुक्लत्व, गमन, स्पर्शसुख आणि स्वच्छता हे चार साधारण धर्म वरील चार उपमांमध्ये क्रमाने आले आहेत.

## अलंकारांत उपमेचें स्थान

सर्व आलंकारिकांनी आपल्या अलंकारविवेचनांत उपमेला अग्रस्थान दिलें आहे. याचें कारण असें की 'औपम्य' हें अनेक अलंकारांच्या मुळाशीं आढळतें. 'मुख चंद्रासारखें सुंदर आहे' ही उपमा झाली. कल्पना हीच, पण ती थोड्या फरकाने मांडली की वेगळा अलंकार होतो. उदा.— 'मुख पाहतांच चंद्राचें स्मरण होतें' हा स्मरण अलंकार; 'हिच्या मुखासारखा चंद्र आहे,' हा प्रतीप; 'हें मुख की चंद्र' हा ससंदेह; 'मुख नव्हे, हा चंद्रच,' ही अपह्नुति; 'मला वाटते हा चंद्रच उगवला' ही उत्प्रेक्षा, तर मुखास पाहून कोणी म्हणतो 'हा पाहा चंद्र' ही अतिशयोक्ति. अशा प्रकारें सादृश्य किंवा औपम्य अनेक अलंकारांचा आधार आहे.

म्हणूनच प्रसिद्ध आलंकारिक अप्पय्य दीक्षित म्हणतात—

उपमैका शैलूषी संप्राप्ता चित्रभूमिकाभेदान् ।
रंजयति काव्यरंगे नृत्यन्ती तद्विदां चेतः ॥

अर्थः--उपमा ही एक नर्तकी आहे, आणि ती निरनिराळ्या वैचित्र्यपूर्ण भूमिका धारण करून काव्यरूपी रंगपीठावर नर्तन करीत रसिकांचें रंजन करते.

## अभ्यासासाठी उपमा अलंकाराचीं कांहीं उदाहरणें

( १ ) बाजारांत जाण्यासाठीं गोविंदाला कहादा सांगितलें पण तो आपला खांबासारखा उभाच !

( २ ) गंगेचें पाणी स्फटिकासारखें शुभ्र असतें.

( ३ ) सत्य हें एकाच राष्ट्राला, एकाच धर्माला किंवा पक्षाला अनुसरून असतें असें नाहीं; तर अशोधित धातूंत जसे सुवर्णरज यदृच्छेनें मिसळलेले असतात व रसायनव्यापाऱ्यांना त्यांचें पृथक्करण करून ते वेगळे काढावे लागतात, त्याप्रमाणेच सत्याचीहि गोष्ट होय.

—विष्णुशास्त्री चिपळूणकर. ' आमच्या देशाची स्थिति '

( ४ ) गाल टेकुनी हस्ततलावरि जी चिंतातुर बैसे,
अलक लोंबती मुखावरी तें, कमलीं मधुकर जैसे ॥

कृष्णशास्त्री चिपळूणकर, मेघदूत.

( ५ ) चंदनाचे हात पायही चंदन । परिसा नाहीं हीन कोणी अंग ।
दीपा नाहीं पाठीं पोटीं अंधकार । सर्वांगें साकर अवघी गोड ।
तुका म्हणे तैसा सज्जनापासून । पाहतां अवगुण मिळेचिना ॥

( ६ ) तुझ्याभोवतीं क्षुद्र वनस्पति माजुनि तुज नाहींसे ।
करावयाला झटती; गगनीं नक्षत्रा घन जैसे ॥

रे. टिळक, ' वनवासी फूल '

( ७ ) अशुद्ध वाक्यें शब्द मोडके
अवाच्य अक्षर वर्ण तोटके
गोड जसे अमृताचे भुरके
होती प्रीतीनें ॥

—वा. ब. पटवर्धन ' शब्द '.

( ८ ) सौभद्र म्हणे शिरतों व्यूहीं डोहीं जसा मतंगज वा ।
हरिपोत दंतियूथीं की दहनीं करुनिया पतंग जवा ॥
—मोरोपंत.

( ९ ) अर्क जसा पद्मातें, कुमुदातें चंद्र, तात तोकातें, ।
लोकातें हर्ष तसा प्रभु दे स्पर्शो न मोहशोकातें ॥
—मोरोपंत

( १० ) कविहृदयांतुनि मंजुळ कवनें तत्सम गिरिमधुनी ।
खळखळुनी आवेशें निघती निर्मल निर्झरिणी ॥
—भा. रा. तांबे

## ( २ ) उपमेयोपमा

रात्रीच्या प्रशांत वेळीं चंद्रप्रकाशात सरोवराच्या तीरावर बसलेला कवि स्वतःला प्रतीत झालेल्या शारदशोभेचें वर्णन करतांना म्हणतो—

हंसापरि विधु विधुपरि हंस जल नभापरी नभहि जलसें ।
तारांपरि कुमुदें हीं तारा कुमुदापरी शरद् विलसे ॥

वास्तविक पाहतां यांत उपमाच आहे. हंस—चंद्र, पाणी--आकाश, तारा--कुमुदें या जोड्यांतील साधर्म्य यांत कवि दाखवतो. पण कवि एवढेंच करून थांबत नाही. हंस चंद्राप्रमाणे दिसतो असें सांगतांना चंद्र हंसाप्रमाणे दिसतो असेंहि कवि सांगून जातो. हें सांगण्यांत त्याचा हेतु असा आहे की हंस आणि चंद्र हेच काय ते एकमेकांना सदृश आहेत; तिसरी कोणतीहि गोष्ट त्यांना समान नाही. रमणीमुखाचें सौंदर्य वर्णन करतांना मुखाची तुलना कमलाशींहि होऊं शकेल, तशीच ती चंद्राशींहि होऊं शकेल पण जेव्हा एखाद्या क्षणीं कवीला प्रियामुख व तिचे नीलवर्ण डोळे यांची संयुक्त शोभा प्रतीत होते तेव्हा त्याला त्यासारखें फक्त भ्रमरयुक्त कमलच दिसतें, इतर कोणतींहि वस्तु दिसत नाही व तो चटकन् म्हणून जातो- —

"तुझ्या मुखापरी पद्म, पद्मापरि तुझें मुख ।
नेत्रापरि तिथे भृंग, नेत्र भृंगांपरी इथे ॥"

येथे मुख हें उपमेय आहे व पद्म हें उपमान आहे. कवि मुखाची म्हणजे उपमेयाची पद्माशीं म्हणजे उपमानाशीं तुलना करूनच थांबत नाही, तर लागलीच पुन: उपमानाचीहि उपमेयाशीं तुलना करतो आणि असें दाखवितो की या दोनच वस्तु काय त्या एकमेकींस साजेशा आहेत. उपमेयाची उपमानाशीं तुलना करण या उपमेच्या रूढ मार्गावर न थांबतां कवि उपमानाची उपमेयाशीं तुलना करतो म्हणून,हा अलंकार **उपमेयोपमा** होय. या अलंकारांत दोनच वस्तु एकमेकींसारख्या आहेत असें सांगून **तिसरी सदृश वस्तु नाही** असें कवि दाखवितो. म्हणून 'तृतीय सदृश-व्यवच्छेद' ( तिसऱ्या सदृश्य वस्तूचा निरास ) हा या तुलनेंतील हेतु होय. म्हणून हा उपमेचाच एक विशिष्ट प्रकार दिसत असला तरी स्वतंत्र अलंकार मानण्यांत आला आहे.

**उपमेयोपमा आणि रशनोपमा**--उपमेयोपमेंत पहिल्या वाक्यांतील उपमेय--उपमानांची दुसऱ्या वाक्यांत अदलाबदल होतें. म्हणजे पहिल्या वाक्यांतील उपमेय दुसऱ्या वाक्यांत उपमान होतें. म्हणून रशनोपमेशीं उपमेयोपमेचें कांहींसें साम्य भासेल. पण तें साम्य एवढ्यावरच थांबतें. उपमेयोपमा व रशनोपमा यांत पहिल्या वाक्यांतील उपमेय हें दुसऱ्या वाक्यांत उपमान होतें. पण त्याचबरोबर उपमेयोपमेंत पहिल्या वाक्यांतील उपमानहि दुसऱ्या वाक्यांत उपमेय होतें, तसें रशनोपमेंत होत नाही. सूत्ररूपानें हा भेद दाखवितां येईल.

( १ ) उपमेयोपमा—अ = ब; ब = अ.

( २ ) रशनोपमा— अ = ब; ब = क; क = ड.

म्हणून उपमेयोपमेचीं आवश्यक अंगें अशीं—

१. उपमेयोपमेंत दोन भिन्न वस्तूंची तुलना असते.

२. ही तुलना दोन वाक्यांत केलेली असते.

३. ती अशा तऱ्हेने की पहिल्या वाक्यांतील उपमेय दुसऱ्या वाक्यांत उपमान होतें, तसेंच पहिल्या वाक्यांतील उपमान हें दुसऱ्या वाक्यांत उपमेय होतें.

४. पहिल्या वाक्यांतील उपमानोपमेयें दुसऱ्या वाक्यांत येतांना त्याच शब्दांत आलीं पाहिजेत.

५. उपमेयोपमेचा हेतु तृतीयसदृश व्यवच्छेद हा असतो.

म्हणून उपमेयोपमेची व्याख्या अशी करतां येईलः----

**जेव्हा एका वाक्यांतील उपमान–उपमेय हीं दुसऱ्या वाक्यांत अनुक्रमें उपमेय–उपमान होतात, किंवा एका वाक्यांतील उपमानोपमेयांचा दुसऱ्या वाक्यांत विपर्यास होतो तेव्हा ते दोन्हीहि वाक्यार्थ मिळून उपमेयोपमा अलंकार होतो.**

उपमेयोपमेचा परिणाम रसिकमनावर पूर्णपणें ठसण्यास एक गोष्ट अवश्य आहे. पहिल्या वाक्यांत उपमान व उपमेय याकरिता जे शब्द वापरले असतील तेच शब्द दुसऱ्या वाक्यात आले पाहिजेत. केवळ समानार्थक शब्द नकोत. उदा.

‘ तुझ्या मुखापरी पद्म, पद्मापरि तुझे मुख ’

या ऐवजी

‘ तुझ्या मुखापरी पद्म, त्वदास्य कमलापरी ’

असें म्हटलें तर, अर्थ तोच असला तरी इष्ट परिणाम होत नाही. अलंकाराची अलंकारता परिणामितेवर अवलंबून असते.

**उदाहरणें:**—( १ ) गगन हें विमल सलिलापरी,
सलिल ही विलसे गगनापरी,
जणुं शरदृतुने समतोलसे,
बनवले नवलें नव आरसे.

—चंद्रशेखर, शारद्वैभव.

वरील पद्यांतील पहिल्या चरणांत गगनाला सलिलाची उपमा दिली असून द्वितीय चरणांत सलिलाला गगनाची उपमा दिली आहे. तिसरी कोणतीहि वस्तु तत्सदृश नाही असा त्यांतील भाव आहे.

पुढील उदाहरणें सुद्धा उपमेयोपमेचीं आहेत.

(२) अये भुवनसुंदरी । दिससि गे जशी जानकी
तिलाहि उपमान तूं, तुजसि ती नसे आन की ॥

—चंद्रशेखर, ' हिंदवंदना '

वरील उदाहरणांत भुवनसुंदरी ( हिंदभूमि ) व जानकी या दोहोंची दोन वाक्यांमध्ये तुलना केलेली आहे. पहिल्या वाक्यांत भुवनसुंदरी हें उपमेय व जानकी हें उपमान आहे, तर दुसऱ्या वाक्यांत जानकी हें उपमेय व भुवनसुंदरी हें उपमान झालें आहे. या दोन वस्तु एकमेकींशीं अत्यंत सदृश असून तिसरी वस्तु यांच्या तुलनेला आणतां येणार नाही असा भाव कळून येतो. म्हणून हें उपमेयोपमेचें उदाहरण झालें.

( ३ ) द्रोणार्जुन तुल्यक्रिय बिंबप्रतिबिंबसेचि ते गमति ।
किति कुरुकटक प्रेक्षक ? वृत्रघ्नाचीहि लोचनें भ्रमती ॥

—मोरोपंत, विराटपर्व.

वरील आर्येच्या पहिल्या ओळींत ' द्रोण व अर्जुन हे अगदीं समप्रतापी होते ' ही गोष्ट सांगितली आहे. पदार्थ व त्याचें प्रतिबिंब यांच्या स्वरूपांत जसा तिळमात्र फरक नसतो त्याप्रमाणे द्रोण व अर्जुन हें पराक्रमाच्या बाबतींत अगदीं एकमेकांना सदृश होते. त्यांची तुलना एकमेकांशींच करतां येण्यासारखी होती असें दर्शविलें आहे. म्हणून येथे उपमेयोपमेचा ध्वनि आहे.

## ( ३ ) अनन्वय

कंकय्या नायडूचा अप्रतिम खेळ पाहून परत फिरलेले दोन मित्र आपसांत बोलत होते. त्यातील एकजण एकदम म्हणाला " क्रिकेट खेळण्यांत कंकय्यासारखा कंकय्याच ! " समजा तुम्ही तेथे असता आणि लागलीच त्याला म्हटलें असतें, ' अरे ! तूं आपल्या भाषणांत अनन्वय अलंकार वापरलास !' तर तो तुमच्याकडे नुसता पाहत राहिला असता. पण भानावर येऊन त्याने उत्तर दिलें असतें " मला तुमचा अनन्वय वगैरे कांही कळत नाही. मला एवढेंच सांगावयाचें आहे की क्रिकेट खेळण्यात कंकय्यासारखा दुसरा कोणीहि नाही. "

अनन्वय अलंकाराचा हेतु द्वितीयसदृशव्यवच्छेद ( दुसरा कोणीहि सदृश नसणें ) हा आहे. कवि हा हेतु कसा साधतो ? कवि वर्णनीय वस्तूची तिच्याशींच तुलना करतो. पण एका वस्तूची त्याच वस्तूशीं तुलना होणें शक्य आहे काय ? खरोखर शक्य नाही; पण कवि तेथे वेगळाच मार्ग काढतो. तो कल्पनेने भिन्नता निर्माण करतो. ' कंकय्यासारखा कंकय्याच ' या वाक्यांत पहिला आणि दुसरा कंकय्या हे वस्तुतः भिन्न नाहीत, ते एकच आहेत. पण कवीने त्यांना भिन्न मानलें आहे. यापैकी **पहिला कंकय्या उपमेय आहे व दुसरा कंकय्या उपमान आहे**. उपमेय असणारा कंकय्या खरा आहे व उपमान होणारा कंकय्या हा उपमेयाहून वेगळा मानून कवीने तो आपल्या समोर उभा केला आहे. हा भेद खरा नसून कल्पनेने ओढूनताणून आणलेला आहे. अशा काल्पनिक भेदास साहित्यशास्त्रांत " **आहार्य भेद** " असें नांव आहे. या आहार्य भेदाच्या आधारावर कवि उपमेची निर्मिति करतो तेव्हाच अनन्वय अलंकार होतो.

### उपमा आणि अनन्वय

यामुळेच अनन्वय उपमेपासून वेगळा मानला आहे. उपमेंतील भेद खरा असतो, आहार्य नसतो. पण अनन्वयांतील भेद खरा नसून आहार्य

असतो. उपमेचा हेतु दोन भिन्न वस्तूंतील सादृश्य दाखविण्याचा असतो तर अनन्वयाचा हेतु द्वितीयसदृशव्यवच्छेद हा असतो. म्हणून अनन्वयांत जें उपमेय तेंच उपमान असतें.

## अनन्वय आणि उपमेयोपमा

अनन्वयांतील औपम्य एकाच वाक्यांत सांगणें ही गोष्ट अवश्य आहे. अनन्वयांत तीच वस्तु उपमान आणि उपमेय होते. पण उपमेयोपमेप्रमाणे ती दोन वाक्यांत नसते. उपमेयोपमेंत तीच वस्तु उपमेय आणि उपमानहि होते. पण उपमेय म्हणून ती एका वाक्यांत असते तर उपमान म्हणून दुसऱ्या वाक्यांत असते. अनन्वयांत तसें नसतें. तीच वस्तु एकाच वाक्यांत उपमान आणि उपमेय होते.

अनन्वयाचें स्वरूप थोडक्यांत असें सांगतां येईल.

१. अनन्वयांत प्रकृत वस्तूची स्वतःशीच तुलना असते

२. तीच वस्तु उपमान व उपमेय होते.

३. अनन्वय आहार्य भेदावर आधारलेला असतो.

४. अनन्वयांत उपमान व उपमेय एकाच वाक्यात आलेलें असतें.

५. अनन्वयाचा हेतु द्वितीयसदृशव्यवच्छेद असतो.

६. उपमान आणि उपमेय त्याच शब्दात आलें पाहिजे.

तेव्हा अनन्वयाची व्याख्या अशी—

**एकाद्या धर्माच्या बाबतींत एकाद्या वस्तूसारखी दुसरी वस्तूच नाही अशा हेतूने, 'त्या वस्तूसारखी तीच वस्तु आहे' अशा प्रकारचें विधान एकाच वाक्यांत केलेलें असतें तेव्हा अनन्वय अलंकार होतो.**

उदा.—

(१) तानसेनासारखा गवई तानसेनच !

वरील उदाहरणांत गाण्याच्या बाबतींत तानसेनाची तुलना तानसेनाशींच केली आहे. म्हणजे तानसेन उपमेय असून तानसेनच उपमानहि आहे.

म्हणजे तानसेनासारखा गवई दुसरा कोणीहि नाही असें दर्शविण्याचा यांत हेतु आहे म्हणून येथे अनन्वय अलंकार झाला.

(२) बोलूं काय अधिक मी ? जरि असती कवि जगीं अमित साच ।
तरि 'देवल ते देवल' वदती ते मान्य कां न मजलाच ? ॥
----गोविंदाग्रज, वाग्वैजयंती.

येथे देवलांच्या कवित्वाबद्दल सांगतांना देवलांची उपमा इतर कोणाशीं न करतां खुद्द देवलांशींच केली आहे. कवित्वाबाबत देवलांची तुलना इतर कोणाशींहि करतां येणार नाही असें सुचविलें आहे. म्हणून हेंहि अनन्वयाचें उदाहरण ठरतें.

(३) घडे दैवें किंचित् कलुष परि संतापति मनीं ।
अशांतें ताराया असति बहु तीर्थें त्रिभुवनीं ॥
जयां प्रायश्चित्तें नसति कुनरां दे गति, अशी ।
समर्था या लोकीं तुजसम अयी ! तूंच असशी ॥
—वामनपंडित, 'गंगालहरी'चें भाषान्तर.

पापी जनांचें पापक्षालन करण्याच्या बाबतींत गंगा नदीचें सामर्थ्य वर्णितांना कवीने गंगेची तुलना गंगेशींच केली आहे. पापक्षालनसामर्थ्यांत गंगेची बरोबरी दुसरें कोणीहि करूं शकत नाही असें सुचविलें आहे. ह्या उदाहरणांत 'गंगा' हें उपमेय असून उपमानहि झालें आहे. म्हणून येथे अनन्वय अलंकार झाला.

## अनन्वय आणि असम

अनन्वय अलंकारांत उपमेय त्याच्या सारखेंच आहे अशा प्रकारचें वर्णन असतें. पण हाच अर्थ कित्येकदा उपमेयास दुसरें उपमानच नाही अशा नकारार्थी वाक्यानेहि दाखवितां येतो. असें वर्णनहि अर्थतः अनन्वयच होय. अनन्वयाच्या या प्रकारास कित्येकांनी वेगळा अलंकार मानून **'असमालंकार'** असें नांव दिलें आहे.

अनन्वयांत सूचित असलेला द्वितीय सदृशव्यवच्छेद शब्दांनी व्यक्त केला म्हणजे असम अलंकार होतो.

( १ ) ताजमहालासारखी सुंदर इमारत त्रिभुवनांत आढळणार नाही.

या वाक्यांत ' ताजमहालासारखी इमारत म्हणजे ताजमहालच ' हाच अर्थ अभिप्रेत आहे, परंतु तो नकारार्थी वाक्य योजून दर्शविला आहे, एवढेंच. सौंदर्याच्या बाबतींत ' ताजमहालाची बरोबरी करणारी इमारत दुसरी कोणतीच नाही ' अशा अर्थाचें विधान केल्यामुळे वरील वाक्यांत असम-नामक अलंकार झाला.

( २ ) ' भले परिशिले सुरासुरनरीं तसे लक्ष मी '
म्हणोत म्हणणार बा ! तुज असा नसेल क्षमी ।
उरीं भृगुपदाहती मिरवतोसि अद्यापि ती,
कवी तव यशःकथा नवसुधानद्या पिती ॥
—मोरोपंत, केकावलि.

' तुझ्यासारखा क्षमाशील दुसरा कोणीहि नाही ' अशा प्रकारचें विधान परमेश्वरास उद्देशून कवीने वरील श्लोकांत केलें असल्यामुळे तेथे असम अलंकार झाला. अर्थतः वरील दोन्ही उदाहरणांत अनन्वयच आहे हें लक्षांत येईलच.

## ( ४ ) स्मरण

स्मरण म्हणजे मागे केव्हा तरी अनुभवलेल्या किंवा पाहिलेल्या गोष्टीची आठवण होणें. ही आठवण अनेक कारणांनी होऊं शकेल. कोणी आपल्याला मुद्दाम आठवण करून देईल. कॉलेजांतील दोन मित्र बऱ्याच काळानंतर भेटल्यावर त्यांना आपले कॉलेजांतील दिवस आठवतील, किंवा मागे पाहिलेल्या गोष्टीसारखीच एखादी गोष्ट दिसल्यावर सारखेपणामुळे त्या मागील गोष्टीची चटकन् आठवण होईल.

यापैकी सादृश्यामुळे झालेल्या स्मरणाचा कवि कित्येकदा रमणीयते-करिता उपयोग करून घेतो. उषःकालीं उमलणारें कमल पाहतांच स्मितयुक्त प्रियामुखाचें चित्र कवीच्या डोळयासमोर उभें राहिलें. अशा वर्णनांत स्मरणालंकार आहे. सापेक्षपणावरून पूर्वानुभूत वस्तूचें स्मरण होणें या आपल्या नेहमीच्याच अनुभवाचा उपयोग कवि आपल्या काव्यांत करून घेतो. अशा प्रकारें स्मरणालंकार सादृश्यावर आधारलेला असतो.

एक गोष्ट पाहून दुसऱ्या गोष्टीचें स्मरण झालें असें जेव्हा कवि आपणास सांगतो तेव्हा त्या दोन गोष्टींमधील सादृश्य तो आपणास दाखवीत असतो. स्मरणाच्या द्वारें दोन गोष्टींतील रमणीय सादृश्याची प्रतीति आणून देणें हा स्मरणालंकाराचा हेतु आहे. अर्थात्, अशा वर्णनांत एक उपमेय व दुसरें उपमान असतें. कित्येकदा उपमानावरून उपमेयाची आठवण होते. जसें, वरील उदाहरणांत कमलावरून प्रियामुखाची कवीला आठवण झाली. पण कित्येकदा उपमेयावरून उपमानाची आठवण होणेंहि शक्य आहे. रणांगणावर ठाण मांडून उभा असलेल्या लवाला सुमंत्राने पाहिलें व त्याला विश्वामित्राच्या यज्ञप्रसंगीं युद्ध करणाऱ्या रामाची आठवण झाली. येथे लव या उपमेयावरून राम या उपमानाची आठवण झाली.

## स्मरण आणि उपमा

स्मरणालंकारांत तात्पर्यतः सादृश्य प्रतीत होतें. उपमानोपमेयांतील सादृश्य हें स्मरणालंकाराचें पर्यवसान होय. उपमेंतील सादृश्य वाच्य असतें. म्हणून स्मरणालंकार उपमेहून वेगळा आहे. शिवाय, उपमेमध्ये उपमान व उपमेय या दोघांचाहि अनुभव वर्तमानकालीन असतो. कमलाप्रमाणे मुख आहे, येथे कमल आणि मुख हीं दोन्हीहि कविमनांत विद्यमान आहेत व त्यावरून कवि सादृश्यप्रतीति करून देतो. पण स्मरणांत एक गोष्ट वर्तमान-कालीन असते तर दुसरी पूर्वी अनुभवलेली असते.

स्मरणालंकारांतील मुख्य गोष्टी अशा—

( १ ) स्मरणालंकार दोन गोष्टींमधील सादृश्यावर आधारलेला असतो. सादृश्यप्रतीति हा स्मरणालंकाराचा हेतु होय.

( २ ) या दोन गोष्टींपैकी एक मागे अनुभवलेली असते, तर दुसरी आता पाहिलेली असते.

( ३ ) आता पाहिलेल्या गोष्टीवरून जशीच्या तशी मागे अनुभवलेल्या गोष्टीची सादृश्यामुळे आठवण होते.

( ४ ) आठवलेली गोष्ट ही उपमेय किंवा उपमानहि असू शकते.

( ५ ) आठवणींत येणारी गोष्ट ही मागे प्रत्यक्ष अनुभवास आली असली पाहिजे.

( ६ ) वाक्यामध्ये स्मरणें— आठवणें, अशा अर्थाच्या शब्दांची योजना असते.

म्हणून स्मरणालंकाराची व्याख्या अशी करतां येईल—

**पूर्वी अनुभवलेल्या पदार्थासारखा दुसरा पदार्थ कालांतराने पाहिल्यावर त्या पूर्वानुभूत पदार्थाची जशीच्या तशी आठवण झाली असें कविप्रतिभानिर्मित वर्णन जेथे असतें तेथे स्मरणालंकार होतो.**

**उदाहरणें:—**

( १ ) " कौतुक कर बघुनी त्यांतें
असती ते जोंवर येथे
सूर्य त्यांस अपुल्या किरणीं
नेईलचि लौकर गगनीं ! "
" जातिल ते लौकर गगनीं "
वदतां गहिंवरली जननी !
गतबाळें तिजला स्मरलीं
डोळयांत आंसवें आलीं !

—केशवसुत, ' दंवाचे थेंब '

जमिनीवर सुंदर दिसणाऱ्या दंवाच्या थेंबांचें वर्णन एक माता आपल्या मुलासमोर करीत आहे. हे दंवाचे थेंब आता लौकरच नाहींसे होतील हें सांगतांना पूर्वी मृत झालेल्या आपल्या सुंदर बालकांचें स्मरण त्या मातेला झालें. 'दंवाचे थेंब' हे येथे उपमेय असून 'गतबाळें' हें उपमान आहे. दंवाचे थेंब मातेला वर्तमानकाळांत डोळ्यासमोर दिसत आहेत, तर गतबाळांचा अनुभव हा भूतकालीन आहे. दंवाच्या थेंबांमधील सौंदर्य, सुबकता व नश्वरता हे गुण पाहून त्याच गुणांनी युक्त असणाऱ्या मृतबाळांची आठवण त्या मातेला झाली. म्हणून येथे स्मरणालंकार होय.

येथे उपमेय 'दंवाचे थेंब' असून त्यांवरून उपमान 'गतबाळें' यांचें स्मरण झाल्याचें वर्णन आहे.

( २ ) अलिपुंज देखतां मज सीतेचे केश लक्ष्मणा ! स्मरती ।
तत्कबरीसम हे शिखिपिच्छकलाप स्वमानसीं भरती ॥
—मोरोपंत, मंत्ररामायण.

रामचंद्र लक्ष्मणासह पंपासरोवरापाशी गेल्यावर तेथील भृंगसमूह पाहून श्रीरामचंद्रास सीतेच्या काळ्याभोर केशकलापाची आठवण झाली. या पद्यांतील प्रथमार्धांत अलिपुंज या उपमानावरून सीतेचे केस या उपमेयाचें स्मरण झालेलें आहे; तर द्वितीयार्धांत 'कबरी' ( वेणी ) या उपमेयावरून 'शिखिपिच्छकलाप' या उपमानाची आठवण आली आहे. अशा प्रकारें स्मरणालंकाराचे दोन्ही प्रकार वरील पद्यांत आले.

( ३ ) येतां एक दिनीं असेंच, दिसली वेली कुठेशी मला ।
होतीं कांहि फुलें तिच्यावर—मना आनंद तैं वाटला ॥
घ्यावीं काढुनि दोन तीन म्हणुनी जों जीव माझा भुले ।
वारा वाहुनिया जरा—भरभरा सारीं उडालीं फुलें ॥
वेलीचीं नव्हतीं फुलें—तिजवरी होतीं कुणी टाकिलीं ।
प्रेमाचे शुकपाठ बोलत नटी, तें आठवे त्या स्थलीं ॥
—गोविंदाग्रज, 'समसमां संयोग की जाहला !'

कवीला वेलीवर जीं फुलें आढळलीं तीं त्या वेलीवर उगवलेलीं, वेलीवर गोसलेलीं अशीं फुलें नव्हतीं. तीं निराळ्या वेलीचीं फुलें त्या वेलीवर पाहून कवीला " प्रेमाचे शुकपाठ बोलणारी नटी " या तत्सदृश गोष्टीचें स्मरण झालें. नटीच्या तोंडचे शब्द हे तिच्या हृदयांतून निघालेले नसून लेखकाच्या लेखणींतून निघालेले असतात. त्या फुलांचा व वेलीचा जो संबंध तोच नाटकांतील भाषणाचा व नटीचा होय.

स्मरणालंकाराचें निश्चित स्वरूप वर वर्णन केलें आहे. पण आलंकारिकांनी या अलंकाराचें क्षेत्र अधिक वाढविलें आहे. उदाहरणार्थ, जेथे पाहिलेली गोष्ट स्मरलेल्या गोष्टीशीं सदृश नसतां तत्सदृश गोष्टीशीं संबंधित असते तेथेहि स्मरणालंकार होतो असें जगन्नाथ म्हणतो. उदा. कवीला चातक दिसतो त्यावरून त्याला मेघाची आठवण होते व त्यावरून मेघश्याम श्रीकृष्णाची आठवण होते. येथे चातक या पाहिलेल्या पदार्थाशीं श्रीकृष्णाचें सादृश्य नाहीं. श्रीकृष्णसदृश अशा मेघाशीं चातक संबंधित आहे एवढेंच. तसेंच याच्या उलटहि प्रकार असूं शकतो. जसें; जलक्रीडा करतांना एक रमणी श्रीकृष्णाला दिसली. ती त्याला लक्ष्मीसारखी भासली व त्यावरून त्याला समुद्रमंथनाची आठवण झाली. येथे वस्तुतः दोन स्मरणें आहेत व त्यांपैकी एक स्मरण सादृश्यमूलक आहे.

विश्वनाथाने साहित्यदर्पणांत स्मरणालंकाराबद्दल पुढील मताचा उल्लेख केला आहे. कित्येकदा एक गोष्ट पाहून तिला विसदृश असलेल्या गोष्टीचें स्मरण होतें तेव्हाहि स्मरणालंकार होतो. उदा. सीतेला वनवासांत होणारे कष्ट पाहून रामाला तिने अयोध्येंत अनुभवलेल्या सुखाच्या दिवसांची आठवण होई व त्याला वाईट वाटे.

या सर्व गोष्टींचा विचार केला म्हणजे एक गोष्ट स्पष्ट दिसते. प्रत्यक्ष सदृश गोष्टीचें स्मरण असो की सदृश संबंधित गोष्टीवरून स्मरण होवो, स्मरणालंकारांत सादृश्याचाच खेळ आहे हें खास. विश्वनाथाने निर्देशिलेल्या मतांत सुद्धा सादृश्य हें विरोधित्वाने येतेंच.

सादृश्याशीं कोणत्याहि प्रकारें संबंध नसतां जर स्मरण झालें तर तेथे स्मरणालंकार होत नाही.

उदा.:––रामाला एकाएकी वनवासांतील दिवस आठवले, तर तेथे स्मरणालंकार नाही. पार्वतीची मागणी घालण्यास हिमालयाकडे कोणाला पाठवावें याचा विचार करतांना शंकराला सप्तर्षींची आठवण झाली. येथेहि स्मरणालकार नाही.

स्मरणालंकार व्यंग्यहि असू शकतो.

उदा.:—

बहु लाजवीत होतों करि–केसरि–कीर–केकि–हरिणां मी।
हांसत कर्म करावें, भोगावें रडत तेंचि परिणामीं ॥
--मोरोपंत, वनपर्व.

सीतेला रावणाने पळवून नेलें तेव्हा रामाने केलेला विलाप यांत वर्णिला आहे. " सीतेची मंदगति, कृशकटि, सरल नासिका, कृष्ण केशकलाप आणि चंचल, काळे डोळे, यांचें सान्निध्य असल्यामुळे यथाक्रम गज, सिंह, पोपट, मोर आणि हरिण यांना तुच्छ मानण्यांत मला आनंद वाटत होता, परंतु सीतेच्या वियोगामुळे आता गज, सिंह वगैरेंना पाहून सीतेच्या त्या त्या गुणाचें दुःखद स्मरण होतें. " येथे स्मरणालंकार उघड नसून व्यंग्य स्वरूपाचा आहे.

**उपमेयोपमा, अनन्वय, असम व स्मरण यांचीं अभ्यासार्थ उदाहरणें:––**

(१) अरिहरिपासुनि सुटतां करि करिभूपति पलायन त्वरित।
स्मरलें सुरासि तेव्हां कालयवन भीत शौरिचें चरित ॥
—मोरोपंत, कर्णपर्व.

(२) आम्रा ! खरोखर तुझ्यासम तूंच रम्य !
—रे. टिळक.

(३) लावण्यें असती असोत कितिही रंभा, रती भारती,
इंदू ! तूंच तुझ्यापरी अशि करी ही भारती आरती;
—माधव ज्यूलियन.

(४) जे पूर्वदक्षिणोत्तरपश्चिमदेशीय वीर भूरहि म्यां ।
वधिले, संशप्तकहो; त्रिजगीं माझ्या नसे तुळा महिम्या ॥
—मोरोपंत.

(५) कर्णासारखा दानशूर कर्णच !
(६) ज्ञानेश्वरीच्या तोडीचा ग्रंथ जगांत आढळायचा नाही !
(७) धर्मराज म्हणे, ' देवऋषी ! । ज्ञानविज्ञान तपोराशी ।
तुळितां तुझिया सामर्थ्यासी । तुजसारिखा तूं एक ' ॥
—मुक्तेश्वर, सभापर्व.

(८) कौमुदीसमा तनु तुझी खरी । कौमुदी तरी तव तनूपरी ॥
नेत्र अंबुजासमचि भासती । अंबुजें तुझ्या नयनतुल्य तीं ॥
—( अलंकारचंद्रिका )

## (५) रूपक

सादृश्यप्रतीतीवर आधारलेले चार अलंकार आपण आतापर्यंत पाहिले. ते अलंकार परस्परांपासून भिन्न असले तरी त्यांच्यांत एक साम्य आहे तें असें की ज्या दोन वस्तूंतील सादृश्य त्यांत दाखविलेलें असतें त्या दोन वस्तु भिन्न आहेत ही जाणीव सादृश्यप्रतीतीबरोबरच आपल्या मनांत असते. ' मुख कमळासारखें आहे ' किंवा ' कमल दिसतांच मुखाचें स्मरण झालें ' यांत त्या दोहोंतील साम्याची प्रतीति आपल्याला येते. त्याबरोबरच मुख आणि कमल या वस्तु भिन्न आहेत हीहि जाणीव आपणाला असते. अनन्वयांत खरोखरीचा भेद नसला तरी कवि मुद्दाम त्यांना भिन्न मानतो. एकूण येथेहि भेद आहेच. अशा प्रकारें या चारहि अलंकारांत भिन्न

वस्तूंमधील सादृश्यप्रतीति हा साधारण गुण आहे. म्हणून त्यांना '**भेदप्रधान सादृश्य प्रतीतिमूल**' अलंकार म्हटलें आहे.

पण सादृश्यावर आधारलेल्या अलंकारांचा दुसराहि एक वर्ग आहे. त्यांत कवीचा प्रयत्न दोन वस्तूंमध्ये अभेद आहे असें दाखविण्याचा असतो. या अलंकारांना आपण **अभेदप्रधान सादृश्य प्रतीतिमूल** अलंकार म्हणतात. ( कोष्टक पाहा ). या अलंकारांचा आता आपण अभ्यास करूं.

सादृश्यावर आधारलेल्या अशा अभेदप्रधान अलंकारांत रूपक हा प्रमुख अलंकार आहे. रूपक अलंकारांत लक्षणाशक्तीचा खेळ आहे. प्रस्तावनेंत गौणी सारोपालक्षणा म्हणून जी सांगितली ती रूपकाचा आश्रय आहे:—' स्त्रिया म्हणजे गरीब गायी ' ही गौणी सारोपा लक्षणा होय. या वाक्यांत स्त्रीवर गाय या पदार्थाचा ( समान गुणांच्या आधारावर ) आरोप केला आहे. हा असा आरोपच रूपकाच्या मुळाशीं आहे.

पण गौणी लक्षणेंतील असा प्रत्येकच आरोप रूपकाचा विषय होत नाही. त्या आरोपांतून सौंदर्य प्रतीत झालें पाहिजे. म्हणजेच तो आरोप वैचित्र्यपूर्ण पाहिजे.

सादृश्यावरून केलेला हा आरोपच रूपकाचा विषय होऊं शकतो. शुद्ध सारोपालक्षणा या लक्षणेंतहि आरोप असतो. पण तो आरोप सादृश्यावर आधारलेला नसतो. उदा. ' तूप म्हणजे रूपच होय ' येथे रूपाचा तुपावर केलेला आरोप सादृश्यमूलक नाही. तो हेतुमूलक आहे. येथे रूपक अलंकार होत नाही, ही गोष्ट मुद्दाम लक्षांत ठेवली पाहिजे. नाहीतर रूपक अलंकार ओळखतांना गोंधळ होतो. ' मुख हें चंद्रच होय. ' येथे रूपक आहे. कारण येथील चंद्राचा मुखावरील आरोप त्यामधील सादृश्यामुळे झालेला आहे. उलट ' तूप हें रूपच होय. ' यांत रूपाचा तुपावरील आरोप हा कार्यकारणभावावर आधारलेला आहे. ' तूप हें रूप येण्याचें कारण आहे ' असा त्यांत आशय आहे. म्हणून तें रूपक नाही.

सादृश्याच्या आधारावर केलेला आरोपच्च रूपकाचा विषय होऊं शकतो. इतर कोणताहि नव्हे.

ही गोष्ट लक्षांत न ठेवली तर रूपक आणि अतिशयोक्ति यांत गोंधळ होतो. ' हा राजा म्हणजे शत्रूंचें भयच ' येथे रूपक असल्याचा भास होतो. पण खरोखर येथे रूपक नाही, अतिशयोक्ति आहे हें थोड्याशा विचारान्तीं दिसेल. राजा व भय यांत सादृश्यसंबंध नाही. तो हेतु आहे, राजा हा शत्रूचा भयहेतु आहे. याचें विशेष विवेचन पुढे अतिशयोक्तींत येईल.

## रूपक व उपमा

रूपक हा अभेदप्रधान अलंकार आहे. ' मुख हें चंद्रच आहे ' असें कवि म्हणतो तेव्हा त्या दोहोंमधील सादृश्यावर कवीला त्यांचा अभेद दाखवावयाचा असतो. मुख आणि चंद्र यांच्यांत इतकें साम्य आहे की त्यांच्यांत मुळी भेद नाहीच असें सांगण्याचा कवीचा हेतु असतो. ' मुख चंद्रासारखें आहे ' यांत कवीला हा अभेद दाखवावयाचा नाही. त्यांत त्याला त्या दोहोंमधील केवळ साम्य दाखवावयाचें असतें. रूपकांत ते दोन पदार्थ अभिन्न आहेत. असें दाखवावयाचें असतें. हाच उपमा व रूपक यांच्यामधील मुख्य भेद होय.

उपमा आणि रूपक यांचा आणखी एका बाबतींत गोंधळ होऊं शकतो. ' करकमल ' येथे उपमा मानावी की रूपक मानावें असा कित्येकदा संशय निर्माण होतो. ' करकमल ' हा समास दोन प्रकारें सोडवितां येतो. ' कमलासारखा कर ' असा समास घेतला तर तो उपमित समास होय व येथे उपमा होते. उलट ' कर हेंच कमल ' असा समास सोडविला तर तो रूपक समास होतो व तेथे रूपक अलंकार होतो. एखाद्या ठिकाणी संदर्भाला अनुसरून समास कसा सोडवावा हें ठरविलें म्हणजे मग अशा ठिकाणी उपमा मानावी की रूपक मानावें हें ठरवितां येतें.

येथे आणखी एक गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. रूपकांत एका शब्दार्थाचा दुसऱ्या शब्दार्थावर आरोप केलेला असतो. 'मुखचंद्र' या रूपकांत मुख या शब्दार्थावर चंद्र या शब्दार्थाचा आरोप केलेला आहे. पण एका वाक्यार्थाचा जेव्हा दुसऱ्या वाक्यार्थावर आरोप केला जातो तेव्हा निदर्शना अलंकार होतो. वाक्यार्थ निदर्शना हा एक रूपकाचाच स्वतंत्र अलंकार झालेला प्रकार होय असें म्हणतां येईल. ( विशेष विवेचन निदर्शनेंत पाहा. )

**रूपक आणि स्मरण**—रूपक आणि स्मरण हे दोन्हीहि अलंकार सादृश्यावर आधारलेले असून त्यांत दोन्हीहि वस्तु एकाच वेळीं मनांत येतात. पण स्मरणांतील सादृश्य स्मृतीच्या द्वारें प्रतीत होतें; तर रूपकांतील सादृश्य आरोपांतून प्रतीत होतें. दुसरें म्हणजे स्मरणात दिसलेली वस्तु उपमान किंवा उपमेयहि असू शकते. पण रूपकांत दिसणारी वस्तू ही उपमेयच असते.

**रूपकाच्या आवश्यक गोष्टी.**

( १ ) रूपकांत उपमानाचा उपमेयावर आरोप केलेला असतो.

( २ ) हा आरोप सादृश्यावर आधारलेला असून, त्यांत गौणी सारोपालक्षणा असते. इतर कोणत्याहि संबंधावर तो आरोप नसतो.

( ३ ) दोन वस्तूंमधील अभेद दाखविणें हा यांत हेतु असतो.

( ४ ) हा अभेदारोप आहार्य असतो, वस्तुनिष्ठ नसतो.

( ५ ) आरोप शब्दगत असला पाहिजे, वाक्यगत नसावा.

( ६ ) यांत आरोप असल्यामुळे सादृश्यवाचक शब्द योजलेले नसतात.

**व्याख्या—उपमेय व उपमान यांच्यांतील अतिसाम्यामुळे जेथे उपमेय उपमानच आहे, किंवा त्यांच्यांत अभेद आहे असें सांगितलेलें असतें, किंवा जेथे उपमानाचा उपमेयावर सादृश्याच्या आश्रयाने आरोप केलेला असतो तेथे रूपक अलंकार होतो.**

उदाहरणें:—

(१) आमचें कॉलेज म्हणजे नंदनवनच आहे.

वरील वाक्यांत उपमेय 'कॉलेज' व उपमान 'नंदनवन' या दोहोंत फरक नाही, त्या दोहोंत अभेद आहे असें व्यक्त केलें आहे. 'कॉलेज' या उपमेयावर 'नंदनवन' या उपमानाचा आरोप केलेला आहे हा आरोप आनंद-दायकत्वाच्या सादृश्यावर आधारलेला आहे. मात्र उपमेंतल्या प्रमाणे सादृश्य-वाचक शब्द तेथे योजलेला नाही. म्हणून रूपक अलंकाराचें हें उदाहरण होय.

(२) भवसागर तरून जाणें फार कठीण असतें.

ह्या वाक्यांत 'भवसागर' हा कर्मधारय समास होय. 'भव हाच सागर' असा त्याचा विग्रह होतो. 'भव' हा शब्द उपमेय असून 'सागर' हा शब्द उपमान आहे. दुर्लंघ्यतेच्या सादृश्यावर सागराचा आरोप भवावर केलेला असल्यामुळे हें रूपक अलंकाराचें उदाहरण झालें.

एखाद्या ठिकाणी रूपक आहे की उपमा आहे हें ठरविण्याचा सोपा मार्ग म्हणजे त्या वाक्यांत एकंदर रीतीने उपमेयाला प्राधान्य आहे की उपमानाला प्राधान्य आहे हें पाहावें. उपमेयाला प्राधान्य असल्यास उपमा होते. उलट उपमानाला प्राधान्य असेल तर रूपक होतें.

'काव्य हें अमृतासारखें मधुर आहे.'

या उपमेंत 'काव्य' या उपमेयाला प्राधान्य आहे परंतु पुढील वाक्य पाहा—

काव्यामृत देवांनाहि दुर्लभ होय.

या रूपकांत 'अमृत' या उपमानाला प्राधान्य आहे.

विशेषेकरून उपमा किंवा रूपक जर समासान्तर्गत असेल तर गोंधळ होण्याचा संभव असतो. अशा वेळीं संदर्भावरून उपमेय व उपमान यांपैकी कोणाला प्राधान्य आहे हें पाहून तो अलंकार ठरवावा लागतो.

उदाहरणार्थः—

माझा मनोमधुप लुब्ध बहूत झाला,<br>
तूझे पदांबुजयुगीं रहिवास केला ।<br>
काकूळती बहुत याजनिमित्त येतें,<br>
कृष्णा, तुझे चरणपल्लव हे धरीतें ॥

—सामराज, रुक्मिणीहरण ५।९०

वरील श्लोकांत 'पदांबुज' आणि 'चरणपल्लव' या शब्दांमध्ये उपमा आहे की रूपक आहे हें वाक्यार्थावरून ठरवावें लागतें. 'पदांबुज-' मध्ये रूपक मानावें लागेल, कारण प्रथमचरणांत मनाला मधुप म्हटलें आहे, आणि मधुप हा चरणाच्या आश्रयाने राहत नसून कमलांत राहतो, म्हणून 'अंबुज' या उपमानाला येथे प्राधान्य आहे. तेव्हा हा रूपक अलंकार होय. उलट 'चरणपल्लव' या शब्दांत 'पल्लवासारखे कोमल चरण' अशी उपमा आहे. कारण रुक्मिणीने श्रीकृष्णाच्या चरणाचा आश्रय केला, पल्लवाचा नव्हे. म्हणजे 'चरण' या उपमेयाला प्राधान्य असल्यामुळे येथे उपमा अलंकार झाला.

## रूपकाचे प्रकार

रूपकाचे एकूण प्रकार सहा आहेत.



काव्यामध्ये रूपकाचा उपयोग करतांना कवि तो वेगवेगळ्या प्रकारें करतो. कित्येकदा उपमेयावर उपमानाचा आरोप करूनच कवि थांबेल; तर कित्येकदा अधिक सौंदर्य निर्माण करण्याकरिता उपमेयाचीं अंगें कल्पून त्यांवर उपमानांच्या अंगांचाहि आरोप तो करील. त्यामुळे निरंग आणि सांग रूपक असें रूपकाचे दोन प्रकार होतात. " त्याच्या हृदयांत क्रोधाग्नि भडकला " येथे क्रोधाग्नि हें **निरंग रूपक** आहे. पण " कुरुक्षेत्र हीच वेदी, कृष्ण हाच अध्वर्यु, युधिष्ठिर हाच यजमान आणि कौरव हेच पशु ज्यामध्ये आहेत अशा रणयज्ञास प्रारंभ झाला. " या वाक्यांत रणावर यज्ञाचा आरोप हें मुख्य रूपक असून त्या अनुषंगाने रणाच्या विविध अंगांवर यज्ञाच्या विविध अंगांचा आरोप करून गौण रूपकें साधलीं आहेत. येथे रणयज्ञ हें रूपक एकटें आलेलें नसून अंगांसहित आलेलें आहे म्हणून याला **सांगरूपक** असें म्हणतात.

आणखी एक उदाहरण पाहूं. कृष्णाच्या सैन्यांतील रथांचें वर्णन करतांना विठ्ठल कवि म्हणतो—" तीं जाहजें रणसमुद्र तरावयाचीं " येथे दोन रूपकें आहेत. रथांना जहाज म्हटलें आहे आणि रणाला सागर म्हटलें आहे; पण यांचा संबंध असा आहे की रणावर केलेला समुद्राचा आरोप हा रथावरील जहाजाच्या आरोपाचें कारण आहे. हें **परंपरिक रूपक** होय.

निरंग रूपक आणि सांगरूपक यांच्यांतील भेद कळणें सोपें आहे. पण सांगरूपक आणि परंपरित रूपक यांच्यांतील फरक नीट लक्षांत आला पाहिजे, नाहीतर गोंधळ होतो. सांगरूपकांत एक प्रधान रूपक असून बाकीचीं गौण रूपकें असतात. तसेंच परंपरित रूपकांतहि एक प्रधान व दुसरें गौण रूपक असतें. पण त्यांच्यांत फरक हा आहे की सांगरूपकांत प्रधान रूपकाच्या अनुषंगाने गौण रूपकें आलेलीं असतात. प्रधान रूपक हें गौण रूपकांचें कारण असतें. उलट परंपरित रूपकांत गौणरूपक प्रधान रूपकाचें कारण होतें. वर दिलेल्या उदाहरणावरून हें सिद्ध होईल. ' रणयज्ञ ' हें प्रधान रूपक असून त्याच्या अनुषंगाने कृष्णाला अध्वर्यु, युधिष्ठिराला यजमान इत्यादि म्हटलें आहे. म्हणजे हीं गौण रूपकें प्रधान रूपकावर

अवलंबून आहेत. उलट 'तीं जाहजें रणसमुद्र तरावयाचीं।' यांत रथांवर जहाजाचा आरोप हें प्रधान रूपक आहे कारण येथे कवीला रथाबद्दल बोलावयाचें आहे. पण या रूपकाचें स्वारस्य रणसमुद्र या गौण रूपकावर आश्रित आहे म्हणून येथे गौण रूपक हा प्रधान रूपकाचा हेतु आहे.

तेव्हा रूपकाच्या या मुख्य तीन प्रकारांचे स्वरूप असें सांगतां येईल—

**(१) निरंगरूपक--जेव्हा अंगांचीं रूपकें न साधतां कवि एक किंवा अधिक प्रधान रूपकें साधतो तेव्हा निरंग रूपक होतें.**

**(२) सांगरूपक--जेव्हा एकादी वस्तु व तिचीं अंगें यांच्यावर उपमान वस्तु व तिचीं अंगें यांचे वेगवेगळे आरोप केलेले असून मुख्य वस्तूवरील आरोप प्रधान असतो व अंगांवरील आरोप गौण असतात तेथे सांगरूपक** होतें.

**(३) परंपरित रूपक--एक रूपक साधल्यामुळे दुसरें रूपक सिद्ध होतें किंवा एक रूपक दुसऱ्या रूपकाचें कारण होतें; आणि कारण रूपक गौण असून कार्य रूपक प्रधान असतें; अशा रूपक परंपरेला परंपरित रूपक म्हणतात.**

**निरंगरूपकाचीं उदाहरणें:--**

(१) "पुढे कैलासवासी नानासाहेब व भाऊसाहेब प्रचंड प्रतापसूर्य असे झाले की असे कधी झाले नाहीं."

—गोविंदराव काळे यांचे नाना फडणिसास पत्र.

वरील वाक्यांत नानासाहेब व भाऊसाहेब हीं उपमेयें असून त्यांवर सूर्य हें उपमान आहे येथे उपमानोपमेयांत अभेद कल्पून, सूर्याचा आरोप उपमेयावर केला आहे हें निरंगरूपक होय.

(२) ऊठ पुरुषोत्तमा ! वाट पाहे रमा ।
दावि मुखचंद्रमा सकळिकांसी ॥

—श्रीकृष्णाची भूपाळी, कृष्णकेशव.

वरील उदाहरणांत मुख हें एकच उपमेय असून चंद्रमा हें एकच उपमान आहे व त्यांचा अभेद वर्णिला आहे, म्हणून येथे निरंगरूपक झालें.

**सांगरूपकाचीं उदाहरणें:—**

(१) साहित्यवृक्षाच्या विविध शाखांवर फुलणारीं ग्रंथकुसुमें अगणित आहेत; वाचकभृंगांनी त्या असंख्य ग्रंथपुष्पांतील ज्ञानमधु यथेच्छ प्राशन करावा.

या उदाहरणांत 'साहित्य' हें मुख्य उपमेय व 'वृक्ष' हें मुख्य उपमान आहे. ग्रंथ, वाचक व ज्ञान हीं साहित्याचीं अंगें (उपमेयें) आहेत व त्यांना अनुक्रमें कुसुमें, भृंग व मधु हीं वृक्षाचीं अंगें उपमानें म्हणून घेतलीं आहेत व अशा प्रकारें साहित्यरूप वृक्षाचें वर्णन केलें आहे. या उदाहरणांत साहित्यावर केलेला वृक्षाचा आरोप हा प्रधान असून त्याच्या विविध अंगांवर केलेले तीन वेगवेगळे आरोप हे गौण आहेत. म्हणून हें सांगरूपकाचें उदाहरण झालें.

(२) स्वहृदय फाडुनि निज नखरीं
चिवट तयाचे दोर
काढुनि, गोफण वळितों ही
सत्त्वाचा मी चोर !
त्वेषाचा त्या दोराला
घट्ट भरुनियां पीळ,
गांठ मारितों वैराची
जी न पीळ दवडील !
गांठ मारुनी वैराची
गोफण केली छान;
कठिण शब्द या धोंड्यांनी
करितों हाणाहाण !

—केशवसुत 'गोफण केली छान !'

येथे हृदयावर केलेला गोफणीचा आरोप हा प्रधान आहे. त्वेषावर पिळाचा, वैरावर गांठीचा आणि शब्दांवर धोंड्यांचा असे जे इतर आरोप आहेत ते मुख्य रूपकावर आधारलेले परंतु गौण स्वरूपाचे आहेत. येथेहि सांगरूपक झालें.

(३) अहंकार–द्रुम दुर्योधन । शकुनी शाखा, स्कांदी कर्ण ।
पुष्पफळें दुःशासन । मूळ राजा धृतराष्ट्र ॥

—मुक्तेश्वर

या ओवींत दुर्योधन या उपमेयावर केलेला द्रुम या उपमानाचा आरोप मुख्य आहे. उपमेयाच्या निरनिराळ्या अंगांना निरनिराळीं उपमानें घेऊन जीं रूपकें साधलीं आहेत तीं गौण आहेत. म्हणून हेंहि सांग-रूपक होय.

(४) ज्ञानेश्वरीच्या प्रारंभींचें साहित्यावर केलेलें श्रीगणेशमूर्तीचें रूपक हें सांगरूपकाचें अत्युत्कृष्ट उदाहरण होय. स्थलमर्यादेस्तव तें येथे देणें शक्य नाही. रसिकांनी तें मुळांतून वाचून पाहावें.

**परंपरित रूपकाचीं उदाहरणें:—**

( १ ) ' पण सुदैवाने ब्रिटिश सरकारच्या राजनीतीच्या विषारी जंगलांत प्राचीन–वस्तुसंशोधक बुद्धीची सुवासिक मंजरी एकादे ठिकाणी तरी फुललेली आढळते. '

—न. चिं. केळकर; शनिवारवाड्याचा जीर्णोद्धार.

येथे केळकरांना संशोधकाच्या बुद्धीबद्दल बोलावयाचें आहे. या बुद्धीला ते मंजरी म्हणतात. या रूपकाचें स्वारस्य कळण्यास ब्रिटिश राजनीतीला विषारी जंगल म्हणणें हें रूपक कारणीभूत होतें. अशा प्रकारें ' बुद्धिरूपी मंजरी ' या प्रधान रूपकाचें स्वारस्य गौण रूपकावर आश्रित असल्यामुळे येथे परंपरित रूपक झालें आहे.

(२) " देवा ! केव्हा परवशपणाची निशा ही सरून
स्वातंत्र्याचा द्युमणि उदया यावयाचा फिरून ! "
—केशवसुत ' एका भारतीयाचे उद्गार

स्वातंत्र्यावर द्युमणीचा ( सूर्याचा ) आरोप येथे कवीला प्राधान्याने अभिप्रेत आहे. हें रूपक सिद्ध होण्यासाठी परवशपणावर निशेचा आरोप हें रूपक कारण झालें आहे. म्हणून येथे परंपरित रूपक झालें. रूपकाच्या मुख्य तीन प्रकारांचें स्वरूप आपण पाहिलें. या प्रत्येक प्रकाराचे आणखी उपप्रकार होतात, ते आता पाहूं.

## निरंगरूपकाचे प्रकार

निरंगरूपकामध्ये एकच किंवा अनेक प्रधान रूपकें असतात. याचे दोन भेद आहेत.—(१) शुद्ध रूपक, आणि (२) माला रूपक.

**शुद्ध रूपक—जेथे अवयवांचीं रूपकें न साधतां एकच शुद्ध आणि सरळ रूपक साधलेलें असतें किंवा अनेक शुद्ध, सरळ रूपकें साधलेलीं असून तीं सर्व प्रधान असतात तेथे शुद्ध रूपक हा प्रकार होतो.**

(१) नोकराचें तें धडधडीत खोटें भाषण ऐकून गोविंदरावांचा क्रोधाग्नि भडकला !

या वाक्यांत क्रोधावर अग्नीचा आरोप केला असून त्यायोगें एकच सरळ रूपक साधलें आहे. म्हणून हें शुद्ध निरंगरूपक होय.

(२) येणेपरी परिसतां अतिदीन वाचा
हेलावला नळ पयोधि दयारसाचा
सोडी म्हणे " विहर जा अथवा फिराया
राहें यथा निजमनोरथ हंसराया ! "

—रघुनाथपंडित, दमयंतीस्वयंवर

वरील श्लोकांत नळ या एका उपमेयावर दयारसाचा पयोधि या एका उपमानाचा आरोप केला आहे. त्या दोन वस्तूंत अभेद दर्शविला आहे. त्या वस्तूंच्या इतर अंगांचा यांत उल्लेख नाही. म्हणून हें शुद्धनिरंगरूपक झालें.

(३) रे बालिपुष्टा, दुष्टा, कैसा हंसासमेत उडशील।
साहस करितां सहसा स्पष्ट व्यसनार्णवांत बुडशील ॥
—मोरोपंत, कर्णपर्व

या आर्येंत व्यसन (संकट) हें एकच उपमेय असून अर्णव (समुद्र) हें एकच उपमान आहे व त्यांचा अभेद वर्णिला आहे, म्हणून येथेहि शुद्धनिरंगरूपक झालें.

**मालारूपक—जेथे एकाच उपमेय वस्तूवर, एकामागून एक अनेक उपमानें आरोपित केलीं जातात व तीं सर्व प्रधान असतात तेथे मालारूपक होतें.**

( १ ) इंदू रूपमतीच तूं जिवलगे ! तूं पद्मिनी सुंदरी,
विश्वामित्रसुता, निसर्गभगिनी, उत्फुल्ल कादंबरी,
सावित्री, अथवा उदात्तचरिता, वा निस्तुला जानकी
किंवा तूं चिरयौवना प्रिय उषा, आशा जगत्प्राण की ॥
—माधव ज्यूलियन, 'विरहतरंग'

या श्लोकांत 'इंदु' ही स्त्री उपमेय आहे. तिचें वर्णन करतांना कवीने एकामागून एक अशा कितीतरी उपमानांचा तिच्यावर आरोप केला आहे. या ठिकाणची अनेक उपमानांची माला असून सर्वच उपमानें प्रधान आहेत. म्हणून हें मालानिरंगरूपक झालें.

( २ ) सदाशिवाचा उजवा बाहू, राहू रिपुस्त्रीमुखविधुचा
बाऊ केवल म्लेंच्छजनांचा, भाऊ माधवरावाचा
बेटा ब्राह्मण बादशहाचा, पेटा साचा वाघाचा
वीर कुलांतिल गुलाबगोटा, वाली मोठा धर्माचा
ताण जयाची द्रौणीवर उद्राण आणिता आर्याला
विजयाचा विश्वास; असा विश्वास, लागला शर त्याला ॥
—गडकरी, वाग्वैजयंती 'पानिपतचा फटका'

वरील उदाहरणांत गडकऱ्यांनी विश्वासरावाचें काव्यमय वर्णन केलें आहे. ' विश्वास ' हें एकच उपमेय असून उपमानें मात्र अनेक आहेत. ' रिपुस्त्री-मुखविधुचा राहू ' ' वाघाचा पेटा ' ' गुलाबगोटा ' या अनेक उपमानांचा ' विश्वास ' या एकाच उपमेयावर आरोप केलेला आहे. म्हणून हें माला-निरंगरूपकाचें उदाहरण होय.

## सांगरूपकाचे प्रकार

सांगरूपकामध्ये मुख्य उपमेय वस्तु व तिचीं अंगें यावर उपमान वस्तु व तिचीं अंगें यांचा आरोप केलेला असतो. यालाहि दोन प्रकार होतात. ते असे—(१) समस्तवस्तुविषयसांगरूपक, आणि (२) एकदेशविवर्ति सांगरूपक.

**समस्तवस्तुविषय**:—येथे वस्तु याचा अर्थ उपमान वस्तु असा आहे. विषय याचा अर्थ शब्दविषय, म्हणजे शब्द—प्रतिपाद्य, किंवा शब्दानें सांगितलेलें. तेव्हा समस्तवस्तुविषयरूपक म्हणजे **ज्या रूपकांत उपमेया-प्रमाणेच उपमानेंहि शब्दांनी स्पष्ट निर्देशिलीं आहेत असें रूपक. सांगरूपकांत एक मुख्य उपमेय व इतर अंगभूत उपमेयें असतात. त्यांच्यावर उपमानांचा आरोप करतांना मुख्य उपमानाबरोबरच सर्व अंगभूत उपमानें शब्दांनी स्पष्ट सांगितलेलीं असतात तेव्हा तें समस्तवस्तुविषयसांगरूपक होतें.**

उदा.—(१) सांगरूपकाचें मागे दिलेलें पहिलें उदाहरण समस्तवस्तु-विषय रूपकाचें होय. तेथे साहित्य हें मुख्य उपमेय असून वृक्ष हें मुख्य उपमान आहे व मुख्य उपमेयाच्या अंगांवर मुख्य उपमानाच्या अंगांचे सर्व आरोप शब्दवाच्य आहेत.

(२) साम्राज्य भू—जलनिधींवर चालवून
अंधार हाच रिपु या दुर घालवून
चंडप्रताप भगवान् दिनराज चाले
अस्ता, सवे किरण—सेवकही निघाले ॥

—वा. वा. खरे ' सूर्यास्त '

वरील श्लोकांत सूर्याचें वर्णन अभिप्रेत आहे. त्यांत सूर्याला अत्यंत प्रतापी असा ‘ दिनराज ’ म्हटलें आहे. आणि सूर्याचें अंग जे किरण त्यांवर राजसंबंधित अशा सेवकांचा आरोप केला आहे. म्हणून येथे समस्त-वस्तुविषयसांगरूपक झालें.

( २ ) ममत्वाचीं खालतीं आलवाल ।
वरुनि विरहाचें ऊनही विलोल ।
आसवांचें जल सदा मिळत आहे ।
प्रीतिलतिका जगतांत वाढताहे ॥

—रे. टिळक ‘ सुशीला ’

येथे प्रीति हें मुख्य उपमेय व लतिका हें मुख्य उपमान आहे. ममत्व, विरह व आसवें हीं प्रीतीचीं अंगें ( उपमेयें ) आहेत व त्यांना अनुक्रमें आलवाल ( आळें ) ऊन व जल हीं लतिकेचीं अंगें उपमानें म्हणून घेतलीं आहेत. म्हणून हेंहि समस्तवस्तुविषयसांगरूपक झालें.

( ३ ) संतवाङ्मयामध्ये व विशेषतः ज्ञानेश्वरीमध्ये उत्तमोत्तम सांग-रूपकें जागोजाग आढळतात. ज्ञानेश्वरींतील सांगरूपकाचें पुढील एक सुंदर उदाहरण पाहाः—

“ जेथ तद्ब्रह्मवाक्यफळें । जिये नानार्थरसें रसाळें ।
बहकताती परिमळें । भावाचेनि ॥
सहज कृपा–मंदानिळें । कृष्णद्रुमाचीं वचनफळें
अर्जुनश्रवणाचिये खोळें । अवचित पडिलीं ॥
तियें प्रमेयाची हो कां वळलीं । की ब्रह्मरसाच्या सागरीं चुबुकळिलीं ।

मग तैसीचि कां घोळिलीं । परमानंदें ॥
झडकरी अनुमानाचेनि करतळें । घेऊनि तिये वाक्यफळें ।
प्रतीतिमुखीं एके वेळे । घालूं पाहे ॥
तव विचाराचिया रसना न दाटती । परी हेतूच्या दशनीं न फुटती ।
ऐसें जाणोनि सुभद्रापती । चुंबीचिना ” •

ज्ञानेश्वरी, अध्याय ७ वा. ओव्या १८६ ते १८८
व १९२, १९३.

**अर्थ**:—त्या ठिकाणीं तीं ब्रह्मप्रतिपादक वाक्यें हींच फळें विपुल अर्थरूप रसानें भरलेलीं होतीं, व त्यांचा भक्तिरूपी सुवास सर्वत्र पसरला होता. त्या वेळीं श्रीकृष्णाच्या कृपारूपी मंद वाऱ्याच्या साह्यानें श्रीकृष्णरूपी वृक्षापासून वचनरूपी फळें अर्जुनाच्या श्रवणरूप ओटींत सहज येऊन पडलीं. तीं फळें वेदान्त सिद्धांताचीं बनलेलीं, ब्रह्मरसाच्या समुद्रांत बुचकळलेलीं व परमानंदरूप साखरेंत घोळलेलीं होतीं. ( अर्जुनानें ) तीं श्रीकृष्णवाक्यरूपी फळें आपल्या अनुमानरूप हातावर झटकन घेऊन तो तीं आपल्या अनुभवरूपी मुखांत एकदम घालूं लागला, त्या वेळीं विचाररूप जिभेनें तीं धेतां येईनात, व हेतुरूप दांतांनीं तीं फुटेनात असें पाहून सुभद्रापति जो अर्जुन तो त्यांना तोंड लावीना.

वरील ओव्यांमध्ये ब्रह्मवाक्यांवर केलेला फळांचा आरोप हा मुख्य असून त्यांच्या अनेक अंगोपांगांवर इतर संबंधित आरोप केलेले आहेत व ते सर्व शब्दांनी स्पष्ट सांगितले आहेत. म्हणून हें समस्तवस्तुविषयसांग-रूपकाचें उदाहरण होय.

**एकदेशविवर्ति—सांगरूपकांत कवि मुख्य उपमेयावर मुख्य उपमानाचा आरोप स्पष्ट शब्दांत सांगतो. कांही अंगभूत उपमेया-वरील अंगभूत उपमानांचा आरोपहि शब्दांत सांगतो. मात्र एकाद्या अंगभूत उपमेयावरील आरोप शब्दांनी सांगत नाही. तो**

**आरोप आपल्याला संदर्भावरून ओळखावा लागतो व तो तसा ओळखला जातोहि तेव्हा तेथें एकदेशविवर्तिरूपक** होतें.

या रूपकांत एकदेशी म्हणजे संपूर्ण रूपकाच्या एका भागांतच उपमानाचें विशेष वर्णन म्हणजे शब्दांनी स्पष्ट प्रतिपादन असतें, म्हणून याला एकदेशविवर्तिरूपक असें नांव आहे.

उदाहरणें:—

( १ ) नाना फडणीस हे पेशवाईचे आधारस्तंभ होते.

या वाक्यांत नाना फडणिसावरील आधारस्तंभाचा आरोप उक्त असून पेशवाईवरील इमारतीचा आरोप अध्याहृत आहे. तो ओळखतां येतोच. येथे एकदेशविवर्तिरूपक झालें.

( २ ) सारस्वतचरणकमलदलिं विहरत कविमंडल ।
पंक्तिनिरत । राम रमत । धन्य तरि ॥

—गडकरी, भावबंधन.

यांत सरस्वतीच्या चरणावर कमलाचा आरोप उक्त आहे, परंतु कविमंडळावरील भ्रमरपंक्तीचा आरोप आणि स्वतः अर्थतः कवीवरील बेडकाचा आरोप अनुक्त असले तरी अर्थतः कळतात, म्हणून हे एकदेशविवर्तिरूपकाचें उदाहरण होय.

( २ ) गरीब माझी रसवंती; परि होतां अतिहृष्ट
शब्दमौक्तिकें ओवाळुनि तुजवरुनि काढि दृष्ट
ममत्वमय दोषाचें लावुनि तुज गालबोट
सदा सदिच्छामदनीं तुजला जपूं कडेकोट.

—गोविंदाग्रज 'अभिनंदनपर वधापन.'

भारताचे अर्थमंत्री श्री. सी. डी. देशमुख हे १९१२ सालीं मुंबई विश्वविद्यालयाच्या मॅट्रिकच्या परीक्षेंत पहिले आले. त्या वेळीं त्यांचें अभिनंदन करण्यासाठीं गडकऱ्यांनी जी कविता लिहिली त्यांतील हा उतारा आहे. यांत

'रसवंतीवर मातेचा आरोप' गुप्त ठेवण्यांत आला असून त्या संबंधांतील इतर गोष्टींवरील आरोप उक्त आहेत. म्हणून एकदेशविवर्तिसांगरूपकाचें हें उदाहरण होय.

आता पुढील उदाहरणें पाहा.

> जा। हें त्यजितां भवसागरिच्या वाळवंटिवर तरी जरा।
> चार पाउलें उमटवुं अपुलीं, ठेवु जगेचा मार्ग बरा।
> जीवितसागर दुस्तर मोठा, त्यांतुनि जाण्या पैलतिरा।
> खटपट करतो, गोते खातो, निराश होउनि जाय पुरा।
> अशा नराच्या दृष्टिस पडतां तींच पाउलें जरा जरा।
> कोणि म्हणावें नाही म्हणुनि येइल त्याला धीर बरा॥
>
> —'जीवितमहिमा' आपटे.

येथे संसार हें उपमेय व सागर हें उपमान आहे 'चार पाउलें' या उपमानाच्या जोडीला 'सत्कृत्यें' हें उपमेय उक्त नाही. तें अध्याहृत आहे. तसेंच—

> (४) तुझ्या ज्वानीची कस्तुरी पाहूनि ग।
> चहु बाजूंनि येतील पारधि ग।
> आणि मोहांत गुंतुनी फसशिल ग।
> तूं भोळी भाबडी हरिणी ग॥
>
> —गायिका वत्सला कुमठेकर (यंग इंडिया).

येथे तरुणीला हरिणी म्हटलें असून हा आरोप मुख्य आहे. तिच्या ज्वानीला कस्तुरी म्हटलें आहे, परंतु तिची शिकार करूं पाहणारे पारधी म्हणजे रंगेल आषक होत हें उक्त नसलें तरी संदर्भावरून लक्षांत येतें.

अशा उदाहरणांना एकदेशविवर्ति म्हणावें की नाही असा प्रश्न येतो. कारण येथ उपमान उक्त असून उपमेय अनुक्त आहे. त्यामुळे अशीं उदाहरणें एकदेशविवर्तिरूपकाच्या व्याख्येंत नीट बसत नाहीत. अशा वेळीं रूपक आणि अतिशयोक्ति यांचा अंगांगीभाव संकर मानणेंच योग्य होईल.

## परंपरित रूपकाचे प्रकार

एका राजाची प्रशंसा करतांना कवि म्हणतो ' हे राजा, तूं विद्वन्मानसांतील हंस आहेस. ' येथे राजावर हंसाचा आरोप आहे व हा आरोप, ' विद्वानाच्या मानसावर म्हणजे मनावर मानसाचा म्हणजे मानस सरोवराचा आरोप केल्या'शिवाय सिद्ध होत नाही. म्हणून हें परंपरित रूपक आहे. दुसरा कवि म्हणतो " हे राजा, तुझा बाहु जयकुंजर बांधण्याचा खांब आहे " येथेहि परंपरित रूपक आहे. कारण बाहूवर खांबाचा आरोप करण्यास जयावर कुंजराचा आरोप करणें अवश्य आहे. पण परंपरित रूपकाच्या या दोन उदाहरणांत एक भेद आहे. तो असा-पहिल्या उदाहरणांत ' मानस ' हा शब्द श्लिष्ट आहे. मानस ( मन ) हेंच मानस ( सरोवर ) असा त्याचा अर्थ करावा लागतो. तसें केल्याशिवाय मुख्य रूपक सिद्ध होत नाही. ' जयकुंजर ' या रूपकाचें तसें नाही. तें रूपक श्लेषाशिवायच सिद्ध होतें. म्हणून परंपरिताचे श्लिष्टपरंपारित व अश्लिष्टपरंपरित असे दोन प्रकार होतात.

**श्लिष्टपरंपरित रूपक:**—ज्या परंपरित रूपकांत गौण रूपक श्लेषावर आधारलेलें असतें ते श्लिष्टपरंपरित रूपक होय.

उदा.—

( १ ) मानस सरोवरांत उत्पन्न झालेल्या, डोळयांतून बाहेर येणाऱ्या आणि गालावरच्या गुलाबी समुद्राला मिळणाऱ्या या टीचभर गंगायमुना तुडवून जाणं हें अजून कोणाहि पुरुषाला साध्य झालं नाही !

—गडकरी, एकच प्याला.

वरील वाक्यांत अश्रूंवर गंगायमुनांचा आरोप मुख्य असून तो सिद्ध करण्यास ' मानस ' म्हणजे मनावर मानस सरोवराचा आरोप केला आहे. म्हणून येथे श्लिष्टपरंपरित रूपक आहे.

( २ ) शरवृष्टिने घनंजय शांतीतें पाववीन मी थोर

धन, नृत्यरसीं सादर आजि रणीं या करीन कुरुमोर ॥

—मोरोपंत, कर्णपर्व.

वरील आर्येतील ' धनंजय ' शब्द श्लिष्ट आहे. धनंजय= १ अर्जुन; २ अग्नि तसेंच ' शर ' शब्द श्लिष्ट आहे. ( १ बाण, २ उदक ). कर्ण म्हणतो की मी रूपी थोर घन ( मोठा मेघ ) शररूपी वर्षाव करून अर्जुन-रूपी अग्नीस शांतीतें पाववीन ( नष्ट करीन ) व दुर्योधनरूपी मोर नृत्यरसीं सादर करीन ( आनंदाने नाचवीन). येथे ' शर ' व ' धनंजय ' शब्दांनी श्लेष साधून श्लिष्टपरंपरित रूपक योजलें आहे.

**अश्लिष्ट परंपरित रूपक:**—ज्या परंपरित रूपकांतील कारण रूपकाच्या सिद्धीकरिता श्लेषाचा आश्रय करावा लागत नाही तें अश्लिष्ट परंपरित रूपक होय. उदा.—

(१) " तुझ्या बाबांच्या क्रोधाचा वडवानल तुझ्या व माझ्या प्रेमाच्या सागराचे पोटांत बुडी मारून दडून राहील. "

—खाडिलकर, विद्याहरण नाटक.

वरील वाक्यांत क्रोधावर वडवानलाचा आरोप केला असून प्रेमावर सागराचा आरोप केला आहे. हीं दोन रूपकें परस्परावलंबी असल्यामुळे हें शुद्धपरंपरित रूपक होय.

(२) आयुः पयाचा अति गोड प्याला ।
हळू हळू काळ बिडाल प्याला ॥
त्वद्योग तो या समयांत नाही; ।
चुके कशी हे यमयातना ही ? ॥

—सामराज, रुक्मिणीहरण.

वरील श्लोकांत आयुष्याला दुधाचा प्याला म्हटलें आहे. त्या दोहोंत अभेद दर्शवून एक रूपक साधलें. शिवाय ' काळ ' या उपमेयावर बिडाल ( मांजर ) या उपमानाचा आरोप केला आहे. पहिलें रूपक सिद्ध करण्या-साठी दुसरें रूपक योजलें आहे. या पद्यांतील कोणताहि शब्द श्लिष्ट नाही. श्लेषाचा आधार न घेतां हें परंपरित रूपक सिद्ध झालें.

निरंग रूपक ज्याप्रमाणे शुद्ध आणि माला अशा प्रकारचें असूं शकतें तसेंच परंपरित रूपकहि शुद्ध किंवा माला अशा प्रकारचें असूं शकतें. जेव्हां एकाच मुख्य उपमेयावर एकच परंपरित रूपक केलेलें असतें तेव्हा तें शुद्ध-परंपरित रूपक होय. जेव्हा एकाच मुख्य उपमेयावर एकामागून एक अनेक परंपरित रूपकें केलेलीं असतात तेव्हा तें मालापरंपरित रूपक होतें. वर सांगितल्याप्रमाणे तीं श्लिष्ट किंवा अश्लिष्ट असूं शकतात म्हणून परंपरित रूपकांचे एकूण चार प्रकार होतात. ते असे—




उदाहरण:—

श्लिष्टपरंपरितरूपकाचें जें उदाहरण पूर्वी आपण पाहिलें तें शुद्धश्लिष्ट-परंपरित रूपकाचें होय. आता श्लिष्टमाला परंपरित रूपाचें उदाहरण पाहूं.

पद्मोदयास तूं सूर्य, भूभृद्वृंदास तूं पवी ।
विद्वन्मानसिं तूं हंस, गाती सर्व तुला कवी ॥

—वि. वा. भिडे 'अर्थालंकारांचें निरूपण'

येथे 'पद्मोदय' 'भूभृत्' व 'मानस' हे तीन शब्द श्लिष्ट आहेत. ( **पद्मोदय** = १ संपत्तीची वृद्धि, २ कमलांची प्रफुल्लिताता; **भूभृत्** = १ राजे, २ पर्वत; **मानस** = १ चित्त २ मानस नांवाचें सरोवर ).

**अर्थ**:--हे राजा, संपत्तीची वृद्धि हीच कमलांची प्रफुल्लितता; तिला तूं सूर्यासारखा आहेस. राजेरूपी पर्वतांना तूं वज्रासारखा ( म्हणजे विध्वंसकारक ) आहेस, आणि विद्वज्जनचित्तरूपी मानससरोवरांत पोहणारा तूं हंसच आहेस ! येथे परंपरित रूपकांची माला असून तीं रूपकें श्लिष्ट शब्दांवर आधारलेलीं आहेत. म्हणून हें श्लिष्टमाला परंपरित रूपकाचें उदाहरण झालें.

अश्लिष्ट शुद्धपरंपरित रूपकाचीं उदाहरणें मागे आलींच आहेत. अश्लिष्टमालापरंपरित रूपकाचें उदाहण आता पाहूं.

तूं माझी माऊली मी तुझा तान्हा
पाजी प्रेमपान्हा पांडुरंगे ।
तूं माझी गाऊली मी तुझें वासरूं
नको पान्हा चोरूं पांडुरंगे ॥
तूं माझी हरिणी मी तुझें पाडस
तोडी भवपाश पांडुरंगे ॥
तूं माझी पक्षिणी मी तुझें अंडज
चारा घाली मज पांडुरंगे ॥
नामा म्हणे होशी भक्तीचा वल्लभ
मागे पुढे उभा सांभाळीशी ॥

वरील अभंगात नामदेवांनी पांडुरग या एका उपमेयावर चार परंपरित रूपकें साधलीं आहेत. पहिल्या परंपरित रूपकात पांडुरंगास ' माउली ' म्हटलें असून कवीने स्वतःस ' तान्हा ' म्हटलें आहे. दुसऱ्या उदाहरणांत, पांडुरंगावर गाऊलीचा ( गायीचा ) आरोप केला असून तो सिद्ध करण्यासाठी कवीने स्वतःवर ' वासरूं ' या उपमानाचा आरोप केला. त्यानंतर पांडुरंग व हरिणी यात अभेद दाखवून तें रूपक सिद्ध करण्यासाठी कवीने स्वतःवर पाडसाचा आरोप केला. शेवटी पांडुरंगावर पक्षिणीचा आरोप करून कवीने

स्वतःवर अंडजाचा ( पक्ष्याच्या पिलाचा ) आरोप केला. वरील चार रूपकें साधतांना श्लेषाचा आधार कोठेहि घेतलेला नाही. म्हणून येथे अश्लिष्टमाला-परंपरित रूपक झालें.

## दृढारोप रूपक

रूपकाचा हा प्रकार मम्मटानें मानलेला नाही, पण जगन्नाथानें मानलेला आहे. हा प्रकार असा–मृच्छकटिकामध्ये असें वाक्य आहे– " द्यूत म्हणजे माणसाला मिळालेलें सिंहासनरहित राज्यच होय. " येथे द्यूत आणि राज्य यांचें तादात्म्य ( अभेद ) दाखविलेलें आहे. येथे कोणास अशी शंका येईल की, सिंहासनरहित द्यूताचें सिंहासनसहित राज्याशीं तादात्म्य कसें होऊं शकेल ? व द्यूतावर राज्याचा आरोप कसा करतां येईल ? अशी शंका घेतां येऊं नये म्हणून कवि राज्याचीसुद्धा सिंहासनरहित अवस्थेची कल्पना करून मग त्याचा द्यूतावर आरोप करतो. " हा राजा म्हणजे द्विनेत्र इंद्रच आहे. " हें उदाहरणहि अशाच प्रकारचें आहे. राजा आणि इंद्र यांच्यांत अभेद दाखविण्यांत इंद्राच्या हजार डोळ्यांची येणारी अडचण द्विनेत्र या विशेषणानें नाहींशी केली आहे. या प्रकारच्या रूपकांत विशेषणानें उपमानाच्या बाबतींत जेवढा फरक सांगितला आहे तेवढा सोडून इतर बाबतींत उपमानोपमेयांचें तादात्म्य दृढ केलें जातें. म्हणून याला दृढारोप रूपक म्हणतात.

उदा.––

अचतुर्वदन ब्रह्मा हा द्विबाहु जनार्दन ।
बादरायण भूतेश अतृतीयविलोचन ॥

––वि. वा. भिडे ' अर्थलंकाराचें निरूपण '

येथे बादरायण मुनीवर ब्रह्मा, जनार्दन आणि भूतेश यांचा आरोप केला आहे. मात्र हा आरोप करतांना उपमेय हें उपमानाच्या पूर्ण तोडीचें नसून कोणत्या तरी बाबतींत कमी आहे असें सांगितलें आहे. बाद-रायणाला ब्रह्मदेवासारखीं चार तोंडें नाहीत, जनार्दनासारखे चार हात

नाहीत व शंकराप्रमाणे तीन डोळे नाहीत हें दर्शविलें आहे. हा फरक वगळला तर बाकीच्या बाबतींत बादरायण या उपमेयावर वरील पद्यांतील तीन उपमानांचा आरोप सिद्ध होतो. म्हणून दृढारोप रूपकाचें हें उदाहरण झालें.

**रूपक अलंकाराचीं अभ्यासार्थ उदाहरणें:—**

( १ ) यशोमंदिराचा मार्ग अपयशाच्या दाट धुक्यांतून गेलेला असतो.

( २ ) भांडखोर मनुष्याचें तोंड म्हणजे फटाक्याच्या माळांनी भरलेलें कोठारच होय.

( ३ ) कवि सृष्टीचा अलंकार । कवि लक्ष्मीचा शृंगार ।
सकळ सिद्धींचा निर्धार । ते हे कवि ॥
कवि सभेचें मंडण । कवि भाग्याचें भूषण ।
नाना सुखांचें संरक्षण । ते हे कवि ॥

—रामदास, दासबोध.

( ४ ) तूझ्या महोदार सारस्वताच्या महासागरींचा जरी मीन मी,
झालों तरी गे, तृषा मन्मनाची कधीही कधीही न होणें कमी ।

—रे. टिळक, ‘ माझ्या जन्मभूमीचें नांव ’

( ५ ) विश्वेशें करुनी कृपा सकरुणें दुष्काळ दैत्यांवरी
पर्जन्यास्त्र नियोजुनी पळविलीं आहेत दुःखें दुरी ॥
आता मंगल पातले दिवस हे दीपोत्सवाचे भले,
गाणें सुस्वर पाहिजे तर तुवां हे शारदे ! गाइलें ॥

—केशवसुत ‘ दिवाळी. ’

(६) अनुरागाचा सुंदर तरुवर दुःखकर्दमीं रुजतो
अश्रुजलाच्या सारणिमाजी फोफावत तो जातो !

—रे. टिळक. वनवासी फूल.

(७) दुष्यंतसद्मपद्मीं ते स्त्री श्री, कण्वभानु शिष्य–करीं ।
नेली पुत्र सुगंधासह, धर्मनयांबुपूर्ण नगरसरीं ॥
—मोरोपंत, आदिपर्व.

(८) संसार म्हणजे महापूर । माजी जळचरें अपार ।
डंखूं धावती विखार । काळसर्प ॥
अहंकार–नक्रें उडविलें । नेऊन पाताळीं बुडविलें ।
तेथुनिया सोडविले । न वचे प्राणी ॥
काम मगरमिठी सुटेना । तिरस्कार लागला तुटेना ।
मदमत्सर वोहटेना । भूलि पडली ॥
वासना धामीण पडली गळां । घालूनि वेटोळें वमी गरळा ।
जिह्वा लाळी वेळोवेळां । भयानक ॥
बहुतेक आवर्तीं पडिले । प्राणी वाहातांचि गेले ।
जेंहि भगवंतासि बोभाइलें । भावार्थ बळें ॥
देव आपण घालूनि उडी । तयांसी नेलें पैलथडी ।
येर तें अभाविक बापुडीं । वाहतांचि गेलीं ॥
—रामदास, दासबोध द. ३ स. १०.

( ९ ) [ कर्णवधानंतर श्रीकृष्ण धर्मराजास गौरवितात— ]
तुमची आज्ञादेवी निजहस्तगतार्जुनायुधें आजी ।
कर्णमहिष मारुनियां विजयातें पावली रणामाजी ॥
त्वां इंद्रें प्रेरितासितवाहाशनिनें वृषाद्रिचें पिष्ट ।
केलें, हें यश देवा ! गातील तुझें सदा महाशिष्ट ॥
तूं नरसिंह महात्मा, बीभत्सु तुझा नखप्रकर देवा ! ।
वृष कनककशिपु, महिमा प्रल्हाद तुझीच ज्या रुचे सेवा ॥
तूं रुद्र, तुझें तिसरें लोचन हें बंधुरत्न, वृष काम; ।
तूं राम, कर्ण हा भव, अर्जुनभुजतेज हें तुझें नाम ॥
—मोरोपंत, कर्णपर्व, अ. ५०.

(१०) इति श्रीभारतकथा गहन । निरोपणरूपें समुद्रमंथन ।
समाप्रमेय पीयूषपान । दैवयोगें लाधलें ॥
मुक्तेश्वराची वाङ्मोहिनी । दुर्जनदैत्यातें ठकोनी ।
सज्जनदेवजनांच्या श्रेणी । अमर करिती प्राशनें ॥
विकल्प राहूचें तोंड । नामें करूनि खंडविखंड ।
पुरवील श्रोतयांचें कोड । तेंचि गोड अवधारा ॥
—मुक्तेश्वर, सभापर्व, अ. ४

(११) परदास्यरात्रि नाशाला
शिवनेरीं श्रीमान् आला
स्वातंत्र्यसूर्य उदयाला
त्या सूर्याचा किरण रणांगणिं तळपे तानाजी ॥
—सावरकर, सिंहगडचा पोवाडा.

## ( ६ ) ससंदेह

मागे आपण मालोपमा हा उपमेचा प्रकार पाहिला. मालोपमेंत थोडासा बदल केला की, ससंदेह अलंकार होतो. मालोपमेमध्ये एका उपमेयाची अनेक उपमानांशीं तुलना केलेली असते. ससंदेहांतहि एका उपमेयाचें किंवा प्रकृताचें अनेक उपमानांशीं किंवा अप्रकृतांशीं सादृश्य दाखविलेलें असतें. फरक इतकाच की मालोपमेंत एका उपमेयाची अनेक उपमानांशीं सरळ तुलना केलेली असते; तर ससंदेहांत औपम्य सरळ न दाखवितां संशयाच्या द्वारें निर्माण केलेलें असतें. " ही रमणी ज्योत्स्नेप्रमाणे सुखकर, मदिरेप्रमाणे मादक आणि सत्तेप्रमाणे आकर्षक आहे. " ही मालोपमा आहे तर " ही ज्योत्स्ना तर नसेल ना ? की मदिरा आहे ? किंवा प्रभुता असावी ? " हा ससंदेह झाला.

ससंदेहांत अनेक उपमानें असावीं लागतात. तरच तो प्रभावी ससंदेह होतो. " हें मुख आहे की कमल आहे ! " यांतहि ससंदेह होऊं

शकतो. पण एकाच उपमेयाचे अनेक उपमानांशीं संदेहाच्या द्वारें सादृश्य दाखविण्यांत जें वैचित्र्य दिसतें तें अशा एकेरी संदेहांत प्रत्ययास येत नाही. ससंदेहांत मालाससंदेह हा प्रकार नाही याचें कारण तरी हेंच होय. शिवाय ससंदेहांत उपमेयाचें सादृश्य प्रत्येक उपमानाशीं वेगवेगळ्या बाबतींत असलें म्हणजे ससंदेह अधिक प्रभावी होतो.

ससंदेहांत संशयाचा खेळ असतो. हा संशय वास्तविक असेल किंवा आहार्यहि असेल. जेव्हा खुद्द कवीच्याच मनांत संशय असतो तेव्हा तो वास्तविक असतो. पण कवि जेव्हा दुसऱ्याच्या मनांतील संशय व्यक्त करतो तेव्हा तो आहार्य असतो.

ससंदेहांतील संशय चटकदार असावा लागतो. अंधारांतून जातांना आरल्याला वाटतें " दिसतो हा खांब की माणूस ? " येथे ससंदेह नाही. तसेंच हा संदेह सादृश्यावर आधारलेला असावा; इतर प्रकारें आलेला संदेह नको. कवीच्या नजरेसमोरून एक तरुणी विजेप्रमाणे लप्‌कन् निघून गेली. तेव्हा तो म्हणतो—

इथून गेली न कुठे कळेना
गृहांत किंवा हृदयांत गेली ?

येथे संशय असला तरी तो सादृश्यावर आधारलेला नसल्यामुळे ससंदेह अलंकार नाही.

किंवा नारद आला आलापीत स्वकीय सच्चरितें ।
प्रेमळ गीत तुम्हांला हरि ! हरिणापरिस बहुत वश करितें ॥
किंवा मजहुनि दुसरा कोणी बहु दीन दास आढळला ।
तच्छुभदैवसमीरें त्यावरि करुणाघन प्रभू वळला ॥
किंवा पुराणपुरुषा ! संप्रति बहु भागलास या कामीं ।
तुज नीज लागली, तों सजलों मारावयासि हाका मी ॥

संशयरत्नमालेंतील या पद्यांतसुद्धा वरील कारणास्तव ससंदेह अलंकार नाही.

**ससंदेह आणि उपमा**:—ससंदेह अलंकार अभेदप्रधान आहे. म्हणून उपमेहून तो वेगळा आहे. ससंदेहांत संशय असला तरी तो अभेद बुद्धीवर आधारलेला असतो. ससंदेह हा वस्तुतः *मालोपमेंतूनच निघालेला असला तरी तो वेगळा आहे. मालोपमेंत संशय नसतो. शिवाय ससंदेह अभेदप्रधान आहे, तर मालोपमा भेदाभेदप्रधान आहे.

**ससंदेह आणि रूपक**:—रूपक आणि ससंदेह दोन्हीहि अभेद-प्रधान अलंकार आहेत. पण रूपकांत अभेदाची निश्चिति असते. ससंदेहांत अभेद प्रतीत होत असला तरी अनेक उपमानांपैकी कोणत्या उपमानाशीं उपमेयाची अभिन्नता आहे याबद्दल कवीचा निश्चय नसतो. यांतच ससंदेहाचें सौंदर्य आहे.

ससंदेहांत अवश्य असणाऱ्या गोष्टी अशाः—

(१) उपमेयाचा अनेक उपमानांपैकी कोणत्या उपमानाशीं अभेद आहे याबद्दल कविमनांत संशय असला पाहिजे.

(२) हा संशय सादृश्यावर आधारलेला असून तो रमणीय असला पाहिजे. वाटेल त्या प्रकारच्या संशयाने ससंदेह होत नाही.

(३) निरनिराळ्या उपमानांशीं उपमेयाचें निरनिराळ्या बाबतींत सादृश्य असलें पाहिजे.

(४) हा संदेह आहार्य किंवा वास्तविकहि असूं शकतो.

म्हणून ससंदेहाचें लक्षण असें करतां येईल.

**दोन किंवा अधिक उपमानांपैकी कोणासारखें उपमेय आहे याबद्दल कविप्रतिभानिर्मित संशय जेथे वर्णिला असतो; आणि तो संशय सादृश्यावर आधारलेला असतो; तेथे ससंदेह अलंकार होतो.**

उदाहरण:—

कोणता मानूं चंद्रमा ? भूवरींचा कीं नभींचा ?
गगनीं रजनीं, भुवनीं रजनी,
दिसतो चंद्रहि दोन्हि ठिकाणीं
एकावरि ये कलंक दिसुनी
दावि दुजा निज नयननीलिमा ॥ कोणता मानूं.
एक फुलवितो कमलविशेषा,
दुजा फुलवि मम मानसकोषा,
एक करितसे कीं तमनाशा
नाशि दुजा मम विरहतमा ॥ कोणता मानूं.
—गु. ह. देशपांडे, 'कोणता मानूं चंद्रमा.'

वरील पद्यांत मुख आणि चंद्रमा यांच्यांत अभेद असल्याचा संशय कवीने व्यक्त केला आहे. हा संशय अर्थातच सौंदर्याच्या, रमणीयतेच्या साहश्यावर आधारलेला आहे. म्हणून येथे ससंदेह अलंकार झाला.

ससंदेहाचे प्रकार




उपमेय हें एका उपमानासारखें आहे असें कवीला वाटतें. लागलीच तें दुसऱ्या उपमानासारखें असावें असेंहि त्याला वाटूं लागतें; पुन्हा तें

तिसऱ्या उपमानासारखें असावें की काय असा त्याला संशय येतो. अशा प्रकारें त्याला संशयामागून संशय येतात. असें होत असतांना दोन प्रकार संभवतात. उपमेयाचें सादृश्य एका उपमानाशीं दिसल्यावर दुसऱ्या उपमानाकडे जातांना तें पहिल्या उपमानासारखें कां नाही हें तो सांगेल किंवा सांगणारहि नाही. " हा चंद्र आहे काय ? की कमल आहे ? " येथे एकापुढे एक संशय आहेत. मुख चंद्र आहे असें त्याला प्रथम वाटलें व नंतर तें कमल आहे असें वाटलें. पण त्याचबरोबर तो चंद्र कां नाही हें त्यानें आपणाला सांगितलें नाही. पण हेंच उदाहरण असें घ्या. " हा चंद्र असेल काय ? पण छे ! येथे कलंक दिसत नाही. हें कमल असेल काय ? मग पाणी कां दिसूं नये ? " येथे कवीला एक संशय येतो. पण दोहोंतील भेद त्याच्या लक्षांत आल्यावर त्या संशयाचा निरास होतो व लागलीच दुसरा संशय येतो. अशा प्रकारें ससंदेहाचे दोन भाग होतात. ( १ ) ज्यामध्ये भेद सांगितला नाही असा ससंदेह—हा भेदानुक्त किंवा शुद्ध ससंदेह होय. (२) ज्यांत संशय आल्यावर दोहींतील भेद सांगितला आहे असा. हा भेदोक्त ससंदेह होय. या भेदोक्त ससंदेहांतहि दोन प्रकार संभवतात. एक संशय येतो तो जातो, दुसरा येतो तो जातो, तिसरा येतो तोहि जातो अशा प्रकारें संशयांचा निरास होत जातो, पण अखेर ती वस्तु कोणती आहे हें मात्र कवि स्पष्टपणें सांगत नाही, असा एक प्रकार. हा भेदोक्त निश्चयगर्भ ससंदेह होय. दुसरा प्रकार म्हणजे जेथे संशयानिरास होऊन अखेर ती वस्तु कोणती आहे हें कळतें तो. हा भेदोक्त निश्चयान्त ससंदेह होय. " हा चंद्र आहे काय ? पण छे ! येथे कलंक दिसत नाही; हें कमल असावें काय ? पण पाणी कोठे गेलें ? " येथे भेद दाखविला आहे. पण प्रकृत वस्तु कोणती आहे हें अखेर सांगितलें नाहीच हा भेदोक्त निश्चयगर्भ होय. पण हेंच जर असें सांगितलें की " हा चंद्र आहे काय ? पण छे ! येथे कलंक दिसत नाही; हें कमल असावें काय ? मग पाणी कोठे गेलें ? पण इतक्यांत ललित आणि विलासयुक्त शब्द ऐकूं आले

आणि कळलें की हें मुख आहे. " येथे अखेर प्रकृत वस्तूचा निश्चय झाला, हा भेदोक्त निश्चयान्त ससंदेह होय. म्हणून ससंदेहाचे प्रकार पुढीलप्रमाणेः-

१ **भेदानुक्त**—ज्या ससंदेहांत एकामागून एक संशय येतात पण कोणत्याहि उपमानाचा भेद दाखविलेला नसतो असा.

२ **भेदोक्त निश्चयगर्भ**—ज्या ससंदेहांत एक संशय येतो, पण भेद दिसल्याने तो नाहीसा होतो, मग दुसरा संशय येतो; तोहि नष्ट होतो, अशा प्रकारें संशयांची मालिका येते व जाते पण उपमेयाचा शेवटपर्यंत निश्चय मात्र होत नाही, असा.

३. **भेदोक्त निश्चयान्त**—जेथे संशयामागून संशय येतात व भेद कळल्यामुळे ते जातात व अखेर उपमेय वस्तूचा निश्चय होतो, असा.

उदाहरणें:—

( १ ) बोलति परस्परें ते येतो यशासि कोण हा रविसा
कीं वन्हि की सनक हा भा सर्वांच्याहि येथ हारविसा ॥
—विठ्ठल कवि केरीकर, वामनचरित्र.

भिक्षुरूप धारण करून बलीकडे याचना करण्यास गेलेल्या वामनास पाहून मुनींच्या मनांत जे संदेह निर्माण झाले ते येथे सांगितले आहेत. वामनास पाहून हा 'रवि' असावा असा संदेह प्रथम मनांत आला. या संदेहाचा निरास न करतां, दुसरा संदेह म्हणजे 'हा वन्हि असावा' हा व्यक्त करण्यांत आला आहे; त्याच्या पाठोपाठ हा 'सनक' ( ब्रह्मदेवाचा एक पुत्र ) असावा असा संदेह उत्पन्न झालेला दाखवला आहे. या उदाहरणांत उपमेय व उपमान यांतील भेद कोठेहि दर्शविण्यांत आला नसल्यामुळे हें भेदानुक्त किंवा शुद्ध ससंदेहाचें उदाहरण होय.

( २ ) आकाशभूमि गिरिकंदरिं पूर्ण साचे ।
ओघांवरी पडति ओघच चंद्रिकांचे ॥
क्षीराब्धिच्या उठति या लहरीच काय ।
कीं सर्व चंदनरसांत बुडून जाय ॥

—यशवन्तराय.

येथे चांद्रिकेचें वर्णन करतांना त्या क्षीराब्धिच्या लाटा आहेत कीं चंदनरस आहे असे दोन संशय व्यक्त केले आहेत. त्या संशयांचा निरास मात्र केलेला नाही, म्हणून हें शुद्ध ससंदेहाचें उदाहरण होय.

( ३ ) पूर्वी दिलेलें ' कोणता मानू चंद्रमा ' हें ससंदेहाच्या याच प्रकाराचें उदाहरण होय.

सूर्य त्या म्हणों तरी न सात अश्व तद्रथा,
वन्हि त्या म्हणों तरी न बद्ध हा मरुत्पथा, ।
धर्म त्या म्हणों तरी बसे न कासवावरी,
पाहुनी तया रणीं विकल्प हे करी अरी ॥

—वि. वा. भिडे ' अर्थालंकारांचें निरूपण '.

या पद्यांत रणक्षेत्रावरील एका वीराचें वर्णन केलें आहे. त्या वीरास पाहून तो सूर्य असावा असा संदेह शत्रूंच्या मनांत निर्माण झाला, पण त्याच्या रथाला सूर्याच्या रथाप्रमाणे सात घोडे नाहीत हें पाहून त्या संदेहाचें निराकरण झालें. ' तो अग्नि असावा ' असा दुसरा संदेह शत्रूंच्या मनांत आला, परंतु तो वाऱ्याच्या दिशेने जात नसल्याचें पाहून त्या संदेहाचा निरास झाला. ' तो यम असावा ' असा तिसरा संशय प्रेक्षकांच्या मनांत आला, परंतु तो वीर पुरुष रेड्यावर बसलेला नसल्यामुळे तोहि संशय नष्ट झाला. उपमेय व उपमान यांतील भेद प्रत्येक ठिकाणी उक्त आहे पण

शेवटी तो वीर कोण हें कवि स्पष्टपणें सांगत नाही. म्हणून निश्चयगर्भ भेदोक्त ससंदेहाचें हें उदाहरण होय.

> झाली रात्र म्हणूनि हा न तरणी, संताप दे, ना शशी।
> दावाग्नि ? द्युपथीं ! विलोल चपला ? स्वच्छातरिक्षीं कशी !
> हा मंन्निश्चय होय पांथरमणीप्राणानिलास्वादनी।
> आली धावत घोर रात्रि–भुजगी, तन्मस्तकीं हा मणी॥
>
> —ना. न. फडणीस, सुभाषितें.

आकाशांत चकाकणारी एक वस्तु पाहून ती वस्तु कोणती असावी याबद्दल अनेक संशय निर्माण झाल्याचें येथे वर्णन आहे. ती वस्तु सूर्य असावी असा संशय आला पण रात्रींचा समय असल्यामुळे त्या शंकेचें निरसन झालें. ती वस्तु म्हणजे चंद्र असावा असा दुसरा संशय निर्माण झाला; पण ही वस्तु संतापदायक आहे म्हणून ही वस्तु म्हणजे चंद्र नव्हे असा संशय-निरास झाला. नंतर ती वस्तु 'दावाग्नि' वाटली पण ती आकाशांत असल्यामुळे त्याहि संशयाची निवृत्ति झाली. ती वस्तु 'वीज' असावी असा जो संदेह त्यानंतर मनांत आला त्याहि संदेहाचा 'आकाश निरभ्र असल्याचें पाहून' नाश झाला. परंतु शेवटी ती वस्तु म्हणजे 'रात्रि-भुजगीच्या मस्तकावरील प्रकाशमान मणी' होय असें स्पष्टपणें सांगितलें आहे.

## (७) भ्रान्तिमान्

भ्रान्तिमान् अलंकार म्हणजे वस्तुतः भ्रान्ति होय. कुवलयानंद-कारांनी या अलंकाराला भ्रांति असेंच नांव दिलेलें आहे. स्मरणाप्रमाणेच भ्रांतिमान् हा अलंकार सादृश्यावर आधारलेला असतो. वस्तुतः भ्रांतिमान् हा स्मरणाच्या पुढची एक पायरी आहे. स्मरणाप्रमाणेच भ्रांतिमानालाहि पूर्वानुभवाची जरूर असते.

दोरीवर होणाऱ्या सर्पभ्रांतीच्या अनुभवाचें विश्लेषण केलें म्हणजे भ्रांतिमानाचें स्वरूप लक्षांत येईल. अंधारांत पडलेली दोरी आपणाला सर्पासारखी भासते व आपण एकदम दूर सरतो. सर्प आपण अगोदरच पाहिलेला असतो. आता आपण दोरी पाहतों. दोरीच्या व सर्पाच्या आकारसादृश्यामुळे दोरीलाच आपण सर्प मानतों आणि भयाने एकदम दूर सरतों. व्यवहारांतील या अनुभवाचा उपयोग कवि जेव्हां रमणीयता निर्माण करण्याकडे करतो तेव्हा भ्रांतिमान् अलंकार होतो.

एका पोपटाजवळ एक भृंग घोटाळत होता. पोपटाची चोंच भृंगाला दिसली आणि ती पळसाच्या फुलाची कळी आहे असें वाटून तो तींत उडी घ्यावयास लागला. इकडे पोपटालाहि असें वाटलें की हें जांभूळ आहे म्हणून तोहि त्या भुंग्याला पकडायला लागला. येथे भ्रांति आहे.

अशा प्रकारें भ्रांति सादृश्यावर आधारली असली पाहिजे, तरच भ्रांतिमान् होऊं शकतो; एरव्ही नाही. कृष्णाने चाणूराला तडाखा दिला त्या वेळीं त्याला भोंवळ आली व त्याला डोळ्यासमोर काजवे दिसूं लागले. येथे भ्रांतिमान् होत नाही. दुसरी गोष्ट म्हणजे ज्याला भ्रांति होते त्याच्याकडून त्या भ्रांतीमुळे क्रिया घडली पाहिजे. बशीमध्ये चंद्रकिरण परावृत्त झाले म्हणजे दुधाचा भास होतो. एवढेंच वर्णन भ्रांतिमानाला पुरेसें नाही. तें दूध आहे असें समजून मांजर चाटूं लागलें हें सांगितल्या शिवाय भ्रांतिमान् होत नाही.

म्हणूनच भ्रांतिमान् अभेदप्रधान अलंकार आहे. पाहिलेली वस्तु व जिचा भ्रम होतो ती वस्तु यांच्यांत इतकें सादृश्य प्रत्ययास येते कीं एका ऐवजी दुसरीच वस्तु आहे असें वाटून पाहणारा तीमुळे कृति करावयास लागतो. स्मरण आणि भ्रांतिमान् यांत हाच फरक आहे. स्वच्छ बिछान्यावर पडलेले चंद्रकिरण पाहून एखाद्या स्त्रीला पांढऱ्याशुभ्र पातळाची आठवण होणें हें स्मरण झालें. पण तें पातळच आहे असें समजून ती स्त्री तें ओढूं

लागली असें वर्णन केल्यास तेथे भ्रांतिमान् होतो. येथे चंद्रकिरण व पांढरें पातळ यांच्यांतील अभेदाची प्रतिति आहे.

ही भ्रांति कवीला होत नसते; तर ती कविनिर्मित पात्राला होत असते. त्या पात्राला झालेली भ्रांति व त्यामुळे त्याच्या हातून घडलेली क्रिया यांचें वर्णन कवि करतो व त्या दोन वस्तूंमधील सादृश्य आपल्या प्रत्ययास आणून देतो. भ्रांतिमानांत कवींची भूमिका तटस्थतेची असते.

**भ्रांतिमान् आणि स्मरण**—भ्रांतिमान् आणि स्मरण यांच्यांतील भेद आता स्पष्ट होईल. दोहोंतहि पूर्वानुभव असतो व सदृश वस्तु पाहिल्याने तो जागृत होतो. पण स्मरणात पूर्वानुभवाचें केवळ स्मरण होतें. तर भ्रांतिमानांत पूर्वानुभूत वस्तूचा भास होऊन त्याप्रमाणे कृति घडते. स्मरणांत पाहिलेल्या व स्मरलेल्या वस्तूंचा भेद कायम असतो म्हणून तो भेदाभेदप्रधान अलंकार आहे. पण भ्रांतिमानांत एका ऐवजी दुसरी वस्तु भासते म्हणून भ्रांतिमान् हा अभेदप्रधान अलंकार होय. शिवाय स्मरणांत आठवणारी वस्तु प्रकृत ( उपमेय ) किंवा अप्रकृत ( उपमान ) असूं शकते. पण भ्रांतिमानांत पाहिलेली वस्तु नेहमी प्रकृत असते व भासणारी वस्तु नेहमी अप्रकृत असते.

**भ्रांतिमान् आणि रूपक**—दोन्हींहि अलंकारांत अप्रकृताचा प्रकृतावर सादृश्याच्या आधाराने आरोप केलेला असतो. पण भ्रांतिमानांतील आरोप हा वास्तविक भ्रमामुळे होतो, तर रूपकांतील आरोप हा आहार्य अभेद ज्ञानामुळे होतो. रूपकांतील आरोप हा कवीने हेतुपुरःसर केलेला असतो. म्हणूनच रूपकांतील आरोप करतांना ज्ञात्याला त्या अभेदाबरोबरच प्रकृत आणि अप्रकृत या दोघांचीहि सारखीच जाणीव असते. पण भ्रांतिमानांत प्रकृताच्या ऐवजी फक्त अप्रकृताचीच जाणीव असते.

भ्रांतिमान् अलंकाराला आवश्यक गोष्टी अशा—

१. भ्रांतिमानांत कवि सादृश्यामुळे निर्माण झालेल्या भ्रांतीचें वर्णन करून रसिकाला सादृश्य प्रतीति आणून देत असतो.

२. जी वस्तु पाहिलेली असते ती प्रकृत असते; जिचा भ्रम होतो ती अप्रकृत असते. उदा. पोपटाची चोंच ही प्रकृत वस्तु आहे व पळसाची कळी ही अप्रकृत वस्तु आहे.

३. भ्रम सादृश्यामुळे निर्माण झालेला असावा.

४. भ्रम वास्तविक असावा, आहार्य नको.

५. भ्रमाचें पर्यवसान कृतींत झालें पाहिजे.

तेव्हा भ्रांतिमानाचें लक्षण असें होईल—

**पूर्वी अनुभवलेल्या अप्रकृत पदार्थासारखा प्रकृत पदार्थ दृष्टीस पडतांच तो प्रकृत पदार्थ अप्रकृत पदार्थंच आहे अशा प्रकारचा पाहणाऱ्याचा समज होऊन त्या अनुरोधाने त्याच्या-कडून कृति घडते असें रमणीय वर्णन ज्या ठिकाणीं केलेलें असतें तेथे भ्रान्तिमान् अलंकार होतो.**

उदा.—

(१) गगनाकडे पहातां झाली बहुतां जनांसि अभ्रमती, ।
तेव्हा पक्षी बाणव्याप्ताकाशोदरांत न भ्रमती, ॥

—मोरोपंत, कर्णपर्व.

कर्णास मारण्यासाठी अर्जुनाने एकदम इतके बाण सोडले की आका-शांत त्यांचा मोठा जमाव दिसूं लागला. आकाशांत एकदम खूप मेघ जमल्याचा भास प्रेक्षकांत निर्माण झाला, इतकेंच नव्हे तर नभांत मेघमालिका आल्याचें वाटून पक्षी आकाशांत संचार करीनासे झाले. बाणसमूहाऐवजी मेघांचें अस्तित्व भासून त्या दृष्टीने पक्ष्यांचें आचरण घडलें असें येथे वर्णन असल्यामुळे भ्रांतिमान् अलंकार झाला.

(२) भृंगें विराजित नवीं अरविंदपत्रें ।
पाहूनि मानुनि तुझींच विशाल नेत्रें ॥
घालीन अंजन अशा मतिनें तटाकीं ।
कांते ! वृथा उतरलों भिजलों विलोकीं ॥

—रघुनाथपंडित, दमयंती स्वयंवर.

नलराजाने भृंगांनी शोभणारीं अशीं कमलदलें पाहिलीं. तीं पाहून नलास दमयंतीच्या विशाल नेत्रांची भ्रांति झाली. कमलदलें व लोचनें यांतील विलक्षण सादृश्यावर हा भ्रम निर्माण झाला. मनांत अशी भ्रांति निर्माण होतांच नलराज त्या नेत्रांत काजळ घालण्याची कृति करण्यासाठी सरोवरांत उतरले आणि भिजलेहि !

## (४) अपन्हुति ( सं-अपह्नुति ).

रूपकाप्रमाणेच अपन्हुति हाहि अभेदप्रधान अलंकार आहे. अतिशयोक्तींत सापडणाऱ्या अध्यवसानाकडे म्हणजे निश्चयाकडे जाण्याच्या मार्गांत तो रूपकाच्या पुढला टप्पा आहे असें म्हणतां येईल. ‘ मुख हा चंद्र आहे ’ हें रूपक होय. पण ‘ हें मुख नव्हे, हा चंद्र होय ’ ही अपन्हुति झाली. दोहोंतहि अभेदच आहे. पण यांत रूपकापेक्षा अभेद अधिक जोराने मांडला आहे. मुखाचें मुखत्व बाधित करून मग चंद्राचा त्यावर आरोप केला आहे.

अपन्हुति अलंकार सादृश्यावर आधारलेला आहे. प्रकृताचा त्यांत निषेध करून मग अप्रकृताचा आरोप केलेला असतो. यांत दोहोमधील सादृश्य प्रतीत करून देण्याचा कवीचा हेतु असतो.

अपन्हुतीमध्ये निषेध व आरोप अशा दोन क्रिया एकामागे एक होतात. या दोन्हीहि निरानिराळ्या वाक्यांत केलेल्या असतील. उदा. ‘ हें मुख नव्हे; हा चंद्र आहे.’ किंवा या दोन्हीहि गोष्टी एका शब्दानेच सांगितल्या असतील. उदा “सखि, या मदनाची दुष्टता पाहा ! याने आम्रमंजरीच्या मिषाने

विषयुक्त बाणच सोडले आहेत. " येथे निषेध आणि आरोप एकाच वाक्यांत साधले आहेत. एखादें वाक्य वाचल्यानंतर निषेध आणि आरोप या क्रिया जर त्यांतून प्रतीत झाल्या तर तेथे अपन्हुति आहे असें समजावें. उदा. चंद्राच्या कलंकाला उद्देशून कवि म्हणतो—' याला कोणी कलंक म्हणतात, तर कोणी चिखल म्हणतात; पण मला वाटतें चंद्राने प्यालेला हा काळोख आहे.' येथे कवीने दुसऱ्याचें मत देऊन आपण त्याच्याशीं सहमत नाही असें दाखविलें आहे. यांत निषेध आणि आरोप गर्भित असल्याने हा अपन्हुति अलंकार आहे.

**अपन्हुति आणि रूपक**—दोन्हीहि अलंकार सादृश्यावर आधारलेले असून अभेदप्रधान आहेत पण अपन्हुतींत उपमेयाचा निषेध करून उपमानाचा आरोप केलेला असतो तर रूपकांत उपमेयाचा निषेध न करतां केवळ उपमानाचा आरोपच असतो.

अपन्हुतींतील अवश्य गोष्टी अशा:—

१. अपन्हुतींत उपमेयाचा निषेध आणि उपमानाचा आरोप असतो.

२. यांतील निषेध आहार्य असतो, वास्तविक नसतो. उदा. 'हें मुख नाही' यांतील निषेध कवीने हेतुपुरःसर केला आहे. वस्तुतः त्याला मुखत्वाची जाणीव आहे.

३. निषेध आणि आरोपाचा हा हेतु सादृश्यप्रतीति करून देण्याचा असतो.

४. निषेध आणि आरोप अनेक प्रकारें केलेले असतील. (अ) एका वाक्यांत निषेध आणि दुसऱ्या वाक्यांत आरोप असेल. (ब) तर कित्येकदा दुसऱ्याचें मत म्हणून दिलें असेल व आपण त्याच्याशीं सहमत नाही असें सांगितलें असेल; (क) तर कित्येकदा 'मिष'—'व्याज' इत्यादि शब्दांच्या योगाने निषेध आणि आरोप एकाच वाक्यांत सांगितलें असतील.

५. निषेध आणि आरोप यांपैकी कोणतेहि अगोदर किंवा नंतर येऊं शकेल. या दोन गोष्टी त्यांत असल्या म्हणजे झालें.

म्हणून अपन्हुतीची व्याख्या अशी करतां येईल—

**(प्रकृताच्या) (किंवा) उपमेयाच्या (खऱ्या) स्वरूपाचा निषेध करून जेथें लगेच (अप्रकृताचा किंवा) उपमानाचा त्यावर आरोप केलेला असतो तेथें अपन्हुति अलंकार होतो.**

उदाहरणें—

(१) ' ही जलवृष्टि नव्हे, तर अमृतवृष्टीच होय. '

येथें ' जलवृष्टि ' या उपमेयाचा निषेध केला असून ' अमृतवृष्टि ' या उपमानाचा आरोप केला आहे. येथें निषेध व आरोप यांचा हेतु सुखदायकत्वाच्या सादृश्याची प्रतीति करून देणें हा होय. म्हणून येथें अपन्हुति अलंकार झाला.

(२) रामा ! नोहे हे लंकापुरी । प्रत्यक्ष काळव्याघ्राची दरी ।
तेथें तुम्ही मानववीरीं । येइजे हें अपूर्व वाटे ॥

—मुक्तेश्वर, शतमुखरावणाख्यान.

येथें ' लंकापुरी ' हें उपमेय असून ' काळव्याघ्राची दरी ' हें उपमान आहे. ' नोहे ' या शब्दानें उपमेयाचें स्वरूप झाकून टाकून त्यावर उपमानाचा आरोप केला आहे. म्हणून येथें अपन्हुति हा अलंकार झाला आहे.

## अपन्हुतीचे प्रकार

अपन्हुतींतील आरोप व निषेध दोन वेगवेगळ्या वाक्यांत नकारार्थी शब्द वापरून स्पष्टपणें केलेले असतील किंवा मिष–व्याज–छल इत्यादि शब्दांनी एका वाक्यांतच केले असतील. पहिल्यांत दोन्हीहि स्पष्ट शब्दांनी सांगितलेलें असतात. तर दुसऱ्यांत ते अर्थतः असतात. कित्येकदा मिष, छळ, इत्यादि शब्द न वापरतांच निषेध सूचित केलेला असतो. ही गर्भित अपन्हुति होय.

म्हणून अपन्हुतीचे प्रकार पुढीलप्रमाणे—

अपन्हुति

| शाब्द | आर्थ | गर्भित |
|---|---|---|
| ( निषेध व आरोप स्पष्ट असतांना ) | ( मिष, व्याज इत्यादि शब्दांनी निषेध दर्शविला असतांना) | (निषेध व आरोप सूचित असतांना) |

(१) न हे नयन, पाकळ्या उमलल्या सरोजांतिल ।
न हें वदन, चंद्रमा शरदिंचा गमे केवळ ॥
न हा अधर तोंडलें, नव्हत दांत हे कीं हिरे ।
स्वरूप तव तें मनीं अचल गे ! वसो गोजिरें ॥

—द. तु. पणशीकर

या पद्यांत नयन, वदन, अधर व दांत या उपमेयांचा स्पष्ट शब्दांत निषेध केला असून त्यांवर अनुक्रमें पाकळ्या, चंद्रमा, तोंडलें व हिरे या उपमानांचा आरोप केला आहे. म्हणून प्रस्तुत उदाहरणांत शाब्द अपन्हुति हा अलंकार झाला.

(२) सखिहस्तीं हस्त न वृष पांडवहृदयांत सायका मारी ।
क्रोधातें भीम गिळी, गरळातें जेंवि काय कामारी ॥

—मोरोपंत, सभापर्व

धर्मराजाने द्यूत खेळतांना ज्या वेळीं द्रौपदीला पणास लावलें त्या वेळीं कर्णाला मोठा आनंद होऊन त्याने आपला मित्र जो दुर्योधन त्याच्या हातावर हात मारला ( टाळी दिली ), वरील आर्येच्या पहिल्या ओळींत ‘ हातावर हात मारणें ’ ह्या उपमेयाच्या स्वरूपाचा स्पष्टपणें निषेध करून त्याच्या ठिकाणीं ‘ हृदयांत बाण मारणें ’ ह्या उपमानाचा आरोप केला आहे. म्हणून हें शाब्द अपन्हुति या अलंकाराचें उदाहरण होय.

(३) रे पाहिलें तुम्हाला पाळत ठेवोनि त्या घनाजीने,
काय ? घनाजीने ? नहि, त्याच्या रूपें अहो यमाजीने !
—चंद्रशेखर, 'कायहो चमत्कार'

वरील उदाहरणांत धनाजी हें उपमेय असून यमाजी हें उपमान आहे. 'तो धनाजी नसून यमाजीच होता' अशा अर्थाचें विधान केल्यामुळे शाब्द अपन्हुति झाली.

आर्थ अपन्हुतीचीं उदाहरणें:—

(१) 'सूनबाईच्या रूपाने साक्षात् लक्ष्मीच आमच्या घरांत प्रविष्ट झाली आहे.'

या वाक्यांत सूनबाई हें उपमेय व लक्ष्मी हें उपमान आहे. शाब्द अपन्हुतींतल्या उदाहरणांत उपमेयाचा निषेध जसा स्पष्ट शब्दांत आढळतो तसा प्रकार येथे नाही. 'रूपाने' हा शब्द योजून तो निषेध दर्शविला आहे. म्हणून हें आर्थ अपन्हुतीचें उदाहरण होय.

(२) सृष्टीही हिममिषें मनोहर नव मोत्यांची जाळी
घाली मजवर ! सजवी मजला ! माय तशी प्रतिपाळी !
— रे. टिळक, वनवासी फूल.

या उदाहरणांत 'हिम' या उपमेयाचा स्पष्ट शब्दांत निषेध केलेला नाही, तथापि 'हिमाच्या मिषाने मोत्यांची जाळी घातली आहे' असें सांगण्याने हिमाचा निषेध सूचित केला आहे व त्या जागीं मोत्यांच्या जाळीचा आरोप केला आहे म्हणून ही आर्थ अपन्हुति होय

(३) सूत वरुनि लाजे कुरुवरगुरुविरहाकुळा, कृशा निपट, ।
अरिसेना, काढीना धूलिपटलमिष मुखावरूनि पट ॥
—मोरोपंत, कर्णपर्व

भीष्म व द्रोण हे कुरुसैन्याधिप मृत्यु पावल्यावर कर्ण कुरुसैन्याचा प्रमुख झाला. कर्ण हा सूत असल्यामुळे अरिसैन्यास म्हणजे कौरवसेनेस त्याच्या अधिपत्याची लाज वाटली असें सांगितलें आहे. सेनेच्या हालचालीमुळे पुष्कळ धूळ उडाली होती व त्या धुळीच्या वेष्टनामुळे कुरुसेना स्पष्टपणें दिसत

नव्हती. धर्म म्हणतो, " ही धूलि नव्हे तर धूलिमिषाने कौरवसेनेने लज्जेमुळे घेतलेला बुरखा आहे. " वरील आर्येंत ' धूलि ' या उपमेयाचा स्पष्ट शब्दांत निषेध नसला तरी ' मिष ' शब्दाने तो निषेधाचा अर्थ व्यक्त होतो म्हणून हें आर्थ अपन्हुतीचें उदाहरण होय.

गर्भित अपन्हुतीचें उदाहरण—

(१) " जिजाईच्या पोटीं शिवाजीचा जन्म झाला असें सांगण्यांत येतें, पण मी म्हणतों तिच्या पोटीं प्रत्यक्ष शंकरांनीच अवतार घेतला." येथे अपन्हुति गर्भित आहे कारण यांतील निषेध व आरोप दोन्हीहि सूचित आहेत.

अपन्हुति कित्येकदा मालारूपहि असू शकते. जेथे उपमेयाचा एकदा निषेध केला असून नंतर एकामागे एक निरनिराळ्या उपमानांचा आरोप केला जातो, तेथे मालापन्हुति होते.

उदा.—

सेतु न तो यत्पतिने स्वसुता नेली जशी वृकें एणी ।
त्या लंकेची श्रीभूदेवीने ओढिली असे वेणी ॥१॥
रामनय-श्रीलग्नीं लंका घाली सुनील पाटावे ।
सेना-वऱ्हाडणीला पायघडी कां असें न वाटावें ॥२॥
बहुधा तुच्छ जलधि-तृण चाटायाचा धरोनिया वीट ।
गेला प्रभु-प्रतापासित-पथ रक्षोटवीकडे नीट ॥३॥
की पतित पति त्यागुनि विश्वशरण्याकडे रडत वाटे ।
आली जी लंकाश्री, तीचा तो सांजनाश्रु पथ वाटे ॥४॥

—मोरोपंत, वनपर्व.

या आर्यांपैकी पहिल्या आर्येंत ' सेतु ' या उपमेयाचा एकवार स्पष्ट निषेध केला असून त्यावर लंकेच्या वेणीचा आरोप केला आहे. त्या नंतर पुढच्या आर्यांतून ' सुनील पाटाव्याची पायघडी '' असित पथ ' व ' सांजनाश्रु पथ ' या निरनिराळ्या उपमानांचा एकामागून एक आरोप केला असल्यामुळे येथे अपन्हुतींची माला निर्माण झाली.

## छेकापन्हुति

आतापर्यंत सादृश्यमूल अपन्हुतीचें विवेचन केलें आहे. पण आलंकारिकांनी हिचें क्षेत्र वाढविलें आहे. कित्येकदा केवळ श्लिष्ट शब्दगत सादृश्यावर अपन्हुति आधारलेली असते.

जल्पत माझ्या पदीं लागतो लोचट बाई किती ?
सखे तो कांतः तुझा कां गडे ।
नव्हे ग ! नूपुर हा बडबडे ॥

‘ येथे जल्पत माझ्या पदीं लागतो ’ हीं पदें कांत आणि नूपुर यांना लागतात. यांत कांत हा प्रकृत आणि नूपुर अप्रकृत आहे. हा कांत आहे काय असें विचारलें असतां त्याचा निषेध करून नूपुर आहे असें नायिका सांगते. हें बोलणें खुबीदार असतें. चतुर लोक आपल्या भाषणांत अशा खुबीदार बोलण्याचा उपयोग करतात, ( छेक = चतुर ) म्हणून अपन्हुतीच्या या प्रकारास **छेकापन्हुति** म्हणतात. छेकापन्हुतीचीं उदाहरणें वाङ्मयांत फारशीं आढळत नाहीत. रामजोशी यांची पुढील छेकापन्हुति प्रसिद्धच आहे.

राधासखि संवादी छेकापन्हुति आयका ।
रसिक हो किती चतुर नायका ॥ धृ. ॥
अंबरगत परि पयोधरातें रगडुनि पळतो दुरी ।
काय हा धीट म्हणावा तरी ॥
तो नंदाचा मूल काय गे ! सांग कन्हय्या हरी ।
नव्हे गे, मारुत मेघोदरीं ॥ १ ॥
सासुसासरापति यां देखत अधरामृतमाधुरी ।
घेतसे काय वदावें तरी ॥
तो नंदाचा मूल काय गे सांग कन्हय्या हरी ।
नव्हे गे, मधुपव्रज हा करी ॥ २ ॥
पटविघटित–कुचतटिंहि वसंतीं हळुच येउनी उरीं ।
शीतल स्पर्श सुगंधित करी ।
तो नंदाचा मूल काय गे सांग कन्हय्या हरी ।
नव्हे हा मलयज करि चातुरी ॥ ३ ॥

(चाल) गुणवंत कुचावरि लोळे, अति शोभला ।
तो कृष्ण काय ? नव्हे, हार कळेना तुला ॥
बाई ! अंगमर्दनीं अति सुखकर वाटला ।
तो कृष्ण काय गे ? कर दूतीचा मला ॥
मज शीतळ करितो श्रमी होउनी भला ।
तो कृष्ण काय ? नव्हे व्यजन सुवंशातिला ॥
यापरि निजसंतोषें वर्णी पुसतां यदुनायका ।
लोपवी मुरलीच्या गायका ॥
राधा सखि संवादीं. ॥ —रामजोशी.

**ससंदेह, भ्रांतिमान् व अपन्हुति या अलंकारांचीं अभ्यासार्थ उदाहरणें:—**

(१) हंसा ! विलोकुनि सुधाकर अष्टमीचा ।
म्यां मानिला निटिल देश तिचाच साचा ॥
शंख–द्वयीं धरुनि कौंकुम कीरवाणी ।
लावावया तिलक लांबविला स्वपाणी ॥
—रघुनाथ पंडित, 'दमयंती स्वयंवर'

(२)कीं चंद्र नव्हे तें स्वेत–दीप । माझारि सावळें तें श्रीकृष्णाचें रूप ।
वरि टाकौनि पाहों आलें स्वरूप । श्रीचक्रधराचें ॥
की भू–गोळकाचा प्रासादीं जैसा । गळिवा अमृताचा आरिसा ।
तेथ श्रीकृष्णांचा बिंबला ठसा । कळंकु नव्हे तो ॥
—नरेंद्र, रुक्मिणीस्वयंवर.

(३) हें कमल कीं सुधाकर हा निर्णय आमुचा नसे ठरला ।
आतिफुल्ल निष्कलंकें त्वद्वदनें हृदयिं संशयचि भरला ॥
—केमकर, 'अलंकारविकाश'

(४) मत्स्य उसळतां उदरें त्यांचीं चमकति वारंवार ।
त्याच मिषें ती नदी तुजवरी फेकिल कटाक्ष फार ॥
—कृष्णशास्त्री चिपळूणकर, मेघदूत.

(५) तुहिनकर नव्हे, हें बीज चिंतालतेचें,
विकसित अथवा हें पुष्प उद्वेगतेचें ।
अभिनव मदनाचें छत्र किंवा उभारे ।
युवतिजन जयाच्या दर्शनें मात्र मारे ॥

—सामराज 'रुक्मिणीहरण'

(६) प्रथम म्हणे हें काय द्युतिमंडल ? काय उतरला भानु ? ।
सानूरुहि वरि दिसतो जाणों चालत असेल मणिसानु ॥ १ ॥
मग नगरी हें कळतां ठाकोनि करी विचार उज्ज्वलधी ।
श्रीद्वारका नव्हे हे आलिंगुनि कां हिला नसे जलधी ॥ २ ॥

मोरोपंत, कृष्णविजय

(७) सांगद सखड्ग तो कपिकेतुशरच्छिन्न वीरभुज गमला ।
सहसा खगपतिखंडितभोग तदाननविमुक्त भुजग मला ॥

—मोरोपंत, द्रोणपर्व

## (९) उत्प्रेक्षा

सादृश्यावर आधारलेले अलंकारांचे दोन वर्ग आपण आतापर्यंत पाहिले. उपमा, उपमेयोपमा, अनन्वय आणि स्मरण हे भेदाभेदप्रधान अलंकार आहेत. तर रूपक, ससंदेह भ्रांतिमान् आणि अपन्हुति हे अभेदप्रधान अलंकार आहेत. उत्प्रेक्षा अलंकार आणि यानंतरचा अतिशयोक्ति अलंकार हे सुद्धा अभेदप्रधानच आहेत. पण रूपकादि चार अलकार व उत्प्रेक्षा–अतिशयोक्ति यांच्यांत एक महत्त्वाचा फरक आहे. रूपकादि अलंकार अभेदप्रधान असले तरी त्यांत आरोपाची क्रिया आहे. म्हणजे कवि त्यांत उपमानाचा उपमेयावर आरोप करतो. पण उत्प्रेक्षा–अतिशयोक्ति यांत अध्यवसायक्रिया आहे. अध्यवसाय म्हणजे निश्चय. उपमेय हें उपमानच आहे अशी निश्चिति होणें ही मानसिक क्रिया यांत असते. ही निश्चिति पूर्णपणें झाली तर अतिशयोक्ति होते. ही निश्चिति पूर्णत्वाला कांहीशी कमी असली तर उत्प्रेक्षा होते. उत्प्रेक्षेंत उपमेयाची उपमानत्वाने निश्चयपूर्वक जाणीव झालेली नसते, पण जाणीव झाल्यासारखें वाटत असतें. याला साहित्यशास्त्रांत **"प्राय: तादात्म्य"** असें म्हणतात.

उदा.—रोमिओ ज्यूलियट्च्या घरावरून जातांना ज्यूलिएट् त्याला एकदम दिसते व त्याच्या मुखांतून " Oh, my moon ! " असे उद्गार निघ-तात. येथे मुखाचें चंद्राशीं पूर्ण तादात्म्य झालें आहे. म्हणून ही अतिशयोक्ति आहे. पण " मला वाटतें हा चंद्र आहे " अशी जाणीव होणें यांत उपमेयाचें उपमानाशीं पूर्ण तादात्म्य नाही यांत थोडीशी तरी शंकेला जागा आहे. म्हणून ही उत्प्रेक्षा होय. अशा प्रकारच्या जाणिवेला **संभावना** म्हणतात. संभावना आणि प्रायः तादात्म्य एकच होत. अतिशयोक्तींत सिद्ध अध्यवसाय असतो, तर उत्प्रेक्षेंतील अध्यवसाय साध्य असतो. मात्र हा अध्यवसाय आहार्य असतो हें विसरतां कामा नये.

अर्थात् अशा संभावनेंत शंकेला किंवा संशयाला थोडीशी जागा असते. संशय ससंदेहांतहि असतो; पण ससंदेहांतला संशय आणि उत्प्रेक्षेंतला संशय यांच्यांत फरक आहे. ससंदेहांत दोन्हीहि बाबतींत संशयाचें प्रमाण सारखेंच असतें. पण उत्प्रेक्षेंत संशयाचें प्रमाण उपमानाकडे इतकें झुकलेलें असतें की उपमानाशीं होणाऱ्या उपमेयाच्या तादात्म्याची जवळ जवळ खात्रीच होते. ससंदेहांत संशय किंवा संदेह उभयकोटिक असतो; तर उत्प्रेक्षेंत तो **उत्कटकोटिकसंदेह** असतो असें साहित्यशास्त्राच्या परिभाषेंत म्हणतां येईल.

सारांश, ' हा चंद्र असावा काय ? " येथे ससंदेह आहे; ' मला वाटतें हा चंद्रच आहे ' ही उत्प्रेक्षा होय; ' अहा ! चंद्र उगवला ' हा मुखाच्या बाबतींत निघालेला उद्गार ही अतिशयोक्ति. उत्प्रेक्षेचीं प्रधान अंगें अशीं—

१ उत्प्रेक्षेमध्ये संभवना असते. उपमेय हें जणू कांही उपमानच आहे अशी कल्पना कवि करीत असतो.

२. ही संभावना आहार्य असते.

३. यामध्ये संभावना दाखविण्यासाठी गमे, भासे, जणू, वाटे इत्यादि शब्द वापरतात.

४. कित्येकदा या शब्दांशिवायहि उत्प्रेक्षा होऊं शकते.

म्हणून उत्प्रेक्षेचें लक्षण असें करतां येईल—

**उपमेय हें जणू काय उपमानच आहे अशी रमणीय साधर्म्याला अनुसरून कवीने जेथे संभावना केली असते तेथे उत्प्रेक्षा अलंकार होतो.**

उदाहरणें—

( १ ) ज्ञानेश्वरांची वाणी म्हणजे जणूं कांहीं अमृताचा प्रवाहच आहे.

वरील वाक्यांत ‘ वाणी ’ आणि ‘ अमृताचा प्रवाह ’ या दोहोंत प्रायः तादात्म्य वर्णिलेलें आहे. माधुर्याच्या साहश्यामुळे त्या दोन्ही गोष्टी जवळ जवळ एकच होत अशा अर्थाचें तें विधान आहे. हें प्रायः तादात्म्य दर्शविण्यासाठी ‘ जणू ’ हा शब्द वापरला आहे. म्हणून हा उत्प्रेक्षा अलंकार होय.

( २ ) नवीं फुलें फुलतीं
वसन्तीं नवीं फुलें फुलतीं
जणु तारे उतरुन करमणुकीस्तव धरणीवर येती ।

—रे. टिळक, ‘ सृष्टीची करमणुकीची घटका. ’

येथे ‘ फुलें ’ या उपमेयावर ‘ तारे ’ या उपमानाची संभावना केलेली आहे. सुबकतेच्या व सौंदर्याच्या साहश्यावर ही उत्प्रेक्षा केलेली आहे.

( ३ ) शेतांतून जाणारी अरुंद, वेडीवाकडी वाट पाहून असें वाटतें की ती जणू कांहीं भली मोठी नागीणच पसरलेली आहे !

वरील वाक्यांत ‘ वाट ’ हें उपमेय असून ‘ नागीण ’ हें उपमान आहे. अरुंद व वेडीवाकडी या विशेषणांनी साहश्य सुचविलें आहे. वाट ही जणूं नागीणच आहे अशी संभावना केल्यामुळे येथे उत्प्रेक्षा अलंकार झाला.

उत्प्रेक्षेचे प्रकार

- स्वरूपोत्प्रेक्षा
- हेतूत्प्रेक्षा
- फलोत्प्रेक्षा

कवि कोणत्या तरी घटनेचें वर्णन करीत असतो. घटनेचीं तीन अंगें असतात. (१) प्रत्यक्ष घटना म्हणजे वस्तु किंवा क्रिया. (२) घटनेचा हेतु; आणि (३) घटनेचें फल. कोणत्याहि घटनेचें वर्णन करीत असतांना कवि जेव्हा उत्प्रेक्षा वापरतो तेव्हा तो वरील तीनपैकी कोणत्या तरी एका अंगावर संभावना करीत असतो. त्याला अनुसरून उत्प्रेक्षेचे (१) स्वरूपोत्प्रेक्षा; (२) हेतूत्प्रेक्षा; आणि (३) फलोत्प्रेक्षा असे अनुक्रमें तीन प्रकार होतात.

[१] **स्वरूपोत्प्रेक्षा**—एखादा पदार्थ किंवा क्रिया यांचें वर्णन करतांना कवि जेव्हा तो दुसराच पदार्थ किंवा दुसरीच क्रिया असावी अशी कल्पना करतो तेव्हा स्वरूपोत्प्रेक्षा अलंकार होतो. यालाच वस्तूत्प्रेक्षा असेंहि म्हणतात.

उदाहरणें—

आपलें जीवन जणूं पाण्यावरील बुडबुडाच आहे.

वरील वाक्यांत जीवन या वस्तूवर बुडबुडा या वस्तूची संभावना केली आहे. नश्वरतेच्या सादृश्यावर ही उत्प्रेक्षा आधारलेली आहे. येथे वस्तूवर उत्प्रेक्षा केल्यामुळे वस्तूत्प्रेक्षा ऊर्फ स्वरूपोत्प्रेक्षा हा प्रकार झाला.

( २ ) शशिरायाही आंत उतराला
कलहंसापरि पोहुं लागला
तटिनीने जणु हृदयीं धरिला
प्रेमळ कान्त । पाहुनी इथे एकांत ॥

—दत्त, 'विश्वमित्रीच्या काठीं'

वरील कडव्यांत 'शशिराया' हें उपमेय व 'कांत' हें उपमान होय. या ठिकाणी 'शशिराया' या वस्तूवर उत्प्रेक्षा केली असल्यामुळे येथेंहि वस्तूत्प्रेक्षा झाली.

(३) कुठे कळकबेटांतुनि निघतां सुरांत वारा वाहे ।
निजली राई मधुनी मधुनी वाटे घोरत आहे ॥

—गोविंदाग्रज, 'कृष्णाकाठीं कुंडल'

या उदाहरणांत वाऱ्याच्या वाहण्याच्या क्रियेवर उत्प्रेक्षा केली आहे. 'वाऱ्याचें वाहणें' ही क्रिया म्हणजे राईच्या घोरण्याच्या क्रियेसारखी वाटते. अशी कल्पना केली आहे. म्हणून हें स्वरूपोत्प्रेक्षेचें उदाहरण होय.

(४) विंध्य तसा निजला तो! वदनदरीमाजि निबिड अंधार।
फार भयंकर भासे, पाताळाचेंचि काय तें दार!॥
—मोरोपंत, मंत्ररामायण.

वरील आर्येंत निजलेल्या कुंभकर्णाच्या देहाचें वर्णन आहे. 'कुंभकर्णाचा विशाल देह विंध्यपर्वतासारखा दिसला' यांत उपमा अलंकार आहे. नंतर कुंभकर्णाच्या वदनावर दरीचा आरोप केल्यामुळे रूपक झालें. दुसऱ्या ओळींत कुंभकर्णाच्या अर्धवट उघड्या तोंडावर पाताळाच्या द्वाराची संभावना केली आहे. त्या ठिकाणी वस्तूत्प्रेक्षा ऊर्फ स्वरूपोत्प्रेक्षा झाली.

(५) मुखांतुनी दुग्ध गळे सुनिर्मळ
उरावरी ये अतिशुभ्र ओघळ
मंदाकिनीचा गगनीं प्रवाह तो
चंद्रप्रभापांडुर काय वाहतो॥ —मोरोपंत, छंदोरामायण.

रामाच्या उरावरून वाहणाऱ्या 'दुधाचा ओघळ' या वस्तूच्या बद्दल 'मंदाकिनीचा प्रवाह' या दुसऱ्या तत्सदृश वस्तूची कल्पना केली आहे. म्हणून 'स्वरूपोत्पेक्षा' अलंकार झाला.

[ २ ] **हेतूत्प्रेक्षा**—कवि वस्तुस्थितीचें वर्णन करीत असतो पण ती वस्तुस्थिति कोणत्या तरी प्रतिभानिर्मित कारणाने घडून आली असें दाखविलें असतें तेव्हा हेतूत्प्रेक्षा होते.

उदाहरणें:— (१) होता नभीं तपत जोंवरि सूर्यकांत।
दिव्य प्रभा धरुनि शोभत वस्तुजात॥
कालक्रमें बघुन अस्तगता तयास।
शोकें जणो विकल सृष्टि दिसे उदास॥
—वा. वा. खरे.

सूर्यास्त झाल्यामुळे सृष्ट पदार्थांचें तेज लोपलें, पण ते निस्तेज होण्याचें कारण म्हणजे जणूं 'शोक' हें होय अशी कविप्रतिभानिर्मित कल्पना केलेली आहे. म्हणून हें हेतूत्प्रेक्षेचें उदाहरण होय. ( 'हेतु' म्हणजे कारण )

(२) थंडीची हुडहुडी न लागो उषासुंदरीला ।
पूर्वेच्या शेगडींत म्हणुनी विस्तव पेटविला ।।
—केशवकुमार, 'अरुण'

सृष्टिक्रमाप्रमाणे रात्रीनंतर उषःकाल व अरुणोदय झाला. अरुणाची लाली हाच विस्तव असें रूपक केलें आहे व हा विस्तव पेटविण्याचें कारण ( उषासुंदरीला थंडी लागूं नये हें ) कविप्रतिभानिर्मित होय. या उदाहरणांत अरुणोदयाचा हेतु सांगितला आहे म्हणून हेतूत्प्रेक्षा आहे.

( ३ ) स्वर्ग घरेला चुंबायाला
खाली लवला मजला गमला
—केशवसुत, 'सतारीचे बोल.'

सतारीचे 'दिडदा' 'दिडदा' असे मधुर बोल ऐकत असतां कवीला स्वर्गीय आनंद झाला. त्या वेळीं स्वर्ग भूमीवर उतरला असें काव्यमय वर्णन कवीने केलें आहे. 'चुंबन घेणें' हा हेतु कविप्रतिभानिर्मित आहे. म्हणून ही 'हेतूत्प्रेक्षा' होय.

( ४ ) हें कळकीचें जीर्ण मोडकें दार
करकरकर वाजे फार
हें दुःखाने कण्हुनि कथी सकलांला
दारिद्य आपुलें बाळा
—दत्त, 'निज नीज माझ्या बाळा'

येथे दाराच्या करकर वाजण्यावर कण्हण्याची कल्पना केली आहे. येथे उत्प्रेक्षावाचक शब्द न वापरतां उत्प्रेक्षा अलकार साधला आहे.

[३] **फलोत्प्रेक्षा**— एकाद्या क्रियेचें वर्णन करीत असतांना त्या क्रियेपासून कोणते तरी कविप्रतिभानिर्मित फल मिळावयाचें आहे किंवा ती क्रिया कोणते तरी कविप्रतिभानिर्मित फल मिळविण्याकरिता घडत आहे असें वर्णन असतें तेथे फलोत्प्रेक्षा होते.

उदा. (१) प्रभातीं फुल्लांभोरुह–समुदयालागिं भजतो ।
तसा वृक्षांच्याही शिथिल कुसुमांलागिं हरितो ॥
तुझ्या श्वासामध्ये परिमल निसर्गेच वसतो ।
जणू तत्प्राप्त्यर्थ स्फुट पवन हा यत्न करितो ॥
—गणेशशास्त्री लेले.

प्रभातकाळीं कमलांचा व वृक्षांवरील फुलांचा सुगंध वायु हरण करतो. सुगंध हरण करण्याच्या क्रियेचें फळ म्हणजे अज राजपुत्राच्या ‘ वदनाचा सुवास प्राप्त करणें ’ हें येथे सांगितलें आहे. हें फळ केवळ काव्यमय आहे. म्हणून हें फलोत्प्रेक्षेचें उदाहरण ठरतें.

(२) तेव्हा धर्म खवळला, सोडी अत्युग्रबाण, तो यातें ।
भेदुनि महींतहि शिरे, प्याया पाताळ सिंधुतोयातें ॥
—मोरोपंत, कर्णपर्व.

बाण पृथ्वींत शिरण्याची जी क्रिया घडली त्या क्रियेपासून ‘ पाताळ-गंगेचें पाणी पिणें ’ हें कविप्रतिभानिर्मित फळ दर्शविलें आहे. म्हणून ही फलोत्प्रेक्षा झाली. या उदाहरणांत ‘ जणू ’ ‘ वाटे ’ इत्यादि संभावनादर्शक शब्द प्रत्यक्ष वापरले नसल्यामुळे अशा उत्प्रेक्षेस ‘ प्रतीयमानोत्प्रेक्षा ’ म्हणतात.

## मालोत्प्रेक्षा.

कवि जेव्हा एकाच उपमेयावर अनेक उपमानांची संभावना करतो तेव्हा मालोत्प्रेक्षा होते.

उदाहरणें—

( १ ) वाटे उषाच हसते फिरते जगांत,
की स्फूर्ति हीच कविची मधुरूप घेत;
अव्याजता रसिकता जणुं मूल झाली
स्वर्गांतुनी सहज भूवरि आज आली.
—रे. टिळक, ‘ एक अमेरिकन मुलगी. ’

वरील श्लोकांत एका मुलीचें वर्णन करतांना तीन उत्प्रेक्षा योजल्या आहेत. ती मुलगी म्हणजे ‘ उषा ’ वाटते, किंवा ‘ कविस्फूर्ति ’ भासते,

किंवा बालरूप धारण करणारी ' अव्याज रसिकता ' गमते अशा काव्यमय कल्पना केलेल्या आहेत. एकाच उपमेयावर अनेक उपमानांची संभावना येथे केली असल्यामुळे हें मालोत्प्रेक्षेचें उदाहरण झालें. ' वाटे ', ' जणु ' हे उत्प्रेक्षादर्शक शब्द या श्लोकांत उक्त आहेतच.

(२) अरुण चितारी नभःपटाला रंगवितो काय,
प्रतिभापूरित करी जगाला की हा कविराय ?
की नव युवती उषा सुंदरी दारीं येवोनी
रंगवल्लिका रम्य रेखिते राजस हस्तांनी ?
दिवसयामिनी परस्परांचें चुंबन घेतात—
अनुरागाच्या छटा तयांच्या खुलल्या गगनांत !
किंवा ' माझी चोरुनि नेली मोत्यांची माला '
म्हणुनि नभःश्री रुसली, आली लाली गालांला ?
—बालकवि, ' अरुण '

वरील पद्यात ' अरुण ' या एका उपमेयावर अनेक उपमानांची संभावना केली आहे. भासे, वाटे वगैरे उत्प्रेक्षादर्शक शब्द मात्र कोठेच योजले नाहीत. म्हणून येथे प्रतीयमान अशी मालोत्प्रेक्षा झाली.

## ( १० ) अतिशयोक्ति.

प्रस्तावनेमध्ये लक्षणेच्या विवेचनांत गौणी लक्षणेचे दोन प्रकार दिले आहेत. त्यांपैकी सारोपा गौणी लक्षणा रूपकांत सापडते तर साध्यवसाना गौणी लक्षणा अतिशयोक्तींत असते. ज्या वेळीं अमुक एक माणूस गाढव आहे, असें आपण म्हणतों तेव्हा मूर्खत्वाच्या साम्यावरून त्या माणसावर आपण गाढवाचा आरोप करतो. पण जेव्हा ' गाढवा, इकडे ये ' असें त्या माणसास हाक मारतो तेव्हा त्याच गुणसाम्यावरून त्याचे गाढवाशीं पूर्ण तादात्म्य करीत असतो. उपमेयाचा उपमानाशीं इतका सारखेपणा येथे अपेक्षित आहे की उपमेयाचें उपमेयत्व शिल्लकच राहिलें नाही. उपमानत्वच त्याच्या ठिकाणी आहे अशी प्रतीति या लक्षणेच्या मागे आहे. अध्यवसान म्हणजे उपमानाशीं झालेल्या उपमानाच्या पूर्ण तादात्म्याची प्रतीति किंवा निश्चय.

उपमेय आणि उपमान यांच्यांत सादृश्य असलें तरी इतर बाबतींत वस्तुतः भेद असतो. ' मुख चंद्राप्रमाणे आहे ' असें जेव्हा कवि म्हणतो तेव्हा मुख व चंद्र यांच्यामधील सादृश्याबरोबरच त्यांच्या मधील भेदाचीहि त्याला जाणीव असते. ' मुखचंद्र ' किंवा ' मुख चंद्रच आहे ' असें जेव्हा तो म्हणतो तेव्हा मुख व चंद यांच्या मधील अभेद तो दाखवीत असतो. पण आपण कोणत्या दोन वस्तूंमध्ये अभेद मानतों हेंहि तो सांगून जातो. येथे मुखावर चंद्राचा आरोप केला आहे हें आपल्याला स्पष्ट दिसतें. पण आपली प्रिया एकदम दिसतांच त्या आनंदाच्या भरांत ' नयनांना आनंद देत हें चंद्रबिंब उगवलें ' असें तो एकदम उद्गारतो तेव्हा त्याला मुखाची चंद्रत्वाने जाणीव होते. चंद्राच्या ठिकाणी असलेलें आल्हादकत्व त्याला रमणीमुखाच्या ठिकाणी पूर्णांशाने दिसते, आणि त्या भरांत मुखाचें मुखत्व त्याच्या जाणीवेंत शिल्लक राहत नाही. मुखाऐवजी त्याला चंद्रच प्रतीत होतो.

बोलणाऱ्याच्या दृष्टीने हा प्रकार झाला. पण आपल्याला त्यांत काय दिसतें ? समजा, आपण त्या बोलणाऱ्या बरोबर उद्यानांत बसलों आहोंत, आणि आपल्या निराळ्याच गप्पा चालल्या आहेत. इतक्यांत तो उद्गारला, " नयनांना आनंद देत हें चंद्रबिंब उगवलें." आपण लगेच त्या बाजूला पाहिल्यास आपल्याला तेथे मुख दिसेल. आपल्याला दिसणारें मुख आणि आपल्या मित्राला दिसलेला चंद्र यांची संगति कशी लावणार ? मुखाच्या ठिकाणी आल्हादकत्व आहे आणि चंद्राच्या ठिकाणीहि तें आहे. आपल्या मित्रालासुद्धा वस्तुतः मुखाचेंच आल्हादकत्व प्रतीत झालें पण तें इतक्या पराकोटीचें आणि तीव्र होतें की त्यामुळे त्याला जें मुख दिसलें तें ' चंद्रत्वानेच दिसलें. ही जाणीव म्हणजे अध्यवसान होय. दुसऱ्या प्रकारें सांगावयाचें म्हणजे चंद्राने मुखाला गिळून टाकलें किंवा मटकावलें असें म्हणतां येईल. साहित्यशास्त्रांत याला ' निगरण ' असें नांव आहे. सारांश, वरील वाक्यांतून बोलणाराच्या दृष्टीनें मुखाचें चंद्रत्वाने अध्यवसान झालें, तर आपल्या दृष्टीने मुखाचें चंद्रान निगरण केलें. बोलणाराच्या दृष्टीने उपमेयाचें उपमानत्वाने अध्यवसान आहे तर ऐकणाऱ्याच्या दृष्टीने उपमेयाचें उपमानाने केलेलें निगरण आहे.

अशा प्रकारें दोघांनाहि या उद्‌गारामुळे उपमानोपमेयांतील सादृश्याची पराकाष्ठा प्रतीत झाली. या सादृश्यपराकाष्ठेच्या प्रतीतीमुळेच बोलणाऱ्याच्या मुखांतून तो उद्‌गार बाहेर पडला आणि तो ऐकतांच त्या सादृश्यपराकाष्ठेचा आपल्यालाहि बोध झाला. उपमेयाच्या ठिकाणी असलेली ही सादृश्याची पराकाष्ठा म्हणजे त्या सादृश्याचा परमोत्कर्ष होय. सादृश्याच्या या परमोत्कर्षालाच '**अतिशय**' असें नांव आहे. वरील प्रकारच्या उद्‌गारांतून उपमेयांच्या सादृश्याचा परमोत्कर्ष सांगितला जातो. म्हणजेच अशा प्रकारच्या उपमेयाच्या सादृश्याचा परमोत्कर्ष सांगणारी जी उक्ति तिला अतिशयोक्ति असें म्हणतात. तेव्हा **अतिशयोक्ति म्हणजे उपमेय किंवा प्रकृत वस्तूच्या ठिकाणी असलेल्या एखाद्या धर्माचा परमोत्कर्ष किंवा अतिशय यांचा बोध करून देणारें वचन किंवा उक्ति**. ( अतिशयः उत्कर्षः उपमेयस्य इत्यर्थः, तस्य उक्तिः । ) अतिशयोक्तीबद्दल एवढें विवेचन करण्याचीं दोन कारणें आहेत. एकतर आलंकारिकानी अतिशयोक्तीची सर्वसामान्य व्याख्या कोठे दिलेली नाही. फक्त प्रकार दिले आहेत. त्या प्रकारांतून सर्वसामान्य दिसून येणारी गोष्ट स्वतंत्र अशी न दिल्याने पुष्कळदा अतिशयोक्तीचें स्वरूप कळण्यास अडचण जाते. ती अडचण दूर व्हावी, हा या विस्तृत विवेचनाचा एक हेतु आहे. दुसरें, म्हणजे ' अतिशयोक्ति ' हा शब्द व्यवहारांत वापरतांना वाढवून सांगितलेली, म्हणून न पटणारी गोष्ट. जसें, ' एक हात लाकूड व दहा हात ढिलपी ' यासारखी गोष्ट, या अर्थाने आपण घेतो. तो अर्थ साहित्यशास्त्रांत घेऊन विद्यार्थ्यांचा गोंधळ होऊं नये, हाहि हेतु होय.

**प्रकृत वस्तूच्या ठिकाणीं असलेल्या एखाद्या धर्माचा परमोत्कर्ष किंवा अतिशय यासंबंधीं उक्ति म्हणजे अतिशयोक्ति.**
( अतिशयः उत्कर्षः, उपमेयस्य इत्यर्थः तस्य उक्तिः । )

## अतिशयोक्तीचे प्रकार.

निरनिराळ्या आलंकारिकांनी अतिशयोक्तीचे निरनिराळे प्रकार मानलेले आहेत. मम्मट चार प्रकार देतो, विश्वनाथ पाच प्रकार देतो, तर अप्पय्यदीक्षित सहा प्रकार देतात. हे सर्व प्रकार एकत्रित असे दाखवितां येतील—


अतिशयोक्ति
(१) निगरणातिशयोक्ति
(रूपकातिशयोक्ति)
(२) भेदकातिशयोक्ति
यद्यर्थातिशयोक्ति
पौर्वापर्यरूप किंवा
विपर्ययातिशयोक्ति
(३) संबंधातिशयोक्ति
(४) असंबंधातिशयोक्ति
(५) अत्यंतातिशयोक्ति
(६) अक्रमातिशयोक्ति

**( १ ) निगरणातिशयोक्ति किंवा रूपकातिशयोक्ति**—उपमेयांतील सादृश्यधर्मांचा परमोत्कर्ष दाखविण्याच्या उद्देशाने जेथे उपमेयाचें उपमानाने निगरण केलेलें असतें म्हणजे उपमेयाची प्रतीति उपमानत्वाने येते तेथे निगरणातिशयोक्ति किंवा रूपकातिशयोक्ति हा प्रकार असतो. हा प्रकार साध्यवसाना गौणी लक्षणेवर आधारलेला आहे. याचें विवेचन वर येऊन गेलें आहे

उदाहरणें:—

(१) 'सूपभर लाह्या त्यांत एक रुपया'

मुली मैत्रिणींना उखाणे व कोडीं ओळखायला सांगतात त्यांतलें हें उदाहरण आहे. 'बऱ्याच लाह्या व त्यांत असणारा एकच रुपया' याचें सादृश्य 'आकाशांतील तारे व तारांगणांतील चंद्र' यांच्याशीं आहे हें लक्षांत घेऊन तसें उत्तर देण्यांत येतें. येथे लाह्यांनी तारकांना आणि रुपयाने चंद्रास गिळून टाकलें आहे; त्यांचें 'निगरण' केलें आहे म्हणून ही निगरणातिशयोक्ति होय.

(२) "दोन मोत्यें गळालीं, सत्तावीस मोहोरा हरपल्या, खुर्दा किती गमावला याची तर गणतीच नाही."

वरील वाक्यांत पानिपतच्या तिसऱ्या लढाईत मराठी फौजेची किती हानि झाली याचें वर्णन एका लेखकाने केलें आहे. विश्वासराव व भाऊसाहेब हे पेशवे कुलांतील दोघे थोर वीर, सत्तावीस सरदार व इतर असंख्य सैनिक पानिपतच्या लढाईत ठार झाले असें लेखकास सांगायचें आहे. वरील उदाहरणांत प्रस्तुत गोष्टींचा त्यांच्या वाचक शब्दांनी उल्लेख केला नसून मोत्यें, मोहरा व खुर्दा या अप्रस्तुत गोष्टींनी (उपमानांनी) प्रस्तुत गोष्टी दर्शविल्या आहेत येथे उपमानांनी उपमेयाना गिळून टाकलें आहे. म्हणून ही निगरणात्मक अतिशयोक्ति होय.

( ३ ) जडली हिरकणी । सोन्याच्या ग कोंदणीं ।
मोला झाली दुणी । आई, तुझी ग करणी ।।
—भा. रा. तांबे ' माहेरची आठवण '

या ओवींत ' स्त्री ' हें उपमेय ' हिरकणी ' या उपमानाने गिळून टाकलें आहे. तसेंच ' सासर ' या उपमेयाचें 'सोन्याचें कोंदण' या उपमानानें निगरण केलें आहे. म्हणून हें रूपकातिशयोक्तीचें ऊर्फ निगरणातिशयोक्तीचें उदाहरण झालें.

( ४ ) हरिच्या पुन्हा पुन्हा कां काड्या नाकांत घालिसी ? शशका ! ।
यश काय पक्षपतिचें येइल हे चार करुनि तुज ? मशका ! ।।
—मोरोपंत, सभापर्व.

विदुराने दुर्योधनास उद्देशून केलेलें हें भाषण आहे. येथे धर्मराज या उपमेयाबद्दल ' हरि ' व ' पक्षपति ' ( गरुड ) हे शब्द योजले असून दुर्योधनाबद्दल ' शशक ' ( ससा ) व ' मशक ' ( चिलट ) हे शब्द घातले आहेत. या उपमानांवरून अनुक्त उपमेयांचा बोध होतो. म्हणून हेंहि ' रूपकातिशयोक्ति ' अलंकाराचें उदाहरण होय.

( ५ ) 'गोड निराशा' ही गोविंदाग्रजांची कविता म्हणजे रूपकातिशयोक्तीचें विस्तृत व सुंदर उदाहरण होय. त्या कवितेंत देहसौंदर्याचें वर्णन प्रस्तुत असतांना बगीच्याचें काव्यमय वर्णन केलें आहे. रसिकांनी ती समग्र कविता मुळांतूनच वाचून पाहावी.

( ६ ) ज्या तरुच्या आधारें जगोनि राहून जाय वर वेल,
तो पडलाच, तिच्याने जीव उभारी कुठोनि धरवेल.
— चंद्रशेखर, ' काय हो चमत्कार '

येथे शिवबा व जिऊ यांना अनुक्रमें तरु व वेल म्हटलें आहे. शिवबा व जिऊ यांचा प्रत्यक्ष उल्लेख केलेला नाही, म्हणजेच उपमानांनी त्यांना गिळून टाकलें आहे. म्हणून ' निगरणात्मक ' अतिशयोक्ति हा अलंकार येथे झाला.

(२) **भेदकातिशयोक्ति**:—वरील प्रकारांत उपमेयाचा धर्मोत्कर्ष त्याचें उपमानाशीं तादात्म्य दाखवून कवीने सांगितला. हाच धर्मोत्कर्ष जगांतील कोणत्याहि उपमानाहून उपमेय भिन्न—अगदी वेगळें आहे असें सांगूनहि दाखवितां येईल. उदा. " त्याची बोलण्याची पद्धत कांही वेगळीच आहे ! " " तिची सौंदर्यसंपदा कांही औरच आहे!" अशा प्रकारें प्रकृताचा दुसऱ्या कोणत्याहि वस्तूपासून भिन्नपणा कवि दाखवितो; तेव्हाहि प्रकृताच्या धर्माचा परमोत्कर्षच तो प्रतीत करून देतो. अशा प्रकारास भेदकातिशयोक्ति म्हणतात. उदा.—

( १ ) ' लता मंगेशकरच्या गळ्यांतील गोडी कांही औरच आहे. '

या वाक्यांत लता मंगेशकरच्या स्वरमाधुर्याचा परमोत्कर्ष व्यक्त केला आहे. तो व्यक्त करतांना " इतरांच्या पेक्षा तिच्या गळ्याचा गोडवा वेगळाच आहे " असें दर्शविलें आहे. म्हणून हें भेदकातिशयोक्ति अलंकाराचें उदाहरण होय.

( २ ) सौंदर्याची संपदा हे विभिन्ना
चातुर्याची पद्धती तीहि भिन्ना
लोकीं वाटे पद्मपत्रेक्षणा ही
स्रष्ट्याची की सृष्टि सामान्य नाही ।

—वासुदेवशास्त्री केमकर, ' अलंकारविकाश '

वरील उदाहरणांत सौंदर्याच्या व चातुर्याच्या बाबतींत ती स्त्री इतर स्त्रियांपेक्षा निराळीच आहे, म्हणजे तिचें अलौकिक सौंदर्य व चातुर्य इतरत्र न आढळणारें आहे, असें विधान असल्यामुळे ' भेदकातिशयोक्ति ' झाली.

**यद्यर्थातिशयोक्ति**:—यदि म्हणजे " जर " -- कवि एखाद्या उपमानांत जर विशिष्ट गोष्ट किंवा सुधारणा घडून आली तर तें उपमान उपमेयाची बरोबरी करूं शकेल, अशा प्रकारचें वर्णन करतो तेथे यद्यर्थातिशयोक्ति होते. येथे कवीने सुचविलेली अटहि असंभाव्य असते. म्हणून

उपमानांत तो बदल घडून येणेंहि शक्य नसतें, आणि त्यामुळे तें उपमेयाशीं बरोबरीहि करणार नाही असें कवि दाखवीत असतो; आणि हें दाखविण्यांत उपमेय धर्मांचा परमोत्कर्ष तो आपल्यावर बिंबवीत असतो.

उदा.—

(१) कीं पर्वतमस्तकींचें जळ। अधोपंथें धावे तुंबळ।
तें परतोनि पावे मूळ। तरी हें ऐसें घडों ये॥

—मुक्तेश्वर.

पर्वतावरून खाली वाहत आलेलें पाणी जर खालून पुन्हा पर्वत-मस्तकावर वाहत जाईल तर ही गोष्ट घडेल असें येथे म्हटलें आहे. अर्थात ही गोष्ट घडून येणें सर्वथैव अशक्य आहे असें दर्शविलें आहे. येथे यद्यर्थातिशयोक्ति अलंकार झाला.

(२) जरि चंद्रसहस्रातें निर्मळ आकाश एकदा धरिल।
तरि वृष्णि–सुर–वधू–मुख रम्य जलधिची बरोबरी करिल॥

—मोरोपंत, हरिवंश.

यादवभार्या समुद्रस्नान करीत असतांना त्यांच्या सुंदर मुखांमुळे समुद्रास अत्यंत शोभा प्राप्त झाली होती. आकाशांत एक सहस्र चंद्र एकदम विलसूं लागले तर आकाशाला त्या समुद्रासारखी शोभा प्राप्त होईल असें येथे म्हटलें आहे. एक सहस्र चंद्र एकदम झळकणें ही गोष्ट असंभाव्य असल्यामुळे समुद्राची ती शोभा दुसऱ्या कशाच्याहि तुलनेला येणार नाही असें सुचविलें आहे. येथेहि यद्यर्थातिशयोक्ति अलंकार झाला.

( ३ ) जरी नांगिया आपुलिया। विंचू करी गुदगुलिया।
तरी साचा बोली बोलिया। बोलती ते॥

—ज्ञानेश्वरी अ. १६.

अर्थः—जर विंचू आपली नांगी मारून लोकांस गुदगुल्या करूं शकेल तरच आसुरी संपत्तीच्या लोकांजवळ सत्य सापडेल !

वरील ओवींत जरी–तरी हे शब्द वापरून उक्त विषयांतील असंभाव्यता दर्शवून आसुरी संपत्तीच्या लोकांमधील असत्याचा परमोत्कर्ष वर्णिला आहे. हें यद्यर्थातिशयोक्ति अलंकराचें उदाहरण झालें.

यद्यर्थातिशयोक्तीचेहि दोन प्रकार होतात. ते असे ( १ ) संबंधातिशयोक्ति, आणि ( २ ) असंबंधातिशयोक्ति.

( ३ ) जेथे दोन वस्तूंमध्ये कोणताहि संबंध नसतो, पण कवि आपल्या प्रतिभेने तो संबंध निर्माण करतो तेथे **संबंधातिशयोक्ति** असते– येथेसुद्धा प्रकृताचा गुणोत्कर्षच दाखवावयाचा असतो.

उदा.––

( १ ) तूं येथे हें कुणा न ठावें, नाही तर भ्रमरांच्या
झुंडी येत्या धांवत कविच्या, स्वर्गांतुन रसिकांच्या !
सर्व अप्सरा ! किन्नर सारे धावुन येथे येते !
सख्या फुला ! तुजमुळे हाच रे दुसरा स्वर्ग करीते !

––रे. टिळक, वनवासी फूल.

फुलाच्या अस्तित्वाचा व स्वर्गांतील अप्सराकिन्नरादि मंडळी भूतलावर येण्याचा वस्तुतः संबंध नसूनहि कवीने तसा संबंध काव्यमयरीतीने वर्णिला आहे. म्हणून येते संबंधातिशयोक्ति समजावी.

( २ ) देखोनि रूपु सांवळें । वैराग्य कामकळां पाल्हैले ।
पुरुषा उपजेति डोहळे । कामिनीपणाचे ॥

––भास्करभट्ट, शिशुपालवध.

श्रीकृष्णाचें रूपसौंदर्य पाहून पुरुषांना स्त्रियांप्रमाणे डोहाळे लागले असें अतिशयोक्तिपूर्ण वर्णन यांत आलें आहे.

( ३ ) ‘ छविनें मालिना विधुला, द्युतिनेंहि त्यजुनि नीरसा रविला ’।
प्रेक्षक म्हणति “ स्वरसें हा द्युप्रिय कर्णवीर सारविला ॥ ”

––मोरोपंत, कर्णपर्व.

कर्णाच्या अलौकिक सौंदर्याचें व तेजस्वितेचें वर्णन करतांना कत्रीने वरील विचार व्यक्त केले आहेत.

‘ शोभेने ( सौंदर्याने ) कलंकित चंद्रास आणि तेजाने नीरस सूर्यास सोडून देऊन कर्णाचें शरीर विभूषित केलें !’ असे उद्गार प्रेक्षकांनी काढले. वास्तविक पाहतां चंद्राची शोभा आणि सूर्याची प्रभा कमी होणें या गोष्टीचा संबंध कर्णाची शोभा व प्रभा वाढविण्याशीं वस्तुतः मुळीच नाही. तथापि हा कविप्रतिभानिर्मित संबंध वरील आर्येत दिसून येतो.
म्हणून संबंधातियशोक्ति हा अलंकार येथे झाला.

( ४ ) खरा भिकारी, खराच वेडा, परंतु मोठा गुणी
कवी हा, हा जगताचा धनी.

—बालकवि.

कवीचा व जगताच्या धनीपणाचा वास्तविक संबंध नसूनहि तो वर्णिलेला आहे, म्हणून येथे संबंधातिशयोक्ति झाली.

( ४ ) जेथे दोहोंचा संबंध असूनहि तो संबंध नाही असें कवि दाखवितो तेथे **असंबंधातिशयोक्ति** असते.

उदा.—

( १ ) पीयूषकल्प अल्पचि भाषण देतें तुझें नृपा तोषा ।
अधरामृतपानेंही सुखलव देण्या न शक्त हे योषा ॥

—गोरे, अलंकारचंद्रिका.

सुख देण्यास योषा ( स्त्री ) समर्थ असतां ती सुखलव देण्यासहि समर्थ नाही असें वर्णन केल्यामुळे येथे असंबंधातिशयोक्ति झाली.

**विपर्ययातिशयोक्ति**—प्रथम कारण व नंतर कार्य हा सृष्टीचा नियम आहे. हा नियम सोडून कवि जेव्हा कार्यकारणांच्या क्रमांत सहेतुक बदल घडवून आणतो तेथे अतिशयोक्तीचा हा प्रकार होतो. यांतहि प्रकृत अर्थाचें ( कार्याचें ) गुणातिशयित्वच दाखवावयाचें असतें. हा क्रम दोन प्रकारें बदलवितां येतो. एकतर कार्य अगोदर व कारण नंतर असें दाखविणें, किंवा

कार्य आणि कारण बरोबरच घडलें असें दाखविणें. याला अनुसरून अतिशयोक्तीच्या या प्रकाराचेहि दोन भेद होतात. अत्यंतातिशयोक्ति; आणि अक्रमातिशयोक्ति.

(५) **अत्यंतातिशयोक्तिः**--जेथे कार्य अगोदर घडलेलें दाखवून कारण नंतर अस्तित्वांत आलें असें वर्णन असतें तेथे अत्यंतातिशयोक्ति हा प्रकार होतो.

उदा.--

( १ ) काव्य अगोदर झालें, नंतर जग झालें सुंदर,
रामायण आधी, मग झाला राम जानकीवर.

--बी.

येथे काव्याचा गुणप्रकर्ष वर्णन करण्याचा कवीचा हेतु आहे. वस्तुतः जगांतील सौंदर्य हें कारण असून काव्य हें त्याचें कार्य होय. अगोदर कारण घडणें व नंतर कार्य घडून येणें हा सृष्टिक्रम असतो. परंतु या क्रमास सोडून कवीने ' अगोदर कार्य, नंतर कारण ' असा उलटा क्रम वरील उदाहरणांत वर्णिला आहे. म्हणून अत्यंतातिशयोक्ति हा अलंकार झाला.

( २ ) काढी, जोडी, ओढी, सोडी शर कर्ण लाघवास्तव तें ।
न दिसे, दिसे शरासनमंडल हतशत्रुबलहि त्याभवतें ॥

--मोरोपंत, कर्णपर्व.

बाण सोडण्याची क्रिया कर्ण इतक्या चपलतेने करीत होता की शरासन व सभोवताली मृत होऊन पडलेले शत्रुसैनिक तेवढे डोळ्यांना दिसत होते. धनुष्य ओढणें, बाण सोडणें वगैरे क्रिया वास्तविक अगोदर दिसावयास पाहिजेत पण त्या दिसत नाहीत, त्यांचें कार्य तेवढें अगोदर दिसतें असें वर्णन असल्यामुळे अत्यंतातिशयोक्ति अलंकार झाला.

**अक्रमातिशयोक्ति**-- जेथे कार्य आणि कारण यांची बरोबरच उत्पत्ति झाली असें कवि सांगतो तेथे अक्रमातिशयोक्ति हा प्रकार होतो.

उदा.—

(१) तो वैद्य माझ्या शिरला गृहांत
तया क्षणीं विस्मयकारि मात
ही जाहली कीं गद नष्ट झाला
मी पावलें पूर्ण अनामयाला ॥

—वि. वा. भिड, अर्थालंकाराचें निरूपण.

वैद्यानें औषधोपचार केल्यानंतर कांही काळानें रोग्यास गुण यावा हें सृष्टिनियमास धरून होय परंतु वैद्याच्या औषधाचा गुणातिशय दाखविण्या-साठी येथें कारण व कार्य हीं दोन्ही एकदम घडल्याचें वर्णन आहे. वैद्य घरांत येणें व रोग दूर होणें या दोन्ही गोष्टी एकदमच घडून आल्या, असें दाखविल्यामुळे येथें ‘ अक्रमातिशयोक्ति ’ अलंकार झाला.

कांही आलंकारिकांनी ‘उल्लेख’ नांवाचा अलंकार मानला आहे. त्याचा अंतर्भावहि वस्तुतः अतिशयोक्तींतच होतो. उदा.—

मल्लां वज्र गमे, नरां नृप गमे, काम स्वयें स्त्रीजनां
गोपां आप्त, नृपां खळां प्रभु, शिशू मातापित्यांच्या मना ।
कंसा मृत्यु, अशक्त पामर जनां संतासि सत्त्वामृत
श्रीशेषासन यादवां हरि दिसे रंगांत रामान्वित ॥

—वामन.

येथे श्रीकृष्ण मल्लांना वज्र वाटला, स्त्रियांना काम दिसला वगैरे वर्णन आहे. हें रूपक मानावें की अतिशयोक्ति असा प्रश्न येतो. थोडा विचार केला तर असें दिसेल की येथे अध्यवसान आहे. प्रत्येकाला श्रीकृष्ण, श्रीकृष्ण न दिसतां तो वेगळा दिसला; म्हणून येथे अतिशयोक्ति आहे.

अशा प्रकारें अतिशयोक्तीच्या सर्वच प्रकारांत प्रकृत वस्तूचा गुणोत्कर्ष दाखविणें ही प्रधान गोष्ट दिसून येईल.

अतिशयोक्ति ही इतर अलंकारांहून कशी भिन्न आहे हें लक्षांत यावयास आता अडचण पडणार नाही. अतिशयोक्तीच्या पहिल्या ( निगरणातिशयोक्ती ) प्रकाराची रूपक आणि उत्प्रेक्षेशीं तुलना होऊं शकते.

**रूपक आणि अतिशयोक्ति**—रूपक आणि अतिशयोक्ति या दोहोंतहि आहार्य ज्ञान असतें, आणि दोन्हीहि अभेदप्रधान असून गौणी लक्षणेवर आधारले आहेत. पण रूपकांत गौणीसारोपा असते तर अतिशयोक्तींत गौणी साध्यवसाना असते हा भेद आहे. रूपकांत उपमानाचा उपमेयावर आरोप केलेला असतो तर अतिशयोक्तींत उपमेयच उपमानत्वाने प्रतीत होतें.

**अतिशयोक्ति आणि उत्प्रेक्षा**:—हे दोन्हीहि अलंकार अध्यवसायावर आधारलेले आहेत पण अतिशयोक्तींतील अध्यवसाय सिद्ध असतो तर उत्प्रेक्षेतील अध्यवसाय साध्य असतो. म्हणून अतिशयोक्तींत पूर्ण निश्चय असतो तर उत्प्रेक्षेत संभावना असते. दोन्हीहि अलंकारांतील अध्यवसाय मात्र आहार्यच असतो.

**अतिशयोक्ति आणि भ्रांतिमान्**—दोन्हीहि अलंकार सादृश्यमूलक अभेदप्रधान आहेत, आणि दोन्हीमध्ये उपमेयाची उपमेयत्वाने जाणीव न होतां उपमानत्वाने होते, पण भ्रांतिमानांतील ही जाणीव भ्रममूलक असते तर अतिशयोक्तींत ती आहार्यज्ञानावर आधारलेली असते.

तेव्हा अतिशयोक्तीचें स्वरूप थोडक्यांत असें देतां येईल—

१. अतिशयोक्ति म्हणजे उपमेयगत गुणोत्कर्षाची उक्ति.

२. ही वेगवेगळया प्रकारची असू शकते.

३. हे सर्व प्रकार आहार्यज्ञानावर आधारलेले असतात, वास्तव ज्ञानावर नव्हेत.

४. अतिशयोक्तीचा पहिला प्रकार निगरणातिशयोक्ति हा सादृश्यावर आधारलेला असून त्यांत गौणी साध्यवसाना लक्षणा असते. त्यांत उपमेयाचें उपमानाने निगरण केलेलें असतें.

५. भेदकातिशयोक्ति या दुसऱ्या प्रकारांत प्रकृत हें वेगळ्याच प्रकारचें आहे असें दाखविलेलें असतें.

६. यद्यर्थातिशयोक्ति या तिसऱ्या प्रकारांत उपमानांत सुधारणा हवी असें सांगून उपमेयाचा उत्कर्ष दाखविलेला असतो.

७. विपर्ययातिशयोक्ति या प्रकारांत कार्यकारण क्रमाचा सहेतुक विपर्यय केलेला असतो.

८. अतिशयोक्ति अलंकाराचें स्वरूप आपण पाहिलें. पण साहित्यशास्त्रांत अतिशयोक्ति हा शब्द यापेक्षाहि अधिक व्यापक अर्थाने वापरलेला सापडतो. सर्व अलंकारांच्या मूळाशीं अतिशयोक्तीच आहे. किंवा अतिशयोक्ति हाच काव्याचा एकमेव अलंकार होय. अशा वचनांत अतिशयोक्ति शब्द व्यापक अर्थाने वापरलेला असतो. तेथे अतिशयोक्ति याचा अर्थ लोकातिक्रांत गोचर उक्ति किंवा वक्रोक्ति ( लोक बोलतात त्याहून बोलण्याचा वेगळा प्रकार ) असा या शब्दाचा अर्थ होतो.

———

## अभ्यासिलेल्या अलंकारांचें सिंहावलोकन

आतापर्यंत आपण **सादृश्यमूल असे दहा अलंकार पाहिले.** दृश्याच्या बाबतींत व्यवहारांत आपल्याला जे निरनिराळे अनुभव येतात ांचाच उपयोग कवि रमणीयता निर्माण करण्याकडे करतो असें यावरून ध्ांत येईल. कोणत्याहि दोन सदृश वस्तु पाहत असतां व्यवहारांत आपाला साधारणपणें पुढील अनुभव येतात. (१) आपल्याला एखाद्या गोष्टी‌ल खात्री वाटते; (२) संशय येतो; किंवा (३) भ्रम होतो. उपमा, रूपक अतिशयोक्ति यांत खात्री आहे. मुख चंद्रासारखें आहे ( उपमा ); मुख हें द्रच आहे ( रूपक ); आणि हा चंद्र ( अतिशयोक्ति ) यांत मुख व चंद्र च्यांतील साधर्म्याबद्दल आपल्याला खात्री आहे. यांत संशय नाही किंवा

भ्रमहि नाही. शिवाय या तीन अलंकारांत सादृश्यप्रतीतीचा क्रम चढता आहे. उपमेंत साम्य, रूपकांत अति साम्य, तर अतिशयोक्तींत तादात्म्य आहे. ससंदेह आणि उत्प्रेक्षा यांत संशय आहे. हा चंद्र असावा की मुख असावें (ससंदेह) यांतील संशय दोन्हीहि बाबतींत सारखा आहे, तर मला वाटतें हा चंद्रच आहे (उत्प्रेक्षा) यांत संशय चंद्राच्या बाजूला झुकला आहे. पण शिंपल्यावर रुप्याचा भास व्हावा त्याप्रमाणे जेव्हा मुखाच्या ठिकाणी चंद्राचा भास होतो तेव्हा तो भ्रांतिमान् होय.

सादृश्यप्रतीतीच्या बाबतींत पुढील अलकारांत एक प्रकारें चढता क्रम आहे. (१) उपमेमध्ये दोन भिन्न वस्तूंतील सारखेपणा प्रत्ययास येतो. पण या दोन वस्तु एकच असाव्यात असें कधीच वाटत नाही. (२) पण ससंदेहांत या सादृश्यामुळेच ही वस्तु असावी की ती, अशा संशयांत माणूस पडतो. (३) उत्प्रेक्षेमध्ये हा संशय उपमानाकडे झुकलेला असतो; तर (४) रूपकांत हें सादृश्य वरच्या कोटीला जाऊन उपमानोपमेयांत अभेद दिसावयास लागतो. (५) अतिशयोक्तीमध्ये उपमेयाचें उपमानाशीं तादात्म्यच होतें, तर (६) भ्रातिमानांत भ्रांति झाल्याने मनुष्य सुखद संभ्रमांत पडून प्रत्यक्ष क्रिया करावयास प्रवृत्त होतो.

### उत्प्रेक्षा व अतिशयोक्ति यांचीं अभ्यासार्थ उदाहरणें—

(१) कदा नेणो ओढी शरधिंतुनि काढी शर कदा ।
कदा धन्वी जोडी वरिवरिहि सोडी तरि कदा ।
विपक्षाच्या वक्षावरि विवरलक्षास्तव रणीं ।
कळे राजेन्द्राची त्वरित शरसंधान करणी ।

अत्यंत

—रघुनाथ पंडित.

(२) जो अंबरीं उफळतां खुर लागताहे ।
तो चंद्रमा निजतनूवरि डाग लाहे ।
जो या यशास्तव कसें धवलत्व ने घे ।
शृंगारिला हय तयावरि भूप वेंघे ॥

हेतूत्प्रेक्षा

—रघुनाथ पंडित.

(३) ही आम्र–पंक्ति पवनें बहु डोलताहे ।
शाखाग्र–पल्लव–करें कुसुमांस बाहे ॥
जाणो स्व–पोषक वसंत गृहास आला ।
तत्पूजनार्थ बहु हर्षेचि हीस झाला ॥
——कृष्णशास्त्री राजवाडे

( ४ ) रविमंडळा भवनीं जरी । तारांगणांची ओवनी दीसे ती ।
तरि एकावळी पपमीजेती । कौस्तुभा जवळीं ॥
——भास्करभट्ट, शिशुपालवध.

( ५ ) हंसें मुक्ता नेली मग केला कलकलाट काकांनी ।
हाकांनी नभ भरलें जाय सुरांच्या निनाद हा कानीं ॥
——मोरोपंत ' कृष्णविजय. '

( ६ ) फोडोनि रावणाचें वक्षस्थल राम–बाण भूमींत ।
घुसला, सांगाया जणुं ती प्रिय वार्ता भुजंगलोकांत ॥
——मोरोपंत.

( ७ ) येथे एक असे सुवर्णलतिका जी चालते बोलते,
आलें पद्म तिच्यावरी अतिशयें जें कांतिनें शोभतें ॥
त्या पद्मींच विराजतीं कुवलयें हीं दोन कैसीं पहा ।
ऐसी अद्‌भुत सृष्टि देखुनि मला आश्चर्य वाटे महा ॥
——गणेशशास्त्री लेले.

( ८ ) शोभविती हे गगना तारे कल्पतरूचीं जणू फुलें ।
——रेंदाळकर.

( ९ ) जीचें भाषण, मंजु गुंजन जणूं कुंजीं करी कोयळ,
जीचें भावविशिष्ट अन्तर, जणूं ओथंबलें मोहळ;
ज्वानीचेच कळे उसासुन जिची यष्टी न ती वाकते,
बुद्धि–स्त्रीत्व–पणामधे बहरुनी प्रीतिप्रभा फांकते ॥
——माधव जूलियन, ' विरहतरंग '

(१०) पिकलीं पानें जणूं आसवें हा खाली गाळितो,
समाधिस्त सुहृदास कहाणी गहिवरुनी सांगतो,
—ग. ह. पाटील, ' वटराज '

(११) होता वेष विचित्र, नांवहि भुत्या, मूर्ती असे सावळी ।
तेव्हा रात्रहि कृष्ण, साच गमलें ही मृत्युची सावली ।
—ग. ह. पाटील, ' तुळजापूरचा भुत्या '

(१२) आज पहाटे अवचित सखि तो आला माझ्या घरीं
शिरला सदनीं भृंग जणूं की कमलदलांभीतरीं ॥
—शान्ताबाई शेळके, ' पहाटेचें स्वप्न '

(१३) हजार जिव्हा तुझ्या गर्जु दे प्रतिध्वनीने त्या
समुद्रा, डळमळुं दे तारे ।
— कुसुमाग्रज, ' कोलंबसाचें गर्वगीत '

( १४ ) कोण एक वनीं विचित्र पुतळा जेवावया बैसला
पात्रीं जेवण जेवितां अतिबळें पात्रेंचि तो भक्षिला
त्याची ती वनिता वनांत फिरतां सूर्यास प्रार्थी तदा
बोले विठ्ठल हा पदार्थ उमगा षण्मासिंचा वायदा ॥

## ( ११ ) तुल्ययोगिता

यापुढील सादृश्यमूल अलंकार व्यंग्यसाधर्म्यावर आधारले आहेत. उपमा, उपमेयोपमा, अनन्वय आणि स्मरण हे भेदप्रधान अलंकार आहेत. तसेंच पुढील अलंकारहि भेदप्रधानच आहेत. पण उपमादिकांतील औपम्य वाच्य असतें तर यापुढे येणाऱ्या अलंकारांतील औपम्य व्यंग्य असतें. ' उत्तरायण लागल्यावर दिवस आणि कमलें वृद्धि पावावयास लागलीं. ' ' प्रियकराचें बोलणें ऐकून मानिनीच्या मनांतील मान व डोळ्यांतील अश्रुधारा बाहेर पडूं लागल्या. ' या दोन्ही उदाहरणांत प्रत्यक्ष तुलना नाहीं.

दोन वेगवेगळ्या गोष्टी एका धर्माच्या निमित्ताने एकत्र आणल्या आहेत, एवढेंच. त्यांना एकत्र आगण्याच्या क्रियेमध्ये त्याच्या मधील औपम्य व्यक्त किंवा सूचित झालें आहे.

हें औपम्य अनेक प्रकारें व्यक्त होऊं शकेल. त्यापैकी पदार्थांच्या द्वारें औपम्य व्यक्त करणारे तुल्ययोगिता आणि दीपक हे दोन अलंकार आहेत. त्यांचा आपण आता विचार करूं.

'मधुर गमती अतिशायित मानसास ।
तिचीं वचनें गति तेवि ते विलास ॥'

येथे वचनें, गति आणि विलास यांचा माधुर्य हा धर्म एकदाच सांगितला असून कवीला वचन, गति आणि विलास या तिघांचेंहि वर्णन सारखेंच अभिप्रेत आहे. " तुझ्या नेत्रांसमोर कुमुदें, कमलें आणि कुवलयें यांची काय किंमत ! " यांत हलकेपणा हा धर्म कुमुदें, कमलें आणि कुवलयें यांच्या बाबतींत एकदाच सांगितला असून तीं सर्व अप्रकृत आहेत. कारण कवीला रमणीच्या नेत्रांचें वर्णन करावयाचें असल्याने नेत्र प्रकृत आहेत. सारांश प्रकृत वस्तु किंवा अप्रकृत वस्तु यांचा एका धर्माशीं सारखाच संबंध एकदाच असणें ही यांत सामान्य गोष्ट आहे. **अनेक गोष्टींचा एक धर्माशीं सारखा संबंध येणें याला 'तुल्ययोग' असें नांव आहे.** असा हा तुल्ययोग जेथे दिसून येतो तेथे तुल्ययोगिता हा अलंकार होतो.

तुल्ययोगितेमध्ये एकाच धर्माशीं ज्या अनेक गोष्टींचा तुल्ययोग असतो त्या सर्व गोष्टी प्रकृत असतील किंवा अप्रकृत असतील. म्हणून तुल्ययोगितेचे दोन प्रकार होतील. पहिला प्रकार म्हणजे जेथे फक्त प्रकृतांचाच सामान्यधर्म एकदाच सांगण्यांत आला आहे, आणि दुसरा प्रकार म्हणजे फक्त अप्रकृतांचाच सामान्यधर्म एकदा सांगण्यांत आला आहे. याशिवाय तिसराहि एक प्रकार होऊं शकतो. तो म्हणजे जेथे प्रकृत आणि अप्रकृत यांचा धर्म एकदाच सांगितला आहे असा प्रकार. उदा. 'अमृत,

चंद्रिका आणि रम्य कविता यांची निर्मिति कोणाला सुखकारक होणार नाही ?' येथे कविता हें प्रकृत असून अमृत व चंद्रिका अप्रकृत आहेत; आणि त्यांची निर्मिति सुखकारक होणें हा प्रकृताप्रकृतांचा धर्म एकदाच सांगितला आहे. तेव्हा तुल्ययोगितेचा हा तिसरा प्रकारहि संभवतो. **पण तुल्ययोगितेचा हा प्रकार दीपक अलंकार म्हणून वेगळा अलंकार** मानला गेला. तुल्ययोगितेचें वर्गीकरण असें दाखवितां येईल—

तुल्ययोगिता




तेव्हा तुल्ययोगितेला आवश्यक गोष्टी अशा—

(१) तुल्ययोगितेंत अनेक पदार्थांचा एक धर्म सांगितलेला असतो.

(२) हा धर्म एकदाच सांगितलेला असतो.

(३) हा धर्म एकाच वाक्यांत सांगितलेला असतो.

(४) ज्या पदार्थांचा धर्म सांगितला आहे ते सर्व एकतर प्रकृत असतात किंवा अप्रकृत असतात.

(५) जेव्हा प्रकृतांचाच धर्म सांगितलेला असतो तेव्हा तो धर्म वास्तव असतो.

(६) जेव्हा अप्रकृतांचा धर्म सांगितलेला असतो तेव्हा तो वास्तव असेलच असें नाही. शिवाय हीं अप्रकृतें म्हणजे ओळीने आलेलीं उपमानेंच असतात.

(७) यांतील औपम्य व्यंग्य असतें.

म्हणून तुल्ययोगितेची व्याख्या अशी—

**जेव्हा फक्त प्रकृतांचाच किंवा केवळ अप्रकृतांचाच साधारण धर्म केवळ एकदाच सांगितलेला असतो तेव्हा तुल्ययोगिता अलंकार होतो.**

उदाहरणें—

( १ ) सुभाषितें, संगीत व युवतींच्या लीला यांनी ज्याचें मन मोहून जात नाही तो एकतर मुक्त असला पाहिजे किंवा पशु तरी असला पाहिजे.

वरील वाक्यांत तीन प्रकृतांचा ' मोहून टाकण्याचा ' क्रियारूप धर्म एकदाच सांगितला आहे. म्हणून येथे तुल्ययोगितेचा पहिला प्रकार झाला.

( २ ) मग जिष्णु उत्तरेला जिंकाया, भीम वासवाशेला ।
सहदेव दक्षिणेला, वरुणदिशेलाहि नकुळ तो गेला ॥

—मोरोपंत, सभापर्व.

येथे अर्जुन, भीम, सहदेव व नकुल या चार प्रकृतांचा क्रियारूप सामान्य धर्म ' गेला ' या शब्दानें एकदाच सांगितला आहे. म्हणून तुल्ययोगितेचा हा पहिला प्रकार होय.

( ३ ) बव्हर्थ, श्रुतिमनोहर, स्वल्पाक्षर, मधुर सत्य बोलावें ।
ज्या सद्वाक्यश्रवणें श्रोत्यांचें चित्त, शिरहि डोलावें ॥

—मोरोपंत.

वरील आर्येत चित्त व शिर या दोन प्रकृतांचा ' डोलणें ' हा क्रियारूप धर्म एकदाच सांगितला आहे.

( ४ ) जागोजाग विराजती चलजलें पाटस्थलें तीं किती ॥
केळी, नारळि, पोफळी, फणस ते, आंबे तिथे शोभती ॥

—केशवसुत ' नैर्ऋत्येकडला वारा '

येथे केळी, नारळी वगैरे अनेक प्रकृतांचा शोभण्याचा साधारणधर्म एकदाच सांगितला आहे. म्हणून येथेहि तुल्ययोगितेचा पहिला प्रकार आहे.

(१) तुझ्या विलासयुक्त नेत्रांसमोर कुमुदें, कमलें व कुवलयें यांची काय मातब्बरी ? आणि तुझ्या मुखाशीं तुलना करतां अमृत आणि चंद्र यांचा काय टिकाव लागणार ?

वरील उदाहरणांतील पहिल्या वाक्यांत 'नेत्र' प्रस्तुत असून कुमुदें, कमलें व कुवलयें या अप्रस्तुत वस्तूंच्या गुणांचा अपकर्ष एकदाच सांगितला आहे. तसेंच दुसऱ्या वाक्यांत 'मुख' प्रस्तुत असून अमृत आणि चंद्र या अप्रस्तुतांचा क्षुद्रपणाचा धर्म एकदाच सांगितला आहे. म्हणून येथेंहि तुल्ययोगितेचा दुसरा प्रकार झाला.

(२) ऐसा श्रीमद्गुरुने केला आम्हांवरी प्रसाद बुधा ।
तन्मधुरता न जननी–स्तन्यास न कामधेनुच्याहि दुधा ॥
—मोरोपंत, कृष्णविजय.

गुरुप्रसादाचें वर्णन हें येथे प्रस्तुत आहे. मातेचें दूध व कामधेनूचें दूध ह्या दोन अप्रस्तुत वस्तूंचा मधुरतेच्या सामान्य गुणाचा उल्लेख एकदाच केलेला आहे म्हणून तुल्ययोगितेचा हा दुसरा प्रकार झाला.

(३) मोकलती निर्द्रव्या वेश्या अफल–द्रुमासि ही पक्षी ।
अबला नृपा प्रजा–सी मृगकुळ दग्धा वनाहि जें रक्षी ॥
—मोरोपंत, मंत्ररामायण.

येथे कृष्णप्रेमाचें वर्णन प्रस्तुत आहे. पक्षी, प्रजा व मृगकुळ या अप्रस्तुत गोष्टींचा क्रियारूप धर्म 'मोकलणें' या शब्दाने एकदाच सांगितला आहे.

## (१२) दीपक

दीपकाच्या सामान्य स्वरूपाचा निर्देश तुल्ययोगितेच्या विवेचनांत येऊन गेलाच आहे. जेथे प्रकृताचा आणि अप्रकृताचा सामान्य धर्म हा एकदाच सांगितलेला असतो तेथे दीपक अलंकार होतो. "सिंहाचें आयाळ,

नागफणावरील रत्न, आणि कुलीन स्त्रीचें शरीर, यांना ते जिवंत आहेत तोवर कोण स्पर्श करूं शकेल?" येथे कुलीन स्त्रीचें शरीर कोणी विटाळूं शकत नाही हें कवीला मुख्यतः सांगावयाचें आहे. पण हें सांगत असतां सिंह आणि नाग यांचीहि तो उदाहरणें घेतो व त्या तिघांचाहि सामान्य धर्म एकदाच सांगतो. हा दीपक अलंकार होय. हा अलंकार 'देहली दीपक न्यायावर' बसविला आहे. उंबरठ्यावर ठेवलेला दिवा घरालाहि प्रकाशित करतो आणि रस्त्यालाहि प्रकाशित करतो, पण दिवा ठेवणाऱ्याचा मुख्य हेतु घर प्रकाशित करण्याचा असतो, रस्ता केवळ अनुषंगाने प्रकाशित होतो तसेंच येथे आहे. प्रकृताचा धर्म सांगणें हें कवीला अभिप्रेत असते; पण एकदा सांगितलेला तोच धर्म अप्रकृतांनाहि अनुषंगाने लागू पडतो. म्हणून याला 'दीपक'--दिव्याप्रमाणे असणारा असें नांव दिलें गेलें आहे.

प्रकृताप्रकृतांचा हा धर्म गुणरूप किंवा क्रियारूप असूं शकेल. पण या दोहोंत कोणता तरी एकच धर्म सांगितला जातो म्हणून याला **धर्मदीपक** किंवा क्रियादीपक असें म्हणतात.

धर्मदीपकामध्ये अनेक कर्ते एका क्रियेशीं संबद्ध होतात. पण पुढील प्रकार पाहा. दमयंतीचें वर्णन करतांना पंत म्हणतात--

'पायीं भ्रमली, भमली, निजली, भिजली निजाश्रु-नीरांनी'

दमयंतीने कोणकोणत्या क्रिया केल्या हें कवीने एकदम सांगून टाकलें आहे. येथे अनेक क्रियांचा दमयंती या एकाच कर्त्याशीं संबंध आहे. अशा प्रकारें येथे अनेक क्रियांचा एकाच कर्त्याशीं एकदाच संबंध दाखविला जातो तेव्हा दीपकाचा दुसरा प्रकार होतो. त्याला **कारकदीपक** म्हणतात.

येथे एक गोष्ट जरूर लक्षांत ठेवली पाहिजे. धर्मदीपकांत प्रकृताप्रकृतांचा धर्म एकदाच सांगितलेला असतो. त्यांत औपम्य व्यंग्य असतें. कारकदीपकांत असें औपम्य नसतें. अनेक क्रियांचा एकच कर्ता एकदाच निर्दिष्ट होणें एवढी एकच गोष्ट धर्मदीपकाशीं समान आहे. औपम्य व्यक्त

करण्याचा त्यांत कोणताहि हेतु नाही. ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे कारक-दीपक व धर्मदीपक यांचें साम्य केवळ वरवरचें आहे; आंतरिक नाही हें दिसून येईल.

दीपकाचे प्रकार असे दाखवितां येतील—




म्हणून दीपकांतील आवश्यक गोष्टी अशा—

१. दीपकांत अनेक वस्तूंचा एकाच धर्माशीं संबंध असतो.

२. त्यांपैकी एक प्रकृत व इतर अप्रकृत असतात.

३. धर्म हा एकदाच सांगितलेला असतो व तो गुण किंवा क्रिया-रूप असतो.

४. प्रकृताप्रकृतांचा हा धर्म एकदाच व एकाच वाक्यांत सांगितलेला असतो.

५. दीपकामध्ये गम्य औपम्य असतें म्हणजे सादृश्य व्यंग्य असतें.

६. कारकदीपकांत अनेक क्रिया एकाच कर्त्याशीं ( कारकाशीं ) संबंधित असतात.

७. कारकदीपकांत धर्मनिर्देश नसतो.

८. दीपक हा तुल्ययोगितेचाच एक प्रकार आहे. फरक एवढाच की तुल्ययोगितेंत केवळ प्रकृतांचाच किंवा केवळ अप्रकृतांचाच धर्म एकदा

सांगितला असतो तर दीपकांत प्रकृताप्रकृतांचा धर्म एकदा सांगितलेला असतो. म्हणून दीपकाची व्याख्या अशी—

**(१) जेव्हा प्रकृत आणि अप्रकृत यांचा साधारण धर्म एकदाच सांगितला असतो; किंवा (२) जेथे अनेक क्रियांचा एकाच कारकाशीं ( कर्त्याशीं ) संबंध असतो तेव्हा दीपक अलंकार होतो.**

[ दीपकाचा मालादीपक म्हणून एक प्रकार आहे. त्याचें वेगळा अलंकार म्हणून पुढे विवेचन केलें आहे. ]

**क्रियादीपकाचीं उदाहरणें—**

(१) शीलवती स्त्री, अर्थवती वाणी व पुष्पवती लता क्वचितच आढळतात.

वरील वाक्यांत स्त्रीच्या शीलाचें वर्णन प्रस्तुत होय. स्त्री-शीलाच्या दुर्मिळतेचा निर्देश, तसेंच अर्थवती वाणी व पुष्पवती लता या दोन अप्रस्तुत वस्तूंच्या दुर्मिळतेच्या गुणधर्माचा उल्लेख 'क्वचितच आढळतात' या शब्दांनी एकदाच केला आहे. म्हणून येथे 'धर्मदीपक' हा अलंकार झाला.

(२) तळीराम उदात्त प्रेमाची थट्टा करतांना म्हणतो—

" प्रेम हें हास्यास्पद नाही वाटतं ? अहो, काव्यांत कमल, नाटकांत सूड, कादंबरींत भुयार, मासिक पुस्तकांत खास अंक, वर्तमानपत्रांत खास बातमीदार, संसारांत प्रेम, औद्योगिक चळवळींत सहकारिता, सुधारणेंत व देशभक्तींत स्वार्थत्याग आणि वेदान्तांत परब्रह्म यांचा धुमाकूळ माजला नसता, तर त्या त्या गोष्टीची थट्टा करायला जागाच उरली नसती. "

—गडकरी, एकच प्याला. अं. १ प्र. १.

वरील वाक्यांत तळीराम प्रेमाची हास्यास्पदता वर्णन करतो. हें वर्णन प्रस्तुत आहे. त्याच बरोबर तो इतर अप्रस्तुत गोष्टींतील हास्यास्पदता

दाखवतो. अशा प्रकारें प्रकृत व अप्रकृतांचा हास्यास्पदता हा धर्म या वाक्यांत एकदाच सांगितल्याने दीपक अलंकार झाला.

(३) शक्र म्हणे वदलासि प्रथम तसें वचन, मग असें वदसी ।
अचल करींच असावा व्यवहारीं शब्द, संगरीं सदसि ॥
—मोरोपंत, वनपर्व.

येथे 'शब्द' हें प्रकृत व 'असि' अप्रकृत असून उभयतांचा अचलत्वाचा गुण एकदाच सांगितला आहे. म्हणून येथेहि गुणधर्मदीपक अलंकार झाला.

**क्रियादीपक:—**

दुर्मंत्रें नृप, संगतीस्तव यती, कीं पुत्रही लालनें ।
वेदानध्ययनें द्विजाति, कुल दुष्पुत्रें, खलाराधनें ।
नासे शील, न पाहतां कृषि, मदें मा, लाज मद्यें फुका, ।
शाठ्यें मित्रपणा, प्रवासगमने स्नेह, प्रमादें रुका ॥—वामन.

येथे प्रारंभीं एकच प्रकृत असून नंतर अनेक अप्रकृतांचा 'नासणें' हा क्रियारूप धर्म एकदाच सांगितला आहे. म्हणून येथे 'क्रियादीपक' हा प्रकार झाला.

**कारकदीपकाचीं उदाहरणें:—**

(१) 'विज्ञान पर्वतावरतीं
कवि चढती, रमती, गाती; '
—रे. टिळकांची कविता, प्रस्तावना.

यांत 'कवि' या एकाच कारकाशीं ( कर्त्याशी ) तीन वेगवेगळ्या क्रियांचा संबंध वर्णिला आहे. म्हणून हें कारकदीपकाचें उदाहरण होय.

(२) मला निरखितां भवच्चरण कन्यका आपगा ।
म्हणे 'अगइ ! ऐकलेंहि न कधी असें पाप !' गा ॥
कर श्रवणिं ठेविते, नुघडि नेत्र, घे भीतिला, ।
न घालिन भिडेस मी जरिहि कार्यलोभी तिला ॥
—मोरोपंत, केकावली.

यांत तृतीय चरणांतील तीन भिन्न क्रियांशीं गंगानदी या एकाच कर्त्याचा संबंध जोडलेला आहे. हेंहि कारकदीपकाचें उदाहरण होय.

(३) दुर्योधनेंहि तेव्हा केलें निःसीम युद्ध परि सेना ।
रक्तें न्हाली, भ्याली, झाली विन्मुख, प्रभूक्त परिसेना ॥
—मोरोपंत, कर्णपर्व.

या आर्येत 'सेना' या कारकाशीं (कर्त्याशीं) न्हाली, भ्याली वगैरे अनेक क्रियांचा संबंध जोडलेला आहे.

(४) पौरवधू आणविल्या न्हाणविल्या गौरवोनि लेवविल्या ।
देवविल्या सदलंकृति सूर्यास्तावधि समस्त जेवविल्या ॥
—मोरोपंत, आदिपर्व.

या आर्येत 'पौरवधू' या एकाच कर्त्याचा अनेक क्रियांशीं संबंध दर्शविला आहे.

(५) शल्य सुयोधन वाक्यें कोपे, चोळी करें करां, डोळे ।
आरक्त वरी, चावे अधरातें, फार तो मनीं पोळे ॥

दुर्योधनाचें बोलणें ऐकतांच शल्याला कोप आला त्या वेळीं त्याच्या ज्या अनेक क्रिया घडल्या त्या येथे आहेत. अनेक क्रियांशीं एकाच कर्त्याचा येथे संबंध आहे म्हणून कारकदीपक अलंकार झाला.

## ( १३ ) प्रतिवस्तूपमा

"ज्याप्रमाणे मकरंदयुक्त कमल सापडल्यावर भ्रमर दुसरीकडे जात नाही, त्याप्रमाणेच तुझ्या चरणाशीं लीन झालेला भक्त दुसरीकडे जात नाही." ही उपमा आहे. यांतील उपमावाचकें (ज्याप्रमाणे–त्याप्रमाणे) काढून टाकलीं तरी यांतील औपम्य कायमच राहतें. येथे एका पदार्थाची दुसऱ्या पदार्थाशीं तुलना नाही. एका वाक्यार्थाशीं दुसऱ्या वाक्यार्थाची तुलना आहे. एका प्रकारें ही वाक्यार्थोपमा आहे. पण ही वाक्यार्थोपमा आता उपमेचा एक

प्रकार राहिला नसून तिला आता प्रतिवस्तूपमा, दृष्टांत किंवा अर्थांतरन्यास असें वेगळ्या अलंकारांचें स्वरूप प्राप्त झालें आहे.

वाक्यार्थ म्हणजे वस्तु. वरील उदाहरणांत दोन वाक्यार्थ म्हणजे दोन वस्तु आहेत व त्यांपैकी एक प्रकृत म्हणजे उपमेय वस्तु असून दुसरी अप्रकृत म्हणजे उपमान वस्तु आहे. त्यांच्या मधील साधर्म्य "दुसरीकडे न जाणें" हें आहे. वरच्या उदाहरणांत हा साधारण धर्म दोन्हीहि ठिकाणी त्याच शब्दांनी सांगितला आहे. पण तोच अर्थ वेगळ्या शब्दांत सांगितला. उदा. "तुझ्या चरणीं लीन झालेला भक्त दुसरी कशाची इच्छा करील! भ्रमराला मकरंदयुक्त कमल सापडलें तर तो दुसरें काहीहि शोधणार नाही." येथे "कशाचीहि इच्छा न करणें" व "दुसरें कांहीहि न शोधणें" या भिन्न शब्दांनी एकच धर्म सांगितला आहे. **अशा प्रकारें दोन भिन्न वाक्यांत एकच साधारण धर्म वेगवेगळ्या शब्दांनी सांगितला म्हणजे 'वस्तु-प्रतिवस्तु-भाव' होतो,** व असा वस्तु प्रतिवस्तु भाव जेथे असतो तेथे प्रतिवस्तूपमा होते. वस्तु म्हणजे वाक्यार्थ, उपमा म्हणजे समानधर्म असणें—प्रतिवस्तूपमा म्हणजे दोन वाक्यार्थांत एकच सामान्य धर्म भिन्न शब्दांत दिसणें. प्रतिवस्तूपमेमध्ये वाक्यार्थगत सादृश्य असून तें गम्य असतें. प्रतिवस्तूपमेला आवश्यक गोष्टी अशा —

१. प्रतिवस्तूपमेंत कमीत कमी दोन वाक्यें परस्परांपासून स्वतंत्र अशीं असतात.
२. प्रत्येक वाक्यांत साधारण धर्म निर्देशित असतो.
३. मात्र तो साधारण धर्म प्रत्येक वाक्यांत वेगळ्या शब्दांनी निर्देशित केला असतो. म्हणजेच त्यांच्यांत वस्तुप्रतिवस्तु भाव असतो.
४. एक वाक्यार्थ प्रकृत व दुसरा वाक्यार्थ अप्रकृत असतो.
५. उपमा प्रतिपादक नसते. सादृश्य हें गर्भित असतें. म्हणून प्रतिवस्तूपमेची व्याख्या अशी होईल—

**उपमेयवाक्य आणि उपमानवाक्य यांच्यामध्ये एकच सामान्य धर्म असून तो भिन्न शब्दांनी सांगितलेला असतो तेव्हा प्रतिवस्तूपमा अलंकार होतो.**

## प्रतिवस्तूपमेचे प्रकार

साधारण धर्म ज्या तऱ्हेने मांडला जातो त्या तऱ्हेवरून प्रतिवस्तूपमेचे प्रकार होतात. हे प्रकार दोन आहेत. विधिरूप आणि निषेधरूप ' मनुष्य संगविशेषानेच पूज्य होतो ' हें विधिपरू वाक्य होय. ' संगतीशिवाय मनुष्य महत्पदास चढत नाही ' हें निषेधरूप वाक्य होय. दोहोंचा अर्थ एकच आहे. प्रतिवस्तूपमेंतील साधारण धर्म दोन्हीहि वाक्यांत विधिरूप असेल किंवा दोन्हीहि वाक्यांत निषेधरूप असेल, तो कोणताहि असला तरी त्यांच्यांत सारखेपणा म्हणजे साधर्म्य असतें. पण एका वाक्यांत तो विधिरूप आणि दुसऱ्या वाक्यांत निषेधरूप असला तर तेथे वैधर्म्य असतें. याला अनुसरून साधर्म्य प्रतिवस्तूपमा, व वैधर्म्य प्रतिवस्तूपमा असे दोन भेद होतात.

## साधर्म्यप्रतिवस्तूपमेचीं उदाहरणें--

(१) " एकदा जिला पट्टराणी म्हणून अभिषेक केला, ती आता भोगदासी कशी होऊं शकेल? पूजेंत ठेवलेली मुद्रिका अलंकार म्हणून वापरतां येणार नाही. "

वरील दोन वाक्यांपैकी पहिलें उपमेयवस्तु व दुसरें उपमानवस्तु होय. ' अशक्यता ' हा त्यांतील सामान्य धर्म असून तो एकदा ' कशी होऊं शकेल ' व पुनः " येणार नाही " असा भिन्न शब्दांनी सांगितला आहे. म्हणजेच त्या दोहोंत वस्तु–प्रतिवस्तुभाव आहे. म्हणून येथे प्रतिवस्तूपमा अलंकार झाला.

(२) कर्ण म्हणे, ' गुणवद्‌गुण जाणे गुणवंत, अगुण नेणेची ।
प्रसवे तीच अभिज्ञा शल्या ! तैसी न वांझ वेणेची ॥ '

—मोरोपंत, कर्णपर्व.

वरील आर्येतील पहिल्या ओळींत ' गुणी माणूस गुणवानांचे गुण जाणतो, गुणरहित माणूस मात्र ते जाणत नाही ' असें म्हटलें आहे. ही उपमेयवस्तु आहे. दुसऱ्या चरणांतील " जी स्त्री प्रसवते तीच प्रसववेदना जाणते, वंध्येस प्रसूतिवेदना समजत नाहीत " ही उक्ति उपमानवस्तु आहे. त्या दोहोंमध्ये ' जाणीव असणें ' सामान्य धर्म असून तो भिन्न शब्दांत व्यक्त केलेला आहे. म्हणून हें प्रतिवस्तूपमेचें उदाहरण होय.

**वैधर्म्यप्रतिवस्तूपमेचीं उदाहरणें—**

( १ ) " संकटांस तोंड दिल्यानेच यशप्राप्ती होत असते. समुद्रांत बुड्या मारल्यावाचून मौक्तिकें हातीं लागत नाहीत. "

या दोन वाक्यापैकी पहिलें वाक्य हें उपमेयवाक्य असून तें विधिरूप आहे. दुसरें वाक्य हें उपमानवाक्य असून तें मात्र विधिरूप नसून निषेधरूप आहे. त्या दोन्ही वाक्यातून साधारण धर्म व्यक्त होतो म्हणून येथे प्रतिवस्तूपमा वैधर्म्यानें सिद्ध झाली.

( २ ) पुरुषीं गुण जरि असती प्रसिद्धि त्यांची तरी अपाप घडे ।
कस्तूरीचा परिमळ कळवाया शपथ वाहणें न पडे ॥

—मोरोपंत.

येथे उपमेयवाक्य विधिरूप असून उपमानवाक्य निषेधरूप आहे. (याच्या उलटहि प्रकार असूं शकतो.) दोन्ही वाक्यांत सादृश्य आहे, परंतु उपमेयवाक्यांत ' प्रसिद्धी घडे ' या शब्दांत तें व्यक्त आहे तर उपमानवाक्यांत ' कळवाया शपथ वाहणें न पडे ' या भिन्न व निषेधरूप शब्दांत तें व्यक्त केलें आहे. म्हणून येथे वैधर्म्यानें प्रतिवस्तूपमा झाली. प्रतिवस्तूपमेचे हे दोन्ही प्रकार मालारूपहि असूं शकतात.

## (१४) दृष्टान्त

परंतप राजाचें वर्णन करतांना कालिदास म्हणतो, " जगांत शेकडो राजे आहेत, पण पृथ्वीला राजन्वती असें याच राजामुळे म्हणतां येतें; आकाशांत हजारो तारका असल्या तरी चंद्रामुळेच रात्र 'चांदणी रात्र' होऊं शकते. " प्रतिवस्तूपमेप्रमाणेच यांतहि औपम्य आहे हें कळावयास उशीर लागत नाही. पण ही प्रतिवस्तूपमा नाही. कारण यांतील साधारण धर्म एक नाही. पृथ्वीला 'राजन्वती' म्हणतां येणें आणि रात्रीला 'चांदणी रात्र' म्हणतां येणें या दोन गोष्टी एक नाहीत. त्यामुळे येथे वस्तु–प्रतिवस्तुभाव नाही.

**बिंबप्रतिबिंबभाव**— मग येथे काय आहे असा प्रश्न उद्‌भवतो. त्यावर उत्तर असें की येथे वस्तुप्रतिवस्तुभाव नसला तरी बिंबप्रतिबिंबभाव आहे. 'राजन्वती' आणि 'ज्योत्स्नावती' (चांदणी) या दोन गोष्टी एक नसल्या तरी कवीने त्या अशा मांडल्या आहेत की त्या एकमेकींसारख्या भासतात. जेव्हा एकच गोष्ट दोन भिन्न स्वरूपांत (शब्दांच्या मांडणीच्या) असतात तेव्हा त्यांच्यांत वस्तुप्रतिवस्तुभाव असतो. पण जेथे दोन भिन्न गोष्टी सारख्या दिसतात तेव्हा त्यांत बिंबप्रतिबिंबभाव दिसतो. **वस्तुप्रतिवस्तुभावांत एकपणा असतो, तर बिंबप्रतिबिंबभावांत सारखेपणा असतो**. वस्तुप्रतिवस्तुभाव हा प्रतिवस्तूपमेचा आधार आहे. तर बिंबप्रतिबिंबभाव हा दृष्टांताच्या मुळाशी आहे.

**दृष्टांतांतील बिंबप्रतिबिंबभाव**—दृष्टांतांत दिसून येणारा बिंबप्रतिबिंबभाव हा फक्त साधर्म्यापुरताच नसतो. तर प्रकृत वाक्यांत जेवढ्या गोष्टी आल्या असतील त्या सर्वांना सारख्या अशा दुसऱ्या गोष्टी अप्रकृत वाक्यांत सापडतात. वरचेंच उदाहरण घेतलें तरी हें दिसून येईल. वरच्या उदाहरणांत अशा गोष्टी आहेत.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| प्रकृतवाक्य | – शेकडो राजे | – परंतप राजा | – पृथ्वी | – राजन्वती |
| अप्रकृतवाक्य | – हजारो तारे | – चंद्र | – रात्र | – ज्योत्स्ना |

यांतील कोणतीहि जोडी घेतली तरी त्यांत एकत्व नाही पण सारखेपणा आहे. आरशामध्ये पडलेलें प्रतिबिंब म्हणजे माणूस नव्हे, तें वेगळें आहे. पण त्यांत सारखेपणा मात्र तंतोतंत आहे हीच गोष्ट दृष्टांताची असते.

**दृष्टांत आणि प्रतिवस्तूपमा**--यावरून दृष्टांत आणि प्रतिवस्तूपमा यांच्यांतील भेद स्पष्ट होईल. दोन्हीहि अलंकार वाक्यार्थसादृश्यावर आधारलेले आहेत; त्यांच्यांतील वाक्यें स्वतंत्र असतात; आणि त्यांच्यांतील औपम्य गम्य असतें. पण प्रतिवस्तूपमेंत वस्तुप्रतिवस्तुभाव असतो तर दृष्टांतांत बिंबप्रतिबिंबभाव असतो. प्रतिवस्तूपमेंतील सामान्य धर्म तोच असतो पण दृष्टांतांत दोन वेगवेगळ्या धर्मांत सारखेपणा असतो. शिवाय दृष्टांतांतील हा सारखेपणा केवळ धर्मापुरताच नसतो तर तो उपमानवाक्यांतील सर्व बाबींमध्ये असतो आणि दृष्टांतांत या सर्व गोष्टींकडे आपलें लक्ष असतें. प्रतिवस्तूपमेंत आपलें लक्ष केवळ साधर्म्यावर केंद्रित झालेलें असतें. उदा. "चंद्रिकेचें प्राशन करण्यांत चकोरीच चतुर असतात; विविध प्रकारचे विलास करण्यांत आवंती स्त्रियाच निपुण असतात." येथे आपलें लक्ष फक्त कशाच्या तरी नैपुण्यावर जेवढें केंद्रित होतें तेवढें चकोरी आणि आवंती यांच्यावर होत नाही. उलट, "राजा, जगांत तूंच एक कीर्तिमान् आहेस, आकाशांत चंद्रच एक कांतिमान् आहे." येथे आपलें लक्ष राजा-चंद्र, जग-आकाश, कीर्ति-कांति या सर्वांवर सारखेंच केंद्रित होतें.

दृष्टांत आणि प्रतिवस्तूपमा यांच्यांतील हा फरक असला तरी अलंकार ओळखतांना आपला पुष्कळदा गोंधळ होतो. या दोन अलंकारांत इतकें साम्य आहे की वरवर पाहतां एकाच पद्यांत एकाला दृष्टांत तर दुसऱ्याला प्रतिवस्तूपमा वाटेल. म्हणून अशा वेळीं काळजीपूर्वक निरीक्षण केलें पाहिजे. जर एकच धर्म वेगवेगळ्या शब्दांत सांगितला असेल तर ती प्रतिवस्तूपमा; जर दोन भिन्न धर्म सारखे भासत असतील तर दृष्टांत हेंच त्यांचें गमक होय.

दृष्टांतांत अवश्य असणाऱ्या गोष्टी —

१. दृष्टांतांत वाक्यार्थगत सादृश्य असतें.

२. हें सादृश्य गम्य असतें.

३. दृष्टांतांत एक प्रकृतवाक्य व दुसरें अप्रकृतवाक्य असून प्रकृतवाक्यांतील प्रत्येक बाबीच्या जोडीला अप्रकृतवाक्यांतील बाब असते.

४. हीं दोन्हींहि वाक्यें परस्परांपासून स्वतंत्र असतात.

५. दोन्हींहि वाक्यांत एकच धर्म नसतो पण भिन्न भिन्न धर्मांतील सारखेपणा असतो. म्हणजे बिंबप्रतिबिंबभाव असतो.

६. धर्माप्रमाणेच धर्मामध्येहि बिंबप्रतिबिंबभाव असतो. म्हणून दृष्टांताची व्याख्या अशी करतां येईल—

**जेथे प्रस्तुत गोष्टीचें वर्णन एका वाक्यांत केलेलें असतें आणि त्या वर्णनाचा बोध मनावर अधिक ठसविण्यासाठी दुसऱ्या वाक्यांत दाखला दिलेला असतो, तो असा की प्रस्तुत वाक्यांतील सर्व गोष्टी त्यांत प्रतिबिंबित झालेल्या असतात, तेव्हा दृष्टांत अलंकार होतो.**

उदाहरणें —

(१) तुला रोज उपदेश केला तरी तुझ्या वागण्यांत सुधारणा कशी ती होतच नाही. कुत्र्याचें शेपूट नळींत घालून ठेवलें तरी तें कांही सरळ होत नाही,

येथे पहिल्या वाक्यांत प्रस्तुत गोष्टीचें वर्णन आहे. ती गोष्ट अधिक स्पष्ट करण्यासाठी दुसऱ्या वाक्यांत एक उदाहरण दिलें आहे. पहिल्या वाक्यांतील ‘ रोज उपदेश करणें ’ व ‘ तरीहि वागण्यांत सुधारणा न होणें ’ या मुद्यांचें प्रतिबिंब उपमानवाक्यांतील अनुक्रमें ‘ शेपूट नळींत घालून ठेवणें ’ व ‘ तरीहि सरळ न होणें ’ यांत उमटलें आहे. म्हणून येथे दृष्टान्त अलंकार झाला.

(२) होतों लहान बहु खेळुनि तृप्त झालों ।
अंकीं तुझ्या, तिथुनि थोरपणीं निघालों ॥
मातेसमीप असतीं परि थोर होतीं ।
तेव्हां पिलें सहज सोडुनि तीस जाती ॥

—वा. वा. खरे

वरील श्लोकांतील पूर्वार्धांत प्रस्तुत गोष्टींचें वर्णन आहे. उत्तरार्धांत अप्रस्तुत वाक्य असून उपमेयवाक्याचें प्रतिबिंब उपमानवाक्यामध्ये यथातथ्य उमटलें आहे. अप्रस्तुत वाक्य हें प्रस्तुताचा भाव मनांत अधिक ठसावा या हेतूने दाखला म्हणून दिलें आहे. येथेंहि दृष्टान्त अलंकार झाला.

## दृष्टांताचे प्रकार.

प्रतिवस्तूपमेप्रमाणेच दृष्टांताचेहि साधर्म्याने व वैधर्म्याने प्रकार होतात.

### साधर्म्याने दृष्टांताचीं उदाहरणें—

( १ ) आपलें बोलणें दुसऱ्याला पटलें नाही तर तें चांगल्या शब्दांनी नीट समजावून द्यायचें का लागलीच त्याच्यावर निर्दय कोटिक्रम करीत सुटायचें ? गळ्यांत सरी बसत नाही म्हणून मान कापून सरी बसवायची ?

— गडकरी, भावबंधन अं. ४ प्र. ३.

वरील उताऱ्यांत दोन वाक्यें आहेत. पहिल्या वाक्यांतील मजकूर अधिक स्पष्ट व्हावा म्हणून दुसऱ्या वाक्यांत एक दृष्टांत म्हणजे दाखला दिला आहे. पहिल्या वाक्यांतील अर्थाची मांडणी ज्या पद्धतीने केली आहे त्याच पद्धतीने दुसऱ्या वाक्यांतील अर्थाची मांडणी केली आहे. त्यामुळे उपमेयवाक्यांतील धर्म उपमानवाक्यांत यथातथ्य उमटला आहे. एक वाक्य विधिरूप तर दुसरें निषेधरूप असा प्रकार येथे नाही. म्हणून येथे साधर्म्याने दृष्टांत झाला.

(२) नीचपण बरवें देवा । न चले कोणाचाहि हेवा ।
महापुरें झाडें जाती । तेथे लोहाळे वाचती ॥

—तुकाराम.

वरील अभंगांत ‘ नीचपण बरवें देवा ’ या उपमेयवाक्यांतील अर्थाचें प्रतिबिंब ‘ महापुरें झाडें जाती तेथे लोहाळे वाचती ’ या उपमानवाक्यांत पडलें आहे. उपमेयवाक्याचा अर्थ मनांत ठसावा म्हणून उपमानवाक्य उदाहरणादाखल घेतलेलें आहे. म्हणून येथे दृष्टान्त झाला. दोन्ही वाक्यें विधिरूप असल्यामुळे हा दृष्टांत साधर्म्याने झाला.

(३) रामाचें रचिलें चरित्र मुनिने वाल्मीकिने संस्कृतीं ।
नाही हानि कदापि अन्य कविही तें वर्णितां प्राकृतीं ।
मुक्तांचा रचिलाचि हार वहिला जो रेशमाच्या गुणें ।
तो कार्पासगुणेंकरून करितां काय प्रभेला उणें ?—मोरोपंत.

वरील श्लोकांतील पूर्वार्ध हें उपमेयवाक्य असून त्यांतील बोध मनावर ठसविण्यासाठी उत्तरार्धांतील उपमानवाक्याची योजना केलेली आहे. तीं दोन्ही वाक्यें स्वतंत्र असलीं तरी त्या दोहोंत समान धर्म आहे. प्रस्तुत वाक्यांतील सर्व गोष्टींचें प्रतिबिंब अप्रस्तुत वाक्यांत पूर्णपणें उमटलें आहे.

## वैधर्म्याने दृष्टांताचीं उदाहरणें—

(१) ‘ थोर पुरुष संपत्तीच्या लाभाने गर्विष्ठ होत नसतात. वृक्ष फलभारामुळे नम्र होतात. ’

वरीलपैकी पहिलें वाक्य प्रस्तुताचें वर्णन करतें, व दुसरें वाक्य अप्रस्तुताचें वर्णन करतें. दोन्ही वाक्यांत बिंबप्रतिबिंबभाव आहे. परंतु पहिलें वाक्य निषेधरूप तर दुसरें विधिरूप आहे. म्हणून हा दृष्टान्त वैधर्म्याने झाला.

(२) उद्यमनिरत असावें, त्वां सतत स्वीय कार्य साधाया ।
न पडति निद्रित हरिमुखिं मृग, हें ठावें असे तुला राया ॥
—सुभाषित

वरील उदाहरणांतील उपमेयवाक्यांत ‘ उद्यमनिरत असावें ’ हा विषय सांगितला आहे व तें वाक्य विधिरूप आहे. दुसरें वाक्य हें उपमानवाक्य असून तें निषेधरूप आहे. दोन्ही वाक्यांत जें सादृश्य आहे तें प्रत्यक्ष शब्दानी व्यक्त केलें नसलें तरी ‘ निजलेल्या सिंहाच्या तोंडांत मृग पडत नाहीत ’

या दाखल्यांतून 'उद्यमानिरत असावें' हाच भाव सूचित झाला आहे. म्हणून हें वैधर्म्यदृष्टान्ताचें उदाहरण होय.

(१) प्रभो ! शरण आलियावरि न व्हा कधीं वाकडे ।
म्हणोनि इतुकेंचि हें स्वहितकृत्य जीवांकडे ।
प्रसाद करितां नसे पळ विलंब बापा ! खरें,
घनांबु न पडे मुखीं उघडिल्याविना पांखरें ॥

—मोरोपंत, केकावलि.

वरील श्लोकाच्या तृतीय चरणांत प्रस्तुत विषयाचें वर्णन आहे व चवथ्या चरणांत अप्रस्तुताचें वर्णन आहे. उपमेय ऊर्फ प्रस्तुत विषयाचें वर्णन विधिरूप वाक्यांत असून उपमान ऊर्फ अप्रस्तुत विषयाचें वर्णन निषेधरूप वाक्यांत आहे. म्हणून येथेंहि वैधर्म्यानें दृष्टान्त अलंकार झाला.

## (१५) निदर्शना

वाक्यार्थोपमेची परिणति प्रतिवस्तूपमा व दृष्टांत यांच्यांत कशी झाली हें आपण पाहिलें. आपण जर वाक्यार्थरूपकाची कल्पना केली तर निदर्शनेच्या प्रांतांत शिरूं. रूपकामध्ये आपण एका पदार्थाचा दुसऱ्या पदार्थावर आरोप करतों. तसा प्रकार निदर्शनेंत वाक्यार्थाच्या बाबतींत होतो. उपमेंतून रूपकाकडे जाण्याचा जो मार्ग, त्या मार्गानेच वाक्यार्थोपमा वाक्यार्थरूपकाकडे गेली की निदर्शना होते. उदाहरणाने हें स्पष्ट होईल.

| | उपमा | रूपक |
|---|---|---|
| पदार्थोपमा— | मुख चंद्रासारखें आहे | मुख चंद्रच आहे. |
| वाक्यार्थोपमा— | जसें चंद्राला चंदन लावून पांढरें करणें निष्फळ होय, तसेंच तुझ्या आरक्त नखांना लाक्षारस लावणें होय. | तुझ्या नखाला लाक्षारस लावणें म्हणजे चंद्राला चंदनानें पांढरें करणेंच होय. |

= वाक्यार्थरूपक.
= निदर्शना.

निदर्शनेंत अशा प्रकारें एका वाक्यार्थावर दुसऱ्या वाक्यार्थाचा आरोप करण्यांत येतो. पण रूपकांतील आरोपांत आणि या आरोपांत एक फरक आहे. रूपकांतील आरोप सादृश्यावर आधारलेला असतो तर निदर्शनेंतील आरोप सादृश्यपर्यवसायी असतो. वरचेंच उदाहरण घेऊन सांगावयाचें म्हणजे असें सांगतां येईल. तेथे दोन वाक्यार्थ आहेत. नायिकेच्या नखांना लाल रंग लावणें, हा एक, आणि चंद्राला चंदनाने पांढरें करणें हा दुसरा. वस्तुतः या दोन वाक्यार्थांत कोणताहि संबंध नाही. पण कवीने हे दोन वाक्यार्थ एकत्र आणले आणि त्या एकत्र आणण्याचें पर्यवसान औपम्य द्योतित होण्यांत झालें. "मी रघुवंशाचें वर्णन करणें म्हणजे लहानशा होडीने सागर तरून जाण्याचाच हव्यास धरणें होय" असें जें कालिदास म्हणतो त्यांतहि असेंच आहे. रघुवंशाचें वर्णन करणें ही गोष्ट आणि होडीने सागर तरणें ही गोष्ट यांचा परस्पर कोणताहि संबंध नाही; पण कवीने हे दोन वाक्यार्थ एकत्र आणले असें पाहतांच आपण विचारतों, कवीने असें कां करावें? या दोन असंबंधित गोष्टी एकत्र आणण्यांत कवीचा कोणता हेतु असेल बरें! आणि मग आपलें आपणच उत्तर देतों "यासारखेंच तेंहि वेडेपणाचें आहे!" असें उत्तर आलें म्हणजे त्या वाक्यांच्या एकत्र येण्याचें उपमेंत पर्यवसान झालें.

**निदर्शना आणि दृष्टांत**—निदर्शनेकडे अशा दृष्टीने पाहिलें की आपणाला दृष्टांताची आठवण होते. कारण दृष्टांतांतहि असें वाक्यार्थगत गम्य औपम्य प्रतीत होतें. पण या दोहोंत फरक आहे. दृष्टांतांतील वाक्यें स्वतंत्र असतात. निदर्शनेंत तीं परस्परावलंबी असतात. "जों तुझे गुण वर्णूं पाहतो; तो समुद्रावरून चालत जाण्याचीच इच्छा करतो" ही निदर्शना आहे. येथील वाक्यें परस्परावलंबी आहेत. पण हेंच—"तुझे गुणवर्णन करणें अशक्य आहे; कोणी सागर तरून गेला आहे का?" येथे दृष्टांत होतो. दुसरें म्हणजे दृष्टांतांतील धर्म स्पष्ट सांगितलेले पण भिन्न असतात. निदर्शनेंत धर्म स्पष्ट सांगिलेला नसतो पण तो अभिन्न आहे हें सूचित होतें. शिवाय दृष्टांतांतील सौंदर्य बिंबप्रतिबिंबभावांत

असतें, तर निदर्शनेंतील सौंदर्य संबंध नसलेल्या दोन वाक्यांचें औपम्यांत पर्यवसान करणें यांत असतें.

निदर्शनेंत अशा प्रकारें संबंध नसलेल्या वाक्यार्थांना एकत्र आणून त्यांचें पर्यवसान औपम्यात केलेलें असतें. म्हणून निदर्शनेला **असंभवद्वस्तु-संबंधा** निदर्शना म्हणतात.

पण याशिवायहि निदर्शनेचा एक वेगळा प्रकार आहे. कित्येकदा कवि असें वर्णन करतो, "उदय होतांच कमलांना कांति देऊन सूर्य असें सांगतो की समृद्ध माणसाने आप्तांचें पोषण करावें" किंवा "एका पर्वतशिखरावर एक लहानसा दगड होता. थोरपदीं चढलेल्या लहान माणसाचें सहज पतन होतें, असें तो म्हणत असतांच तो एका वाऱ्याच्या झुळकीने खाली पडला." या ठिकाणी समृद्धि आणि आप्तपोषण यांचा संबंध सूर्याने आपल्या कृतीनेच दाखविला; किंवा अयोग्य माणसाचें थोरपदीं पतन होतें ही गोष्ट त्या दगडाने आपल्या उदाहरणानेच दाखविली. अशा ठिकाणी दोन वाक्यार्थांचा बोध्य-बोधक संबंध आहे म्हणून हिला **संभवद्वस्तुसंबंधनिदर्शना किंवा बोधनिदर्शना** म्हणतात. पहिल्या निदर्शनेचें दृष्टान्ताशीं जें नातें आहे तेंच या बोधनिदर्शनेचें अर्थांतरन्यासाशीं आहे.

निदर्शनेला आवश्यक गोष्टी अशा—

१. निदर्शनेंत दोन वाक्यार्थ असतात.

२. त्या वाक्यार्थांचा परस्पर संबंध नसतो.

३. त्या दोन वाक्यार्थांना कवि एकत्र आणून त्यांचें पर्यवसान औपम्यांत करतो.

४. निदर्शनेंतील वाक्यें परस्परावलंबी असतात.

५. निदर्शनेंतील सादृश्य गम्य किंवा व्यंग्य असतें.

६. या निदर्शनेला असंभवद्वस्तुसंबंधनिदर्शना म्हणतात.

७. निदर्शनेचा दुसरा प्रकार संभवद्वस्तुसंबंध हा आहे. हिलाच बोध-निदर्शना म्हणतात.

८. या निदर्शनेंत बोध्यबोधक संबंध असतो.

९ हींत कार्यकारण संबंध उदाहरणानेच दाखवून दिलेला असतो.

म्हणून निदर्शनेचें लक्षण असें—

**(१) दोन असंबंधित अशा वाक्यार्थांचा किंवा वस्तूंचा जेथे एकत्र संबंध आणून त्याचें पर्यवसान औपम्यांत केलेलें असतें किंवा (२) जेथे दोन वस्तूंमधील कार्यकारणसंबंधाचा बोध त्यांपैकी एका वस्तूने आपल्या कृतीनेच करून दिला आहे असें वर्णन असतें तेथे निदर्शना अलंकार होतो.**

उदाहरणें:—

(१) 'तुझ्यासारख्या मूर्ख माणसास उपदेश करणें म्हणजे पालथ्या घागरीवर पाणी ओतणेंच होय.'

या वाक्यांत 'मूर्ख माणसास उपदेश करणें' हा एक वाक्यार्थ असून तो प्रस्तुत आहे. 'पालथ्या घागरीवर पाणी ओतणें' हा दुसरा वाक्यार्थ असून तो अप्रस्तुत आहे. वस्तुतः मूर्खास उपदेश करण्याचा व पालथ्या घागरीवर पाणी ओतण्याचा परस्परसंबंध काहीच नाही, तथापि हे दोन वाक्यार्थ एकत्र आणून त्यांतून "क्रियेपासून कार्यसिद्धि न होण्याचा" समान धर्म सुचविला आहे. म्हणून ही वाक्यार्थनिदर्शना झाली.

(२) कपटद्यूत विलोकुनि विदुर म्हणे, 'काय हें अगा! राया!
कां भ्रमलासि स्वकरें अग्नि कसा लाविसी अगारा या?॥

—मोरोपंत, सभापर्व अ. ४

कपटद्यूत चाललेलें पाहून विदुर धृतराष्ट्रास म्हणतो की 'तूं हें काय चालवलें आहेस? तूं आपल्या हाताने गृहाला अग्नि कां लावतोस?'

वरील आर्येतील 'काय हें अगा!' या शब्दांतून "असलें कपटद्यूत खेळण्यास परवानगी कां देतोस?" इतका अर्थ प्रतीत होतो. तो स्पष्ट शब्दांत नसला तरी इतका अर्थ घेतला म्हणजे तें प्रस्तुत विषयप्रतिपादक

वाक्य झालें. ‘ घराला आग लावणें ’ या अप्रस्तुत वाक्याचा अधर्मद्यूत खेळण्याशीं वस्तुतः संबंध नसला तरी सादृश्याने तो जोडला आहे. “ आग लावण्यामुळे घराची जशी हानि होते तशी कपटद्यूतामुळे कुरुकुळाची हानि होईल, ” असा अर्थ येथे सूचित आहे. म्हणून ही वाक्यार्थनिदर्शना होय.

वस्तुतः परस्परांशीं संबंध नसलेल्या अशा दोन वाक्यार्थांमध्ये संबंध जोडून त्यांतून कोणतें तरी सादृश्य सूचित केलेलें असलें म्हणजे वाक्यार्थ-निदर्शना होते. वरील उदाहरणांवरून हें स्पष्ट झालें असेलच. निदर्शनेचा हा एक प्रकार झाला.

**बोधनिदर्शनेचें उदाहरण--**

होतां पयोद--पटलीं क्रमपूर्व लोप ।
सांगे जना घन--रवें झणिं इंद्रचाप ॥
आयुष्य अल्पचि असो, परि लोकमान्य ।
होवोनि जा मिळविण्या परलोक धन्य ॥

—राधारमण.

हें बोध निदर्शनेचें सुंदर उदाहरण होय. यांत बोध्यबोधक संबंध आहे. ‘ इंद्रचापाचा लोप होत असणें ’ ही प्रस्तुत ऊर्फ उपमेय वस्तु आहे. ‘ आयुष्य अल्प असतांहि लोकमान्यत्व संपादणें ’ ही अप्रस्तुत ऊर्फ उपमान वस्तु आहे. परंतु तिचें स्वतंत्र वर्णन केलें नसून इंद्रचापाच्या तोंडीं उपमान वाक्य बोधस्वरूपांत योजिलें आहे. म्हणून ही बोधनिदर्शना होय.

## निदर्शनेचे प्रकार.

निदर्शनेचे दोन मुख्य प्रकार आपण पाहिले. एक असंभवद्वस्तु-संबंध निदर्शना आणि दुसरी संभवद्वस्तुसंबंध निदर्शना. यांपैकी पहिल्या प्रकाराचे दोन भेद होतात. जेथे दोन वाक्यार्थांचें एकत्र आल्याने उपमेंत पर्यवसान होतें तो प्रकार. उदा. ‘ मी रघुवंश लिहिणें म्हणजे होडीने

सागर तरंगेंच होय." दुसऱ्या भेदांत असाच संबंध एखाद्या पदार्थाने दाखविलेला असतो. उदा. "मुखाने पद्मशोभा धारण केली." किंवा "तिच्या चरणांनी हंसगति धारण केली." हें ऐकल्याबरोबर आपल्या समोर प्रश्न येतो की मुख पद्माची शोभा कशी धारण करणार, किंवा पाय हंसांची गति कशी घेतील ? आणि मग आपणच म्हणतों, पद्माची शोभा म्हणजे पद्मासारखी शोभा आणि हंसगति म्हणजे हंसासारखी गति. येथेंहि दोन वस्तूंच्या एकत्र आणण्याचें उपमेंत पर्यवसान होतें व हें पर्यवसान शोभा धारण करणें अशा गोष्टींतून झालें आहे. म्हणून निदर्शनेचे एकूण प्रकार असे.—




उदाहरणें—

पाणिग्रहणानंतर पुलकान्वित जाहली उमा-काया ।
अग्नि–प्रदक्षिणा करि हर तैं हस्तीं धरूनिया जाया ॥
फिरतां वन्हि सभोंवति शोभा जी ये तिला तुला नाहीं ।
मेरूसभोंवती तें भ्रमतें वासर–निशा–मिथुन पाहीं ॥

पाणिग्रहणानंतर शंकराने पार्वतीचा हात धरून तिच्यासह बोहल्यावर अग्निप्रदक्षिणा घातली हा वाक्यार्थ येथे प्रस्तुत आहे. 'दिवस व रात्र या जोडप्याने मेरूपर्वताभोंवती फिरणें' हा वाक्यार्थ अप्रस्तुत होय. वस्तुतः हे

दोन वाक्यार्थ असंबंधित आहेत, परंतु ‘ हर व उमा हें जोडपें ’ आणि त्यांची ‘वन्हिप्रदक्षिणा’ या वस्तूंचा अनुक्रमें ‘ वासर–निशा–मिथुन ’ आणि ‘ त्यांचें मेरूभोवती भ्रमण ’ या उपमानवस्तूंशीं संबंध जोडून त्यांतील सादृश्य अनुभवास आणून दिलें आहे. म्हणून ही **पदार्थ निदर्शना** होय.

वरील उदाहरणांत उपमेय व उपमान वाक्यांतील औपम्य हें वस्तूंवर म्हणजे पदार्थांवर आधारलेलें आहे. हें औपम्य उपमेय व उपमानवाक्यांतील अर्थांवर असलें म्हणजे वाक्यार्थनिदर्शना अलंकार होतो.

उदाहरणार्थः—

होता फार भरवसा तेरा वर्षें तुझाच कीं अहितें ।
कर्णें छळिलें, त्यातें वधिशील रणीं, शिखी जसा अहितें ।।
तें सकळ विफळ झालें, की वंध्यद्रुम उपासिला; चुकलों; ।
थुकलों न राज्यरुचिवरि; विषयप्रेमें महासुखां मुकलों ।।
— मोरोपंत, कर्णपर्व अ. ४०

कर्ण अद्याप जिवंत आहे हें धर्मराजास समजल्यावर त्यानें अर्जुनाची जी निर्भर्त्सना केली ती पंतांनी वरील दोन आर्यांतून सांगितली आहे. धर्म अर्जुनास म्हणतो की “ तूं कर्णास मारशील असा मी आजवर भरवसा धरला. वंध्य म्हणजे ज्याला फळें येत नाहीत अशा वृक्षाची जोपासना केली.” येथे कर्णवधासाठी अर्जुनाचा भरवसा धरणें या उपमेय वाक्याचा ‘ वंध्यद्रुम उपासणें ’ या उपमानवाक्याशीं संबंध नसतांहि तो संबंध प्रस्थापित केला आहे आणि “ इष्टसिद्धीसाठी भलत्याच गोष्टीवर भरवसा ठेवण्याची चूक करणें ” हें सादृश्य दोहोंतून सुचविलें आहे. ही निदर्शना दोन असंबंधित वाक्यार्थांवर आधारलेली असल्यामुळे येथे ‘ वाक्यार्थ निदर्शना ’ झाली.

वरील उदाहरणांत एक उपमेयवाक्य व एक उपमानवाक्य असा प्रकार आहे. कधी कधी एक उपमेय असून उपमानें अनेक असतात. त्या वेळीं **मालानिदर्शना** होते. उदाहरणार्थः—

सर्पातें बिसतंतुने सुदृढ जो बांधावया इच्छितो,
किंवा वज्रमणी शिरीषकुसुमें भेदावया धावतो,
किंवा तो मधुबिंदुने मधुरता क्षाराब्धिला आणतो,
जो मूर्खास सुभाषितें वश करूं ऐसें झणीं बोलतो ॥

—वामन, नीतिशतक

'मूर्खास सुभाषिताने वश करणें' हें उपमेयवाक्य होय. सर्पाला बिसतंतूने बांधणें, वज्राला शिरीषकुसुमाने भेदणें व क्षाराब्धिला मधुबिंदूने मधुरता आणणें हीं तीन उपमानवाक्यें वस्तुतः उपमेयवाक्याशीं असंबंधित आहेत. त्यांतील संबंध असंभाव्य आहे. परंतु 'अशक्य गोष्ट करण्याच्या' गर्भित सादृश्याने त्या तिन्ही अप्रस्तुत वाक्यांचा संबंध एका प्रस्तुत वाक्याशीं जोडला आहे म्हणून मालानिदर्शनेचें हें उदाहरण झालें.

बोधानिदर्शनेचें उदाहरण मागे आलेंच आहे.

मम्मटाच्या काव्यप्रकाशांत निदर्शनेचें जें वर्गीकरण केलेलें आहे त्याला अनुसरून आम्ही हे भेद दिले आहेत. जगन्नाथाने आपल्या रसगंगाधरांत निदर्शनेचा बोध शब्दांनी कसा होतो व अर्थतः कसा होतो याला अनुसरून भेद दिलेले आहेत. त्या प्रकारें होणारें वर्गीकरण अलंकारचंद्रिकेंत आहे. तें असे—



या वर्गीकरणांतील पदार्थ निदर्शना व वाक्यार्थ निदर्शना या असंभवद्वस्तुसंबंधांत येतात. क्रियानिदर्शना ही संभवद्वस्तु निदर्शना किंवा बोध निदर्शना होय. आर्थी निदर्शनेंत अर्थतः असंभवद्वस्तु निदर्शनाच असते. तिचें स्वरूप असें–

**आर्थी निदर्शना**––या प्रकारांत प्रकृत पदार्थाच्या व्यवहाराचें वर्णन नसतें; पण त्याच्यासारख्या दुसऱ्या अप्रस्तुत पदार्थाच्या व्यवहाराचें वर्णन असतें व त्यावरून अर्थतः प्रस्तुत पदार्थाचा व्यवहार ज्ञात होतो. उदा.

'मूकव्रत कां धरिलें असता येथेच तो महाभागे।
जातां निघोनि जल तें बांधाया सेतु इच्छिसी कागे!'

एक सखी नायिकेला म्हणते "तुझा प्रियकर येथेच असतांना तूं रुसून कां बरें बसलीस?" (आणि तो निघून गेल्यावर मग त्याला बोलावण्याचा प्रयत्न करशील त्याचा काय उपयोग?) पण हा प्रस्तुत अर्थ असा न सांगतां 'पाणी निघून गेल्यावर पूल बांधण्याच्या' क्रियेचें ती वर्णन करते. येथे अर्थतः निदर्शना आहे व ही निदर्शना असंभवद्वस्तु संबंधाची आहे. निदर्शनेच्या या प्रकारालाच कित्येकांनी **ललित** अलंकार मानलें आहे.

**तुल्ययोगिता, दीपक, प्रतिवस्तूपमा, दृष्टांत व निदर्शना यांचीं अभ्यासार्थ उदाहरणें.––**

(१) खळ निंदिति म्हणुनि बुधें टाकावी काय हरिगुणासक्ति।
दीरनणंदाजाचें साध्वी न त्यागिती सुपतिभक्ति॥
—मोरोपंत.

(२) जे कां ज्ञानें लाधले सद्विचारा
संपत्तीचा त्यांपुढे काय तोरा।
पद्माचा जो तंतु तो वारणाला
वारायाला पै म्हणे सिद्ध झाला॥
—वामन.

( ३ ) प्रसाद करितां उणें अधिक नाठवा, हो ! हरी ! ॥

—मोरोपंत, केकावलि.

(४) हें पाखरूं मजसि येइल काय कामा ।
ऐसें नृपा, न वद पूरितलोक कामा ॥
मोलें उणें व्यजन तें धरितां पुढारीं ।
छाया करी तपनदीप्तिसही निवारी ॥

—रघुनाथ पंडित.

(५) ' इदमपि धनं जितं ते ' शकुनि म्हणे, दीप्तपावक पटाने ।
बांधी माणिभ्रमें, बहु फुगला मलिनस्वभाव कपटानें ॥

—मोरोपंत, सभापर्व.

(६) नळरहित वराशीं तूज योजूनि पाहे ।
तरि मग विधि ऐसा कोणता मूढ आहे ?
अचतुर नर तोहि जाहल्या जेविता कीं ।
सरमिसळ करीना सर्वथा खीर तोकीं ॥

—रघुनाथ पंडित.

( ७ ) ज्याच्या नेत्रांतुनि जळ, पळ पळ रक्तौघ तनुंतुनी सांडे ।

— मोरोपंत.

( ८ ) आपुलिया बळे नाही मी बोलत । सखा भगवंत वाचा त्याची ।
साळुंकी मंजुळ बोलतसे वाणी । शिकविता धणी वेगळाची ॥

—तुकाराम.

( ९ ) स्कधीं शिर आधारी, त्याच्या तो मृदुल कर गळां घाली,
भ्याली भीरु, उसासे, स्फुंदे, अत्युष्ण आसवें ढाळी ॥

—विनायक, ' ध्यास तो भास '

(१०) पुरे, पुराणें, स्मृति, वेद, शास्त्रें । आयुष्मिकें, वैदिक कर्म-तंत्रें ।
जेणें सरे हा भव तें विचारी । या वेगळी सर्व दुकानदारी ॥

—वामन.

(११) तूं उठसी बससी जासि पुन्हा थबकसी
पांगतां इतर जन कांहीं मग बोलाया वांछिसी ॥

—यशवंत.

(१२) राष्ट्रीय संकटांच्या विचारांत व्यक्तींचीं दुःखें अजिबात भासेनाशीं होतात असें मात्र मुळीच नाही. सर्वांग व्याधीनें विकल झालेलें असलें तरी करंगळी कापल्याचें दुःख तिला व्हायचें तें होतेंच.

—गडकरी, भावबंधन.

## (१६) व्यतिरेक

व्यतिरेक म्हणजे आधिक्य. अर्थात् या अलंकारांत उपमेयाचें उपमानाहून आधिक्य अपेक्षित आहे. रूपकातिशयोक्तीमध्ये उपमेयाचा उत्कर्ष दाखविलेला असतो. पण तो उपमेयाला उपमानाच्या बरोबरीला नेऊन दाखविलेला असतो. व्यतिरेकांत कवि या पलीकडे एक पाऊल टाकतो व उपमेय उपमानापेक्षा सरस आहे असें दाखवितो तसें पाहिलें तर यद्यर्थातिशयोक्तींत व्यतिरेकाची छटा असतेच, आणि अप्रकृतांच्या तुल्ययोगितेंतहि कित्येकदा व्यतिरेक ध्वनित होतो. पण येथे कवि उपमेयाचा सरसपणा स्पष्टपणें आपल्यापुढे मांडतो. आणि याच्यानंतर येणाऱ्या प्रतीप अलंकारांत तर तो उपमानाचा तिरस्कारच करतो.

उपमेयाचा हा सरसपणा कवि दोन प्रकारें दाखवितो. एकतर उपमेयाचा उत्कर्ष दाखवून; किंवा उपमानाचा अपकर्ष दाखवून. ‘ तुझें निष्कलंक मुख चंद्रासारखें कसें असेल ? ’ येथे उपमेयाचा उत्कर्ष आहे; तर

'चंद्रावर कलंक असतांना तुझें मुख चंद्रासारखें कसें असूं शकेल?' येथे उपमानाचा अपकर्ष आहे. या दोहोंतहि कवि उपमानोपमेयांतील भेद दाखवून आपले उद्दिष्ट साधत आहे. पण उपमानोपमेयांतील भेद दाखविण्यांतहि कवीचा हेतु मात्र त्या दोहोंतील औपम्य दाखविण्याचाच असतो.

एखाद्या धर्माच्या बाबतींत उपमेयाचें आधिक्य दाखविणें ही व्यतिरेकाची मध्यवर्ती कल्पना आहे. कित्येक आलंकारिकांच्या मताने उपमानाधिक्यांतहि व्यतिरेक होतो; पण तें बरोबर दिसत नाही. कारण त्यांत वैचित्र्य नाही. उपमान हें सामान्यतः सादृश्याचें आदर्श प्रमाण मानलें गेल्यामुळे त्याचा उत्कर्ष दाखविण्यात कोणतेंहि वैचित्र्य नसतें. व्यतिरेकाचें वैचित्र्य उपमेयाधिक्यांतच आहे.

झाला क्षीण शशी जरि पुनः पुना वृद्धि होतसे त्यास।
थांब सखे, पाहि जरा, गेले यौवन न येतसें खास॥

या पद्यांत कवीने यौवनापेक्षा चंद्राचें सरसपण दाखविलें नाही. यौवनाच्या अस्थैर्याचें आधिक्य रसिक मनावर बिंबविलें आहे म्हणून यांत उपमेयाच्या अस्थैर्याचें आधिक्यच अभिप्रेत आहे.

अर्थात् येथे उपमेयाचा उत्कर्ष म्हणजे काय हें पाहिलें पाहिजे. कवीला जो एक मुद्दा रसिकांसमोर मांडावयाचा असतो त्यावरून उत्कर्षाचें स्वरूप निश्चित करावें लागते. वरील उदाहरणांत तसें पाहिलें तर चंद्राचें आधिक्य दिसेल. यौवन फिरून येऊं शकत नाही. उलट चद्र पुन्हा वाढू शकतो तेव्हा चंद्र हा यौवनापेक्षा सरस आहे. पण असा व्यावहारिक सरसपणा येथे कवीला अपेक्षित नाही. यौवनाचा क्षण अन् क्षण मोलाचा आहे हें कवि आपल्या प्रियेला पटवून देत आहे व त्याकरिता यौवनाचें अस्थैर्य कसें आहे हें त्याला दाखवावयाचें आहे व त्या बाबतींत चंद्रापेक्षा यौवन सरस आहे असें तो दाखवीत आहे.

**व्यतिरेक आणि यद्यर्थातिशयोक्ति—** यद्यर्थातिशयोक्तींत व्यतिरेकाची छटा असते असें मागे सांगितलेंच आहे. पण दोहोंच्या मांडणींत

फरक आहे. यद्यर्थातिशयोक्तींत अध्यवसाय असतो, तसें व्यतिरेकांत नसतें. दुसरें म्हणजे " उपमान असें असें होईल तर तें उपमेयाचें स्थान घेऊं शकेल. " असें अतिशयोक्तींत असल्याने तेथे उपमानाची जागा उपमेयच घेतें. उलट व्यतिरेकांत उपमानाचें स्वतंत्र अस्तित्व प्रतीत होतें. बारकाईने पाहिल्यास यद्यर्थातिशयोक्तींचें साम्य व्यतिरेकापेक्षा प्रतीपाशीं अधिक आहे.

**व्यतिरेकांतील आवश्यक गोष्टी अशा—**

१. व्यतिरेकांत उपमेयाचा उपमानाहून सरसपणा दाखविला असतो.

२. हें दाखवितांना कवि एकतर उपमेयाचा उत्कर्ष दाखवितो किंवा उपमानाचा अपकर्ष दाखवितो.

३. यांत उपमानोपमेयांची भिन्नता दाखविण्याचें स्वरूप असलें तरी त्यांतील हेतु औपम्य हाच असतो.

४. उपमेयाचें आधिक्य दाखविणें हा व्यतिरेकाचा प्राण आहे. उपमेयाचें न्यूनत्व व्यतिरेकांत अपेक्षित नाही.

५. उपमेयाचें हें आधिक्य वाच्यहि असूं शकतें, किंवा ध्वनितहि होऊं शकतें.

६. कित्येकदा श्लेषाच्या द्वारें व्यतिरेक दाखविण्यांत येतो.

म्हणून व्यतिरेकाची व्याख्या अशी —

**जेथे एखाद्या गुणधर्माच्या बाबतींत उपमानापेक्षा उपमेयाचें आधिक्य दाखविलें असतें तेथे व्यतिरेक अलंकार होतो.**

व्यतिरेक दोन प्रकारें सिद्ध होतो. उपमानापेक्षा उपमेयाचा उत्कर्ष दाखवून किंवा उपमानाचा अपकर्ष दाखवून. दोन्हीहि प्रकारचीं उदाहरणें अशीं —

(१) त्याचें हृदय पाषाणापेक्षाहि कठोर आहे.

या वाक्यांत ' कठोरता ' या धर्माच्या बाबतींत पाषाण या उपमानापेक्षा हृदय या उपमेयाचें आधिक्य सांगितलें आहे; म्हणून हें व्यतिरेकाचें उदाहरण होय.

(२) दारिद्र्य मरण यांतुनि मरण बरें बा, दरिद्रता खोटी ।
मरणांत दुःख थोडें, दारिद्र्यांत व्यथा असे मोठी ॥

—गोडबोले, 'मृच्छकटिक'

यांत दारिद्र्याचें वर्णन हें उपमेय आहे. दारिद्र्याची तुलना मरण या उपमानाशीं केली असून दुःखदायकत्वाच्या धर्मांत मरण हें खालच्या दर्जाचें आहे, दारिद्र्याचा वरचा दर्जा आहे असें दर्शविलें आहे. या तुलनेचा हेतु दारिद्र्यांतील दुःखाचें उत्कट स्वरूप दाखविण्याचा आहे. येथे उपमानाच्या उत्कर्षाने व्यतिरेक अलंकार झाला.

(३) मऊ मेणाहून आम्ही विष्णुदास । कठिण वज्रास भेदूं ऐसे ।

—तुकाराम.

तुकोबांच्या या उक्तींत विष्णुदासांची तुलना प्रथमतः मेणाशीं केली आहे. मऊपणाच्या गुणांत विष्णुदास हें मेणाहून सरस असतात असे म्हटलें आहे. नंतर विणुदासांची तुलना वज्राशीं केली असून कठिणतेचा गुण वज्रापेक्षा संतांमध्ये आधिक्याने वसतो असें दर्शविलें आहे. ह्या दोन्ही ठिकाणी उपमेयाच्या प्रकर्षाने व्यतिरेक अलंकार झाला.

( ४ ) देवांनी सागर मंथून काढलेलें हलाहल विष देखील इतकें तीक्ष्ण नसेल ! ज्याचा ताण अफाट समुद्रच सोसूं शकतो तो वडवानलहि इतका प्रखर नसेल !

—कृ. प्र. खाडिलकर, 'सवाई माधवरावाचा मृत्यु'

आईसाहेब व नाना फडणीस यांच्याविषयी माधवरावांच्या मनांत अनादर निर्माण करण्यासाठी जें बनावट पत्र माधवरावांना धाडण्यांत आलें, त्यांतील खोडसाळ मजकुरास उद्देशून केशवशास्त्री यांनी वरील वाक्य उच्चारलें आहे. पत्रांतील मजकुरांची तुलना हलाहल विषाशीं करून, तीक्ष्णतेच्या व प्रखरतेच्या गुणांत उपमानाचा अपकर्ष सांगितला आहे.

( ६ ) काल्ही आजही पुत्र ऐसे तुझे
ज्यांपुढे मेरुमांदार होती खुजे

—यशवंत.

वरील उक्तींत हिंदपुत्रांची मेरुमांदाराशीं तुलना केली असून मेरुमांदार या उपमानाचा अपकर्ष सांगून उपमेयाचें आधिक्य सुचविलें आहे.

(७) वारा तुझ्या स्पर्शानें शुद्ध झाला मला लाधला ! भाग्य हें केवढें ।
मातें स्वयें देशि जें अन्नपाणी, सुधा बापुडी कायशी त्यापुढे !

—रे. टिळक, 'माझ्या जन्मभूमीचें नांव'

या उदाहरणांतील द्वितीय चरणांत व्यतिरेक हा अलंकार आहे. 'अन्नपाणी' या उपमेयाशीं तुलना करतां 'सुधा' हें उपमान कमी प्रतीचें आहे हें 'बापुडी' या शब्दाने दर्शविलें आहे. म्हणजे उपमानाच्या अपकर्षाने व्यतिरेक झाला.

(८) सृष्टिसुंदरी नटली थटली
सूक्ष्म धवल वल्कला नेसली
खुलली जणु सुमवेली फुलली
रम्य ही शोभा
हिजपुढे काय ती रंभा ।

—दत्त, 'विश्वामित्रीच्या कांठीं'

या कडव्यांत शोभा या गुणाच्या बाबतींत रंभा या उपमानाचा अपकर्ष दाखविला आहे. सृष्टिसुंदरी या उपमेयाच्या ठिकाणचें शोभेच्या बाबतींत आधिक्यच अपेक्षित आहे. पण तें उपमानाच्या अपकर्षाने सुचविलें आहे. म्हणून हेंहि व्यतिरेकाचें उदाहरण झालें.

**मालाव्यतिरेक**— याशिवाय कधी कधी **मालाव्यतिरेकाचीं** उदाहरणेंहि काव्यांत आढळतात. उदाहरणार्थः—

(१) सज्जनसंगापुढे तुक्याला इतर सुखाची भुक्ति
तुच्छ वाटली ! फार कशाला ' न लगे ' बोले ' मुक्ति '
चिंतामणिची, कल्पतरूची, कामदुधेची महती
नाही नाही साधुसंगतीपुढे ! महात्मे वदती,
सुधा मुधा तोलणें जीसवें सत्संगति ही ऐशी,
वनीं निर्जनीं परमसुखाची दात्री मिळेल कैशी ?

—रे. टिळक ' वनवासी फूल. '

या उदाहणांत सज्जनसंग हें एकच उपमेय असून चिंतामणि, कल्पतरु, कामधेनु व अमृत हीं उपमानें आहेत. या उपमानांचा अपकर्ष सांगून उपमेयाचें आधिक्य दर्शविलें आहे. म्हणून येथे मालाव्यतिरेक अलंकार झाला.

( २ ) मोक्ष देऊनि उदार । काशी होय कीर ।
परी वेचावें लागे शरीर । तिये गांवीं ॥
शुचित्वें शुचि गंगा होये । आणि पापतापही जाये ।
परी तेथ आहे । बुडणें एक ॥
हिमवंतु दोष खाये । परी जीविताची हानि होये ।
तैसें शुचित्व नोहे । सज्जनाचें ॥— ज्ञानेश्वरी. अ. १२.

अर्थ: — काशीक्षेत्र मोक्षप्राप्ति करून देण्याबद्दल प्रख्यात आहे, परंतु त्या ठिकाणीं देह अर्पण केल्याशिवाय मोक्ष लाभत नाही. पावन करणाऱ्या गंगेचें पाणी पवित्र आहे, त्यांत स्नान केल्याने पाप व मनाचा ताप दूर होतात; परंतु त्यांत बुडण्याची भीति असते हिमालय पर्वतावर गेल्याने दोषक्षालन होतें, परंतु ( तेथील हवा न मानवल्यास ) जिवाची हानि होते; परंतु सज्जनापासून जें पावनत्व लाभतें तें लाभत असतां जिवाची हानि होण्याची भीति नाही.

वरील ओव्यांमध्ये पावन करण्याच्या गुणांत सज्जन हे काशीक्षेत्र, गंगानदी व हिमालय यांपेक्षा अधिक समर्थ आहेत असें दर्शविलें आहे, व त्यासाठी या उपमानांचा उपमेयाहून अपकर्ष दर्शविला आहे. येथेहि मालाव्यतिरेक आहे.

## (१७) प्रतीप

ऊर्वशीच्या स्वरूपाबद्दल आपल्या मित्राजवळ बोलत असतां पुरुरवा म्हणतो, " मित्रा, तिची काया म्हणजे उपमानाचेंहि उपमान आहे." ऊर्वशीच्या सौंदर्याचें यापेक्षा अधिक वर्णन तें कोणतें ? अशा वर्णनांतच प्रतीपाचें बीज आहे.

प्रतीप म्हणजे प्रवाह उलटा होणें. नदीचा प्रवाह उगमाकडे वाहूं लागेल का ? तसेंच उपमेय हें उपमानाचें उपमान होऊं शकेल का ? 'नाही' असेंच याचें उत्तर आहे. पण कवि तसेंहि करावयास कमी करीत नाही. उपमानास उपमेय मानून तो उपमानाची किंमत कमी करतो.

व्यतिरेकांत उपमेयाचें आधिक्य स्पष्ट सांगितलें असतें. यद्यर्थातिशयोक्तींत उपमानाचें न्यूनत्व सुचविलें असतें. तर प्रतीपांत उपमानाचा सरळ तिरस्कार केलेला असतो. प्रतीपाच्या आवश्यक गोष्टी अशा—

१. व्यतिरेकाप्रमाणेच प्रतीप सादृश्यावर आधारलेला आहे.

२ हें सादृश्य रूढ उपमानाचा तिरस्कार करून दाखविलेलें असतें.

३. याकरिता कवि उपमानाला उपमेयत्व देतो.

४. हा उलटा प्रकार असल्याने याला प्रतीप म्हणतात.

म्हणून प्रतीपाचें लक्षण असें—

**जेव्हा कोणत्याहि प्रकारें उपमानाचा अधिक्षेप होईल अशा प्रकारें उपमेयाविषयी कांही बोललें जातें तेव्हा प्रतीप अलंकार होतो.**

उदाहरणार्थ—

> भीम गजांतें मर्दी, कल्पांतीं रुद्र जेंवि भूतातें; ।
> भीमाचें यश लाजवि सुरभिक्षीराचियाहि ऊतांतें ॥
>
> —मोरोपंत, कर्णपर्व.

यश शुभ्र असतें असा कविसंकेत आहे. भीमाचें यश इतकें स्वच्छ आहे की त्यासमोर कामधेनूच्या दुधाचा फेसमुद्धा कांहीच नव्हे असा

पंतांचा अभिप्राय आहे. यश हें उपमेय असून कामधेनूच्या दुधाचा ऊत हें उपमान आहे. वरील पद्यांत त्या उपमानाचा उपमेयाच्या तुलनेंत अधिक्षेप "लाजवि" या शब्दानें केला आहे. म्हणून येथें प्रतीप अलंकार झाला आहे.

## प्रतीपाचे प्रकार

उपमानाचा अधिक्षेप अनेक प्रकारें केला जाऊं शकेल. त्याचे कांहीं प्रकार असे—



**प्रकार १ ला**——उपमानाच्या ठिकाणी असलेल्या धर्मांची निष्पत्ति उपमेयानेच केली आहे. तेव्हा उपमानाचें अस्तित्व व्यर्थ आहे असें दाखविणें, हा प्रतीपाचा पहिला प्रकार होय.

उदा.

हे लावण्यवती ! मुखीं तव शशी, ओष्ठीं सुधा संचली,
शोभे कौस्तुभमालिकेसम अशी ही शुभ्रदंतावली,
कांतीने कमला, सुनर्तनपदीं ऐरावताची गती,
श्वासाचा मधुगंध मंद ठरवी त्या पारिजाताप्रती, ॥
चित्ताची पुरवी लळे तव गिरा ही कामधेनू दिसे,
नेत्रांच्या लहरींत जें विष भरे हालाहलीं तें नसे,
भूलोकीं असतां तुझ्यासम अशी रत्नप्रभा सुंदर,
भोळे देव खुळे ! उगाच दमले मंथूनिया सागर !

——वा. पु. दामले.

येथे लावण्यवती ‘ स्त्री ’ हें उपमेय असून शशी, सुधा, कौस्तुभ, कमला वगैरे अनेक उपमानें आहेत. अनेक उपमानांच्या ठिकाणीं असणारे धर्म एका उपमेयाच्या ठिकाणी निष्पन्न झालेले वर्णिले आहेत व त्यामुळे उपमानांचें व्यर्थत्व दर्शविलें आहे. म्हणून येथे प्रतीप अलंकार झाला.

**प्रकार २ रा** – उपमानाशीं उपमेयाची तुलना होत असते. त्यांत उपमान हें तुलनेचें प्रमाण (Standard of Comparison) मानलेलें असतें. हा सामान्य क्रम उलटा करणें. उदा. तुझ्या मुखासारखा चंद्र आणि नेत्रांसारखीं कमलपत्रें आहेत. अलंकाराचें प्रतीप हें नांव यावरूनच पडलें आहे. हा दुसरा प्रकार. उदा.

तव नेत्रापरि दिसें कमल, तें मग्न होइ पाण्यांत ।
तव मुखकांती धरी शशी तो दडला मेघाआंत ॥
तव गतिचा अनुकार करी राजहंस तोही गेला ।
तव सादृश्यीं चित्त रमविणें, हें न पटे दैवाला ॥ — भाषांतर.

येथे उपमानोपमेयांचा क्रम उलटा झाला आहे. 'नेत्रापरि कमल दिसे,' 'तुझी मुखकांती चंद्र धरतो,' 'राजहंस तुझ्या गतीचें अनुकरण करतो "— अशा प्रकारें उपमानोपमेय भावाचा सामान्य क्रम उलटा झाला असून उपमानातील सौंदर्य मूळचें उपमेयाचें आहे असा ध्वनि त्यांतून द्योतित करून उपमानाचा अधिक्षेप केला आहे, म्हणून प्रतीप अलंकार झाला.

**प्रकार ३ रा**—उपमेयाची बरोबरी करण्याला उपमानाला फार कष्ट पडत आहेत किंवा त्यावर काही संस्कार होणें अवश्य आहेत असें दाखविणें. या प्रकाराचें यथार्थातिशयोक्तीशी निकट साम्य आहे.

उदा

कां सखि मुग्धपणें तूं वदसी मम तनु सुवर्णवर्ण असे ।
तें जरि पडे हुताशीं तरिच हताशे ! तवांगकांति दिसे ॥
—अलंकारचंद्रिका.

नायिकेची समजुत अशी की आपली अंगकांति सुवर्णासारखी आहे. त्यावर तिची सखी म्हणते की " तूं वेडी ( मुग्ध ) आहेस. तुझ्या कांतीची सुवर्ण कधीहि बरोबरी करणार नाही. सोने तापविलें तरच तें तुझ्या वर्णाची कांही तरी बरोबरी करील तर करील. एरवी नाही " उपमान मूळचें हीन आहे, तें उपमेयाबरोबर यावयास त्यांवर संस्कार करणें अवश्य आहे, असें दाखवून उपमानाची हीनता सूचित केली म्हणून प्रतीप अलंकार झाला

**प्रकार ४ था**—उपमान हें एखाद्या गुणाचें आदर्श प्रमाण आहे. पण त्या धर्मांत त्याची बरोबरी करण्याला उपमेयहि समर्थ आहे असें दाखविणें.

उदा.—

"क्रौर्यांत आपली बरोबरी कोणी करणार नाही असा मृत्यूला आजवर गर्व झाला होता. पण जालियनवाला येथील प्रकार पाहिल्यावर आता त्याला तसें वाटणार नाही."

येथें 'मृत्यु' हें उपमान व जालियनवाला बागेतील कत्तल घडवून आणणारे ब्रिटिश ऑफिसर हें उपमेय होय. क्रौर्यांत मृत्यूची बरोबरी कोणी करीत नाही. पण त्याच्या बरोबरीचेंच हें उपमेय आहे असें दाखवून उपमानाचा अधिक्षेप केला आहे. म्हणून प्रतीप अलंकार झाला.

**प्रकार ५ वा:**—उपमेयाला आपल्या धर्माचा गर्व झाला आहे असें दाखवून व त्याला उपमानत्व देऊन त्याला अमुक अमुक सहजसुलभ हलक्या वस्तु सदृश आहेत असें दाखविणें.

**मनोहर**—प्रभाकर, बस कर बोलणें आता. मघांचे गुलाब, कमळें सारीं कोमेजलीं वाटतें! आता बोलतां बोलता मघांच्यासारखीं पुन्हा तिचीं आर्जवें करायला लागशील.

**प्रभाकर**—चार पैशांचा फुलांचा पुडा आणला तर त्यांत बावन गुलाब व छप्पन कमळें येतात. अरे, मानली तर सारी बागशाही नाही तर कोण्या झाडाचा पाला!

—गडकरी, भावबंधन, अं. १ प्र. २

मनोहर व प्रभाकर यांचें लतिकेसंबंधीं संभाषण सुरू असतें. प्रभाकराने लतिकेच्या सौंदर्यास पूर्वीच्या भाषणांत फुलांची उपमा दिलेली असते. आता प्रभाकर म्हणतो की तिने सौंदर्याचा गर्व करावयास नको कारण तिच्यासारखीं हवीं तितकीं गुलाबपुष्पें व कमळें स्वस्तांत मिळूं शकतात. गुलाबपुष्पें व कमलें हीं खरोखर उपमानें, पण त्यांना असें हलकें कल्पिल्यामुळे येथे प्रतीप अलंकार झाला.

## (१८) सहोक्ति

तुल्ययोगितेंत प्रकृताप्रकृतांचा धर्म एकदाच सांगून कवि औपम्य निर्माण करीत असतो. "विरहावस्थेंत तिचे निःश्वास आणि दिवस दीर्घ होऊं लागले." येथे तुल्ययोगिता आहे. दीर्घ होणें हा धर्म निश्वास आणि दिवस यांना लागतो. तो एकदाच सांगितलेला आहे; पण प्रत्येकाच्या बाबतींत

स्वतंत्रपणें संबंधित आहे. पण हाच अर्थ ' सह ' या अर्थाच्या शब्दाने व्यक्त केला म्हणजे सहोक्ति अलंकार होतो. ' दिवसरात्रींच्या बरोबर तिचे श्वासहि दीर्घ होऊं लागले ' ही सहोक्ति झाली.

तुल्ययोगितेपैकी प्रकृतांची तुल्ययोगिता या प्रकाराशीं सहोक्तीचें अधिक साम्य आहे. फरक एवढाच की तुल्ययोगितेंतील धर्म सर्व प्रकृताशी स्वतंत्रपणें संबंधित असतो तर सहोक्तींत तो सहार्थाने संबंधित होतो. कित्येकदा सहोक्तीमधील धर्म एका प्रकृताशी एका अर्थाने तर दुसऱ्या प्रकृताशी दुसऱ्या अर्थाने संबंधित असतो. अशा वेळीं तिच्यामध्ये अतिशयोक्तीची छटा असते. उदा. ' याचकाबरोबर त्या राजाची कीर्तीहि दिगंतीं गेली '. येथे दिगंतीं जाणें हा धर्म याचक व कीर्ति यांच्याशी वेगळ्या अर्थाने संबंधित आहे.

सहोक्तींत अवश्य गोष्टी अशा—

१. सहोक्तीचा हेतु औपम्य सुचविण्याचा असतो.

२. सहोक्तीमध्ये धर्म एका प्रकृताशी संबंधित असतो व सहार्थाच्या द्वारें दुसऱ्या प्रकृताशी संबंधित असतो.

३. सह या शब्दाप्रमाणेच सहार्थक इतर शब्दांचाहि प्रयोग होऊं शकतो. उदा. समें, स, सहित इ.

४. सहोक्तींतील औपम्य आतिशयमूलक असलें तर सहोक्तींत अधिक वैचित्र्य येतें. उदा. प्रीतीबरोबर रात्रीहि वाढाव्या असें वाटतें. येथे प्रीतीचें व रात्रीचें वाढणें वेगवेगळ्या अर्थानी आहे.

५. सहोक्तीमधील सर्व धर्मी प्रकृत असतात.

६. मालासहोक्तीहि असू शकते.

म्हणून सहोक्तीची व्याख्या अशी—

**जेथे ' सह ' किंवा तद्वाचक शब्दांच्या योगें एकच पद दोघांचें वाचक होतें ( व त्यामुळे रमणीय औपम्य प्रतीत होतें ) तेव्हा सहोक्ति अलंकार होतो.**

उदाहरणें—

(१) इ. स. १८०० मध्ये नाना फडणिसांसह पेशवाईतील शहाण-पणहि लयास गेलें!

वरील वाक्यांत नाना फडणीस व पेशवाईतील शहाणपण या दोन प्रकृत गोष्टींचा 'लयास जाणें' हा धर्म एकदाच सांगितला आहे. दोन प्रकृतांचा संबंध 'सह' या शब्दाने जोडला आहे. म्हणून येथे 'सहोक्ति' अलंकार झाला.

निव्वळ 'सह' शब्दाच्या उपयोगाने सहोक्ति होत नाही, 'सहोक्ति' होण्यास काव्यमय वर्णन असावें लागतें. 'मी मित्रासह सिनेमाला गेलों' या वाक्यांत कोणताच अलंकार नाही.

(२) बाळपणचें चापल्य जाय गाढें
वयासंगें मुग्धत्व तेहि वाढे

—लेंभे.

येथे वयाबरोबर मुग्धत्व वाढलें असें काव्यमय वर्णन आहे. येथे 'सह' शब्द नसला तरी 'संगें' हा तद्वाचक शब्द योजलेला आहे, म्हणून येथे सहोक्ति अलंकार झाला.

(३) साताश्रु शिर वृषाचें प्रथम क्षोणीतळीं गळालें हो।
मग सकुसुमवृष्टि तनु, सधर्मभय शत्रुबळ पळालें हो॥

—मोरोपंत, कर्णपर्व.

अर्जुनाने कर्णवध केला त्या प्रसंगीचें मोठें बहारदार वर्णन पंतांनी प्रस्तुत आर्येत केलें आहे.

अर्थ:—कर्णाचें मस्तक आप्तजनांच्या अश्रूंसह प्रथम जमिनीवर गळालें, नंतर कर्णाचें धड (आकाशांतून होणाऱ्या) पुष्पवृष्टीसह पडलें, आणि धर्मराजाच्या मनांतील भीतिसह शत्रुसैन्य पळालें.

## (१४) विनोक्ति

सहोक्तीच्याच अनुषंगाने आलंकारिकांनी विनोक्ति हाहि अलंकार मानला आहे. सहोक्तीमध्ये 'सहार्थ' वाचकामुळे रमणीयत्व निर्माण केलें असतें, तर विनोक्तीमध्ये तें 'विना'या शब्दामुळे होतें. सहोक्तीचें मूळ साहचर्यांत आहे तर विनोक्तीचें मूळ वियोगांत आहे.

एका वस्तूशिवाय दुसरी वस्तु शोभते किंवा शोभत नाही असें वर्णन जेथे असते तेथे विनोक्ति अलंकार होतो. पण सहोक्तींत जसें स्वतंत्रपणें रमणीयत्व येतें तसें विनोक्तींत तें प्रतीत होत नाही ही गोष्ट स्पष्ट आहे. सहोक्तीचें कार्य गम्य औपम्य निर्माण करणें हें आहे. त्यामुळे तिच्यांत स्वतंत्र वैचित्र्य आहे. विनोक्तींत असें कांहीच नसल्याने तिच्यांत स्वतंत्रपणें वैचित्र्य आढळत नाही. केवळ विना शब्दामुळेच अलंकार मानावयाचा झाला तर मग हा! धिक्! इत्यादिकांमुळेहि अलंकार मानण्याचा प्रसंग येईल. विनोक्ति इतर अलंकारांच्या जोडीने आली तरच तींत वैचित्र्य येतें. म्हणून स्वतंत्रपणें विनोक्तीला अलंकार मानणें समर्थनीय नाही, असें काही आलंकारिकांचें मत आहे व तें बरोबरहि आहे.

विनोक्तीचें लक्षण असें—**एखाद्या वस्तूमुळे दुसरी वस्तु शोभते किंवा शोभत नाही असें वर्णन असतें तेथे विनोक्ति अलंकार होतो—**

उदा.—

(१) पंकावाचुनि शोभे जलमय सर, दुर्जनाविना सुसभा,
कटु वर्णाविण काव्यहि, विषयाविण साधुचित्त घे शोभा

—गंगाधरशास्त्री मंगरूळकर.

वरील पद्यांत पंकावाचून सरोवर शोभतें, दुर्जनाविना सभा शोभते, कटुवर्णांवाचून काव्य शोभतें आणि विषयवासनेवाचून साधुचित्त शोभतें अशीं विनोक्तीचीं चार उदाहरणें आहेत.

(२) शौर्याने असला धनंजय कुणी वा तत्सखा केतवें,
औदार्यें अथवा धनंजयरिपू, लंकेश या वैभवें,
ज्ञानें व्यास, तपोबलावर जरी ब्रह्मर्षि झाला तरी,
स्त्रीप्रेमाविण जन्म नीरस उणा काडीवजा भूवरी.

—माधव ज्यूलियन, 'विरहतरंग'

स्त्रीप्रेमाविना जन्म नीरस, उणा, काडीवजा ठरतो, म्हणजेच तो शोभत नाही असा भाव यांतून निघतो. विनोक्तींत 'विना' शब्दाचा उपयोग सामान्यतः केलेला आढळतो, पण तो नसला तरी 'विनोक्ति' संभवते.

(३) तृष्णेवाचुनि पाणी नाही, क्षुधेवाचुनी अन्न,
ऊष्म्यावाचुन चंदन नाही उपयोगार्ह ! कदा न.

—रे. टिळक, 'वनवासी फूल'

वरील उदाहरणात विनोक्तीचीं तीन उदाहरणें आहेत.

(४) असो वरि कसा तरी, विमल भाव ज्याचा, करा
तयावरि दया; पचे वर, असाचि द्या चाकरा।
वृथाचि गमतें दिलें, बहुहि, जें न दासा जिरें;
पुसोनि अधिकार द्या; सुकर ते सदा साजिरे॥

—मोरोपंत, केकावलि.

या केकेंतील तृतीय चरणांत विनोक्ति अलंकार आहे. जें भक्ताला पचत नाही तें व्यर्थ दिलें, म्हणजे पचण्याचा गुण असल्याविना दान शोभत नाही असा भाव. 'विना' शब्दाचा उपयोग येथे प्रत्यक्ष नसला तरी विनोक्ति अलंकार आहे.

**व्यतिरेक, प्रतीप, सहोक्ति, विनोक्ति या अलंकारांचीं अभ्यासार्थ उदाहरणें:—**

(१) तूं मावलीहून, मायाळ, चंद्राहून शीतळ ।
पाणियाहूनि पातळ, कल्लोळ प्रेमाचा ॥
देऊं कशाची उपमा, दुजी तुज पुरुषोत्तमा ।
ओवाळूनी नामा, तुझ्या वरुनि टाकिलों ॥

—तुकाराम

(२) दहनकिरणीं जी तापुनिया राही,
अन्नपूर्णा जीसमा दुजी नाही,
जलद वर्षे भोलावली धरा ही
तिच्यासंगें युवतिचीं मानसें ही

—डॉ. वि. भि. कोलते, 'पेरणी'

(३) स्वामी तिन्ही जगांचा । आईविना भिकारी ॥

——यशवंत

(४) नाही ज्ञान जयाचें सगोग-बंधू चतुष्पद गणावे ।
सुत तेजी–तुरगींचे नळसम सुंदर कदापि न म्हणावे ॥

—रघुनाथ पंडित

(५) हरवी बाळाकरवीं त्या पांचांचींहि कीर्तिसह वासें, ।
बुडत्येच सदहितांच्या बहु थोरांचीहि कीर्ति सहवासें ॥

—मोरोपंत, विराटपर्व.

(६) मोत्यावाचून शिंपल्यास शोभा नाही, रामनामाशिवाय भजनास शोभा नाही, आणि वृक्षावाचून पर्वत विराजत नाही.

## (२०) श्लेष

श्लेष म्हणजे काय आणि श्लिष्ट शब्दाचें स्वरूप कसें आहे याचें वर्णन मागे श्लेष या शब्दालंकारांत येऊन गेलेंच आहे. अर्थश्लेष हा वेगळा अलंकार कां मानावा लागतो हेंहि त्या ठिकाणीं सांगितलें. आता या अर्थ-श्लेषाचें स्वरूप पाहूं

ज्या ठिकाणी शब्दांमुळे अनेकार्थता येते तेथे श्लेष अलंकार होतो. मात्र अर्थश्लेष त्याच ठिकाणी संभवतो की जेथे शब्दपरिवृत्ति होऊं शकते. म्हणून ज्या वर्णनांत एका शब्दाचे अनेक अर्थ होतात असें भासतें त्याच-बरोबर अशा शब्दाच्या जागी दुसरा पर्याय शब्द घातला तरीहि अर्थ बदलत नाही, अशा ठिकाणीच **अर्थश्लेष** हा अलंकार होतो.

अर्थश्लेषाचें हें स्वरूप झालें. पण अलंकारपरंपरेंत श्लेषाचें निश्चित स्थान कोणतें हें येथे सांगितलें पाहिजे.

**श्लेष आणि अभिधामूल व्यंजना**--अभिधामूल व्यंजनेचें विवेचन मागे आलें आहे. तेथेहि श्लेषासारखाच प्रकार आहे. प्रकृत अर्थ वाचीत असतां तेथे अप्रकृत अर्थ डोळ्यापुढे उभा राहतो. त्यांपैकी प्रकृत अर्थ वाच्य असतो तर अप्रकृत अर्थ व्यङ्ग्य असतो. पण श्लेषामध्ये दिसणारे दोन्हीहि अर्थ प्रकृत असतात. म्हणून ते दोन्हीहि अर्थ वाच्य असतात. व्यंग्य आणि वाच्य असा त्यांत भेद नसतो.

श्लेष हा शब्दालंकार आणि श्लेष हा अर्थालंकार यांच्यामधील भेदहि ओळखला पाहिजे. शब्दालंकारांत शब्द बदलतां येत नाही. जर शब्द बदलला तर अलंकारच नाहीसा होतो. अर्थालंकारांत एक शब्द काढून त्या जागीं समानार्थक शब्द घातला तरी अलंकार कायम राहतो. शब्दालंकार आणि अर्थालंकार यांच्यांतील हा भेद श्लेषालाहि लागू पडतो. **जेव्हा शब्द बद-लतांच वाक्यांतील श्लेष निघून जातो तेव्हा तो शब्दश्लेष होय.**

**जेव्हा समानार्थक पर्याय घालूनहि श्लेष कायम राहतो तेव्हा तो अर्थश्लेष होय.**

श्लेषाकरिता आवश्यक गोष्टी अशा —

१. श्लेषामध्ये वाक्यांत दोन वस्तूंचें वर्णन असतें.

२. त्या दोन्हीहि वस्तु प्रकृत असतात.

३. ते दोन्हीहि अर्थ वाच्य असतात, म्हणून तो अभिधामूळ व्यंजनेहून वेगळा होय.

४. श्लेषांत विशेषणें आणि विशेष्यें दोन्हींहि श्लिष्ट असतात.

५. अर्थश्लेषांतील शब्द परिवृत्ति म्हणजे बदल सहन करणारे असावेत. म्ह. समानार्थक शब्द घातला तरी श्लेष कायम राहिला पाहिजे.

म्हणून श्लेषाची व्याख्या अशी—

**भिन्न अर्थांचे दोन वाचक शब्द एकदम उच्चारण्याच्या प्रयत्नांत त्या शब्दांच्या भिन्नत्वाचा लोप होऊन ते एकच वाटतात व त्या एकच वाटणाऱ्या शब्दाचे ते अनेक अर्थ आहेत असा भास होतो अशा विधानांत—ते शब्द परिवृत्ति सहन करीत असतील तर—अर्थश्लेष अलंकार होतो.**

उदाहरणें—

( १ ) लेखी परीक्षा सुरू असताना परीक्षागृहांतील एक टवाळ विद्यार्थी मागे वळून पाहत होता व मागे बसलेल्या विद्यार्थ्याची कॉपी करण्याचा प्रयत्न करीत होता ही गोष्ट नजरेस येऊन निरीक्षकांनी त्या विद्यार्थ्यास दटावलें, तेव्हा तो उत्तरला " सर, ' मागे पाहा ' असें प्रश्नपत्रिकेच्या खाली छापलें आहे. तेव्हा मागे पाहण्यास मला परवानगी आहे असें मी समजतों!"

वरील उदाहरणांत प्रश्नपत्रिकेंत छापलेल्या ' मागे पाहा ' मधील मागे शब्दाचा ' प्रश्नपत्रिकेच्या मागील बाजूसहि प्रश्न छापले असल्यामुळे मागील बाजू पाहा ' असा अर्थ अभिप्रेत आहे. परतु त्या विद्यार्थ्याने त्याच शब्दांतून ' आपण ज्या जागीं बसलों आहों त्या जागेच्या मागील बाजूस पाहणें ' असा अर्थ बुद्धिपुरःसर घेतला. या उदाहरणांत ' मागे ' शब्दाचे दोन वाच्य अर्थ संभवले. ' माग ' ऐवजी ' पाठीमागे ' ' दुसरीकडे ' असे पर्यायशब्द घातले तरी दोन वाच्य अर्थ त्यांतून निष्पन्न होतात व दोन्ही प्रकारें वाक्याला अर्थ लावतां येतो. म्हणून हें अर्थश्लेषाचें उदाहरण झालें.

(२) तूं मलिन, कुटिल, नीरस, जडहि, पुनर्भवपणेंहि कचसाच ।
धरिला शिरींहि न स्वप्रकृतिगुण त्यजिसि, नाम कच साच ॥
—मोरोपंत, आदिपर्व.

या आर्यैत ' कच ' शब्दाचे (१) बृहस्पतीचा मुलगा व (२) केस— असे दोन अर्थ अभिप्रेत आहेत. या आर्यैत देवयानीने कचाला उद्देशून केलेलें भाषण आहे, व तें भाषण केसालाहि कसें लागू पडतें हें पुढील स्पष्टी-करणावरून दिसून येईल. कंसांत दिलेले अर्थ केसाला लागू पडतात.

" तूं पातकी (काळा), वाकड्या मार्गाने जाणारा (कुरळा), अरसिक (शुष्क), मूर्ख (अचेतन) व पुन्हा पुन्हा जिवंत होणारा (पुन्हा पुन्हा वाढणारा) असा आहेस. या गुणांमुळे तूं केसासारखा आहेस. तुझा मानसन्मान केला (तुला डोक्यावर धारण केलें) तरी तूं आपला मूळ स्वभाव सोडीत नाहीस. तुझें नांव कच आहे, तें खरोखर योग्य आहे."

या आर्यैतील मलिन, कुटिल, नीरस, जड, पुनर्भव व धरिला शिरीं, हीं सर्व विशेषणें श्लिष्ट आहेत. त्यांबद्दल दुसरे समानार्थक शब्द योजल्याने श्लेषाला हानि होत नाही; म्हणून हा ' अर्थश्लेष ' होय.

## (३१) समासोक्ति

श्लेषाप्रमाणेच समासोक्ति हाहि शब्दगत सादृश्यावर आधारलेला अलंकार आहे. या अलंकारांत कवि विशिष्ट शब्दयोजनेच्या द्वारें प्रकृत आणि अप्रकृत या दोघांच्या व्यवहारानें एकदमच वर्णन करतो. ( समासोक्ति = समासेन, संक्षेपेण उक्तिः । )

समासोक्तीमध्ये अप्रकृत व्यवहाराचा प्रकृतावर एका प्रकारें आरोप असतो. रूपकामध्ये अप्रकृत वस्तूच्या रूपाचा प्रकृतावर आरोप असतो, तर समासोक्तींत प्रकृताच्या व्यवहारावर अप्रकृताच्या व्यवहाराचा आरोप असतो. " अनुरागे कसा चंद्र पहा पूर्वेस चुंबितो. " येथे चंद्रोदयाचें कसें वर्णन केलें आहे तें पाहा. पूर्व दिशेला नुकनाच चंद्र उगवला म्हणजे तो किंचित् लालवट असतो. कवि हें चंद्रोदयाचें वर्णन करीत आहे व अनुराग, व चुंबितो हे शब्द वापरून या चंद्रोदयाच्या घटनेवर नायक–नायिकेच्या प्रेम-व्यवहाराचा आरोप करीत आहे.

हें सर्व करीत असतांना कवीला दोन गोष्टी सांभाळाव्या लागतात. शब्दांचें लिंग आणि वाक्यांतील विशेषणें, क्रियापदें वगैरे निश्चित प्रकारची वापरावीं लागतात तीं अशा तऱ्हेचीं की त्या घटनेचें त्या शब्दांनी केलेलें वर्णन वाचीत असतां अप्रकृताचा व्यवहार सरळ सूचित व्हावा. म्हणून **समासोक्तींत गम्य औपम्य असतें.**

**समासोक्ति आणि अर्थश्लेष**—समासोक्तीमध्ये अर्थश्लेषाप्रमाणे विशेषणें श्लिष्ट असतात. पण मुख्य भेद असा आहे की श्लेषांत विशेष्य व विशेषणें दोन्हीहि श्लिष्ट असतात, तर समासोक्तींत फक्त विशेषणेंच श्लिष्ट असतात. विशेष्य श्लिष्ट असत नाहीं. वरील उदाहरणांत ' अनुरक्त ' आणि ' चुंबितो ' हीं पदें श्लिष्ट आहेत. पण ' चंद्र ' आणि ' पूर्वा ' हीं पदें मात्र श्लिष्ट नाहीत.

**समासोक्ति आणि एकदेशविवर्ति रूपक**—एकदेशविवर्ति रूपकांतहि कांही प्रकृतावरील आरोप व्यंग्य असतो म्हणून तेवढ्या भागांत ते समासोक्तीसारखें वाटतें; पण या दोहोंत फरक आहे. एकदेशविवर्ति रूपकांत प्रत्येक अंगावर आरोप नसला तरी मुख्य रूपकांतील आरोप वाच्य असतो व इतर अंगांवरील आरोप गम्य असतो. समासोक्तींत वाच्य आरोप मुळींच नसतो. सर्वच व्यवहारारोप गम्य असतो. शिवाय एका वाच्य आरोपामुळे इतर व्यंग्य आरोप सुचणें यांत एकदेशविवर्ति रूपकाचें सौंदर्य साठविलेलें असतें; तर प्रकृत व्यवहारावरून अप्रकृताच्या व्यवहार संपूर्ण प्रतीत होणें यांत समासोक्तीचें सौंदर्य असतें.

समासोक्ति अलंकाराचे विशेष असे—

१. समासोक्तींत प्रकृताच्या व्यवहाराचें वर्णन केलेलें असतें.

२. तें अशा शब्दांनी केलेलें असतें की त्यामुळे एकदम अप्रकृताच्या व्यवहाराचा बोध होतो.

३. अप्रकृत व्यवहाराचा हा बोध प्रकृत वर्णनांतील लिंगसाम्य व विशेषणसाम्यामुळे होतो.

४. समासोक्तींतील विशेषणें श्लिष्ट म्हणजे प्रकृतास आणि अप्रकृतास लागतात पण विशेष्यें श्लिष्ट नसतात.

५. समासोक्तींतील औपम्य गम्य असतें.

म्हणून समासोक्तीची व्याख्या अशी—

**जेथे प्रकृताच्या व्यवहाराचें वर्णन केलेलें असतें, मात्र त्या वर्णनांतील विशेषणें प्रकृत आणि अप्रकृत व्यवहारांना साधारण असल्याने जेथे प्रकृत व्यवहारावरून अप्रकृताच्या व्यवहाराचाहि बोध होतो तेथे समासोक्ति अलंकार होतो.**

उदाहरणें —

( १ ) कवळुनि करजालें भूमिलागूनि, लाल
विलसित रुचि भासे फेकितां तूं गुलाल
विकसिततरुमालाकेशपंक्तींत तीचे,
स्तवुनि फिरुनि तूंतें वन्दितों मी मरीचे !

—केशवसुत, ' उगवत असलेल्या सूर्यास '

या श्लोकांत उगवत्या सूर्याच्या किरणांमुळे जमिनीवर व वृक्षांवर लाली पसरली हें प्रकृत वर्णन आहे. हें वर्णन वाचीत असतां ' करजालें कवळुनि ', ' लाल गुलाल फेकितां ', ' केशपंक्तींत ' या शब्दांनी नायक नायिकाचा प्रेमव्यवहार या अप्रस्तुत विषयाचाहि बोध होतो. हा अप्रस्तुत विषय प्रत्यक्ष वर्णिला नसून प्रस्तुताच्या विवेचनांतून सूचित झालेला आहे. म्हणून येथे ' समासोक्ति ' अलंकार झाला.

( २ ) करितां विलाप शल्या ! व्याकुळ होसील कंठ वाळेल ।
असती तव उक्ति, हिला धर्मात्मा कर्ण हा न भाळेल ॥

—मोरोपंत, कर्णपर्व.

येथे शल्याच्या उक्तीबद्दलचें विवेचन हें प्रस्तुत आहे. परंतु ' असती ' या विशेषणाच्या ' खोटी ' या अर्थाबरोबरच ' कुलटा ' ' जारिणी ' हा अर्थहि मनांत येतो. शिवाय ' हिला न भाळेल ' या शब्दांतून जो दुसरा अर्थ सुचविला जातो त्यामुळे तर स्त्रीविषयक अप्रस्तुत विवेचन मनांत अधिकच ठसतें. अशा प्रकारें श्लिष्ट शब्दाचा आधार न घेतां ' उक्ति- ' बद्दलच्या प्रस्तुत विषयांतून ' स्त्री ' बद्दलच्या अप्रस्तुत विषयाचा बोध झाला, म्हणून येथे ' समासोक्ति ' अलंकार झाला.

# ( २८ ) परिकर

परिकर याचा अर्थ 'साह्यकारी.' वाक्यामध्यें आपण विशेषणें वापरतों. तीं विशेषणें अर्थाला साह्यकारी असलीं पाहिजेत. नाहीतर तीं निष्कारण वापरल्यासारखीं दिसतील. जेव्हा एखाद्या किंवा अनेक विशेषणांनी वाक्यार्थाची शोभा वाढते तेव्हा तीं विशेषणे वाक्यार्थाच्या सौंदर्याला पोषक होतात. अर्थात् हीं विशेषणे वापरण्यांत कवीचा हेतु असतो म्हणून सहेतुक किंवा साभिप्राय विशेषणें वापरून कवि जेव्हा सौंदर्य निर्माण करतो तव्हा परिकर अलंकार होतो.

येथे एक प्रश्न निर्माण होतो. केवळ साभिप्राय विशेषणें वापरल्याने अलंकार कसा निर्माण होईल ? उलट कोणताहि शब्द साभिप्राय वापरणें हें मुळी कवीचें कर्तव्यच आहे. कांही कारण नसताना कवि नुसतीं विशेषणें लादत गेला तर तो दोष होईल. असा दोष होऊं नये म्हणून कवीने कोणताहि शब्द सहेतुक वापरलाच पाहिजे म्हणून सहेतुक विशेषणें वापरण्यांत कवि-केवळ काव्यदोष टाळतो व दोष टाळणें म्हणजे अलंकारनिर्मिति नव्हे, म्हणून केवळ साभिप्राय विशेषण वापरल्याने अलंकार निर्माण होत नाही. यावर मम्मटादिकांचें असें म्हणणें आहे की विशेषण साभिप्राय वापरणें म्हणजे दोष टाळणें ही गोष्ट खरी असली तरीहि, जेव्हा कवि अशीं अनेक साभिप्राय विशेषणें एकाच विशेष्याबद्दल वापरतो तेव्हा वैचित्र्य निर्माण होतेंच, म्हणून तेथे अलंकार होतो. अर्थात् मम्मटाच्या मतें विशेषणें सहेतुक तर असलीं पाहिजेतच पण तीं एकाहून अधिकहि असलीं पाहिजेत.

पण जगन्नाथाचें म्हणणें असें आहे की केवळ एका साभिप्राय विशेषणानेहि परिकर होऊं शकतो. अनेक विशेषणांचीच त्याला गरज आहे असें नाही. अनेक साभिप्राय विशेषणांनी शोभा अधिक वाढेल. पण अलंकार-निर्मितीकरता विशेषणांचें अनेकत्व आवश्यकच आहे असें नाही. एकच विशेषण वाक्यार्थांत विशेष सौंदर्य ओतूं शकतें. या विशेषणांतील अभिप्राय

प्रतीत झाला म्हणजे वाच्यार्थाची शोभा वाढते. विशेषणांतील अभिप्राय प्रतीत होणें ही व्यंजनेची क्रिया आहे. म्हणून विशेषण जेव्हा प्रतीयमान अर्थाने वाच्यार्थाला पुष्ट करतें तेव्हा परिकर होतो. मग तें विशेषण एक असो की तीं अनेक असोत. जगन्नाथाने हें एका सुंदर उदाहरणाने पटवून दिलें आहे. मूळच्या संस्कृत उदाहरणाचें भाषांतर असें—

'हें लावण्य जलाशय ! तुजविण त्या हंत ! मीननयनेची
कैसी दशा असे—परि तुज सांगुन गोष्ट काय कामाची ?'

विरहिणी नायिकेची सखी नायकाकडे जाऊन म्हणते—"हे लावण्याच्या सरोवरा ! त्या मीननयनेची तुझ्यावाचून कशी दशा झाली तें पाहा.—पण तुला हें सांगून काय उपयोग ?" येथे कवीने नायकाला 'लावण्यसरोवर' व नायिकेला "मीननयना" असें एकेकच विशेषण लावलें. पण तेवढ्यानेच पाण्यावाचून मासळी तडफडावी तशी ती तुझ्यावाचून तडफडते एवढा अभिप्राय कवीने प्रकट केला आहे व मूळ वाच्यार्थाला उजळा आणला आहे.

परिकराला आवश्यक गोष्टी अशा—

१. परिकर म्हणजे विशेषणाने व्यंग्यद्वारें वाच्यार्थाला पुष्ट करणें.
२. परिकरांतील विशेषणें साभिप्राय असतात.
३. परिकराला अधिक विशेषणें अवश्य आहेतच असें नाही. विशेषण साभिप्राय असेल तर एका विशेषणानेसुद्धा परिकर होतो.
४. परिकरालंकारांतील विशेषण हें सौंदर्य वाढविणारें असलें पाहिजे याचा अर्थ असा—विशेषणाशिवाय सुद्धा वाक्यार्थ पूर्ण झाला पाहिजे. वाक्यार्थाकरिताच जर विशेषणाची गरज असली तर तेथे परिकरालंकार होत नाही.

परिकराची व्याख्या—

**प्रकृत अर्थाचें सौंदर्य वाढविणाऱ्या एक किंवा अनेक साभिप्राय किंवा सहेतुक विशेषणांनी वाक्यार्थ पुष्ट होतो तेव्हा 'परिकर अलंकार होतो.**

उदाहरणें—

(१) जीचा तो सहकार गोड नुरवी वैगुण्य या जीवनीं
ऐशी ती सहधर्मिणी गुणखनी संसार-संजीवनी !—
—कीर्ति—श्री न मला मिळोत, अगदी देवा ! नसे हांव ती !
दावी प्रेम-सहिष्णुता-रसिकता देवी अशी दाव ती

—माधवज्यूलियन, विरहतरंग.

'जिचा सहकार जीवनीं वैगुण्य नुरवी' अशा स्त्रीचें वर्णन करताना 'सहधर्मिणी, गुणखनी, संसार-संजीवनी' हीं जीं त्या स्त्रीचीं विशेषणें योजलीं आहेत तीं साभिप्राय आहेत. म्हणून येथे 'परिकर' अलंकार जाणावा.

(२) रथचक्र उद्धरूं दे श्रुतिशास्त्रज्ञा, महारथा, कुलजा,
साधु न हाणिति अरिला पाहति अधृतायुध व्यथाकुल ज्या ॥

—मोरोपंत, कर्णपर्व.

या आर्येत 'श्रुतिशास्त्रज्ञा', 'महारथा', 'कुलजा' या तिन्ही खुबीदार विशेषणांनी अर्जुनाचें वर्णन केलें असून कर्णाच्या मनांतील भाव व्यक्त होण्यास त्या विशेषणांची मदत झाली आहे. म्हणून येथे 'परिकर' अलंकार झाला.

**श्लेष, समासोक्ति, परिकर यांचीं अभ्यासार्थ उदाहरणें:—**

(१) तेजस्वीही स्नेहें स्त्रीकरगत मलिनवदन मळ वीती,
तापविती ही, हें हरिजनगृहमणिदीप तत्त्व कळवीती ॥

—मोरोपंत, कृष्णविजय.

(२) ज्यांचीं पदें धरिति देव शिरे-ललामीं ॥
स्वाराज्य जो मिरवितो गजराज-गामी ॥
जी वज्रबाहु बहुलोचन कांति भारी ॥
हा पाहिजे तरि वरीं नळरूपधारी ॥

—रघुनाथपंडित, दमयंतीस्वयंवर.

(३) कर्णा ! उगा उगारे ! किति कत्थन ? हें न ऐकवे कानें !
त्यजिली, निर्मर्यादा असती वाणी तुझी, विवेकानें ॥

—मोरोपंत, कर्णपर्व.

(४) अनन्यगतिकां जनां निरखितांच सोपद्रवा ।
तुझेंचि करुणार्णवा ! मन धरी उमोप द्रवा ॥

—मोरोपंत, केकावली

## (२३) अप्रस्तुतप्रशंसा किंवा अन्योक्ति

प्रस्तुताचें वर्णन करीत असतांना विशिष्ट प्रकारचे शब्द वापरल्याने कवि अप्रस्तुताचा कसा बोध करून देतो हें आपण समासोक्तींत पाहिलें. पण कवि कित्येकदा अप्रस्तुताचें वर्णन करून प्रस्तुताचा व्यवहार सुचवतो. अशा ठिकाणीं अप्रस्तुतप्रशंसा होते. अन्योक्ति म्हणून आपण ज्या पद्यांचा निर्देश करतों तीं सर्व अप्रस्तुतप्रशंसेचींच उदाहरणें होत. अप्रस्तुत = अन्य; प्रशंसा = उक्ति. म्हणून अप्रस्तुतप्रशंसा म्हणजे अन्योक्तीच होय.

अप्रस्तुतप्रशंसेंत कवि अप्रस्तुताचें वर्णन करतो. पण तें वर्णन वस्तुतः त्याला अभिप्रेत नसतें. त्यावरून सदृश प्रस्तुताचा जो व्यवहार सूचित होतो तो त्याला मुख्यत्वाने अभिप्रेत असतो. या दृष्टीने प्रस्तुत आणि अप्रस्तुताच्या सादृश्यावर आधारलेली अप्रस्तुतप्रशंसा किंवा अन्योक्ति, ही समासोक्तीच्या अगदी उलट आहे. कारण समासोक्तींत अप्रस्तुताचा व्यवहार सूचित होतो, तर

अप्रस्तुतप्रशंसेंत प्रस्तुताचा व्यवहार सूचित होतो. इतकेंच नव्हे तर एखादें पद्य समासोक्ति आहे की अप्रस्तुनप्रशंसा आहे ही गोष्ट संदर्भाशिवाय ठरविणें कठिण होऊन बसतें.

उदाहरण—

मधुपा तव संनिध नव-पुष्पवती मालती सदा असते।
परि का भुजंगसक्ता कंटकयुक्ताचि केतकी रुचते॥

या भ्रमराच्या वर्णनांत नायकाचा व्यवहार सूचित होतो. आता या पद्यांत भ्रमर प्रकृत आहे असें मानल्यास ही समासोक्ति होईल; तर भ्रमर अप्रकृत आणि नायक प्रकृत आहे असें मानल्यास हीच अप्रस्तुतप्रशंसा होईल.

**अप्रस्तुतप्रशंसा आणि समासोक्ति**——यावरून अप्रस्तुतप्रशंसा व समासोक्ति यांच्या मधील भेद लक्षांत येईल. दोन्हीहि अलंकारांत व्यंग्य औपम्य असतें व हें औपम्य प्रकृत आणि अप्रकृत व्यवहारांमधील असतें. पण समासोक्तींत प्रकृत व्यवहाराचें वर्णन वाच्य असून अप्रकृत व्यवहाराचें वर्णन व्यंग्य असतें तर अप्रस्तुतप्रशंसेंत अप्रकृताचा व्यवहार वाच्य असून प्रकृताचा व्यवहार सूचित ( व्यंग्य ) असतो.

**अप्रस्तुतप्रशंसा आणि श्लेष**——पुष्कळदा अप्रस्तुतप्रशंसा श्लेषावर आधारलेली असते. पण दोहोंत फरक असा की, अप्रस्तुतप्रशंसेंत वाच्य अप्रस्तुत असतें आणि प्रस्तुत व्यंग्य असतें तर श्लेषांत दोन्हीहि अर्थ वाच्य म्हणजे प्रस्तुतच असतात. श्लेषांत प्रकृतअप्रकृत असा भेद नसतो.

अप्रस्तुतप्रशंसेला आवश्यक गोष्टी अशा——

१. अप्रस्तुतप्रशंसा म्हणजे अप्रस्तुताचें विधान. प्रशंसा = विधान किंवा उक्ति; स्तुति नव्हे.

२. अप्रस्तुतप्रशंसेंत अप्रस्तुताचें विधान असतें व त्यावरून प्रस्तुताच्या व्यवहाराचा सहजासहजी बोध होतो.

३. कोणती गोष्ट प्रस्तुत आहे हें संदर्भावरून ठरवावें लागतें.

४. प्रस्तुत व्यवहार सूचित करणें हा कवीचा मुख्य हेतु असल्याने वाच्यार्थ संभवनीय असलाच पाहिजे याकडे कवि लक्ष देत नाही. म्हणून तो झाडालाहि बोलावयास लावील किंवा वाघबकरीचाहि संवाद घडवून आणील.

५. सादृश्यावर आधारलेल्या अप्रस्तुतप्रशंसेत कित्येकदा श्लेषाचा आधार घेतलेला असतो.

६. मराठींतील अन्योक्ति हा प्रकार अप्रस्तुतप्रशंसेत अंतर्भूत होतो.

अप्रस्तुतप्रशंसेचें लक्षण असें—

**जेथे कवीला प्रस्तुत विषयाचें वर्णन अभिप्रेत असतें, मात्र तें वर्णन शब्दांनी न करतां कवि अप्रस्तुताचें शब्दांनी वर्णन करतो व त्यावरून प्रस्तुताच्या वर्णनाचा बोध करून देतो, तेथे अप्रस्तुत प्रशंसा हा अलंकार होतो.**

उदाहरण—

फळें मधुर खावया असति नित्य मेवे तसे।
हिरेजडित सुंदरीं कनकपंजरींही वसे॥
अहर्निश तथापि तो शुक मनांत दुःखें झुरे।
स्वतंत्र वनवृत्तिच्या घडिघडी सुखातें स्मरे॥

—कृष्णशास्त्री चिपळूणकर

पारतंत्र्यांतील पुष्कळ सुखापेक्षा स्वातंत्र्यामधील कष्टहि सुखकारक असतात, हें कवीला सांगावयाचें आहे. परंतु त्याने वरील श्लोकांत पोपटाचें वर्णन करून आपलें मनोगत सुचविलें आहे. या ठिकाणी ‘पारतंत्र्यांतील पुरुष’ हा प्रस्तुत असून ‘शुक’ हा अप्रस्तुत म्हणजे अन्य आहे. या अन्य-विषयक उक्तीमुळे तेथे ‘अन्योक्ति’ ऊर्फ ‘अप्रस्तुत–प्रशंसा’ हा अलंकार झाला.

## अप्रस्तुतप्रशंसेचे प्रकार

प्रस्तुत व अप्रस्तुत यांच्यामधील संबंधाचे मुख्य प्रकार असे— (१) प्रस्तुत व अप्रस्तुत यांच्यामध्ये सादृश्य--संबंध असूं शकेल किंवा त्यांच्यांत (२) कार्यकारण भाव असूं शकेल किंवा (३) सामान्य विशेषभाव असूं शकेल. कार्यकारण व सामान्य विशेष यांपैकी एक प्रकृत व एक अप्रकृत असूं शकेल. यावरून अप्रस्तुतप्रशंसेचे असे प्रकार होतील—




### (१) सादृश्य--संबंधावरील अप्रस्तुतप्रशंसेचें उदाहरण—

मेघांच्या गर्जनेने खवळुनि वरती सिंह पाही स्वभावें ।
काका ! त्वां भीति सारी त्यजुनि तरुवरी मांस-खंडास खावें
जो उन्मत्तां गजांच्या खरतर नखरीं फोडुनी मस्तकातें ।
घाला रक्ता पिऊनी, नच मृत पशुच्या इच्छितो तो कणातें ॥

—कृष्णशास्त्री चिपळूणकर, 'अन्योक्तिकलाप'.

'पराक्रमी पुरुषाची वृत्ति' ही प्रस्तुत गोष्ट असतांना तिची कल्पना सिंहाच्या वर्तनावरून म्हणजे अप्रस्तुत गोष्टीवरून सुचविली आहे.

(२) कार्य प्रस्तुत असतां कारणाचें वर्णनः--

" जायाचें ठरलेंच ना प्रियकरा ! जाणार, कां ही त्वरा
थांबावें दिन दोन तेवढिच की लाभे मला संगती ।
संसारीं जलयंत्रनष्टजलवत् या भंगुरीं जीवनीं
जाणे कोण तुझ्या सवें कधितरी होईल मत्संगम ॥

—भाषांतर.

कांही मित्रांचें प्रवासास जाण्याचें ठरलें. पण वेळेवर त्यांच्यांतील एक बारगळला. " अरे, तूं प्रवासाचा विचार रहित केलास का ?" असें इतरांनी विचारल्यावर " होय, मी रहित केला " असें सरळ न सांगतां तो वरील प्रमाणे रहित करण्याचें कारण काय झालें हें सांगतो. तें असें —त्याची प्रवासाची तयारी पाहून त्याची पत्नी म्हणते—" आपलें जायचें ठरलेंच आहे तर जाणारच. पण एवढी घाई का ? आपण दोन दिवस थांबा. तेवढाच माझा वेळ आपल्या संगतींत जाईल. या क्षणभंगुर जीवनांत पुनः तुमची आमची भेट होईल की नाही कोणास ठाऊक ! "—हें ऐकतांच त्याने आपल्या प्रवासाचा बेत रद्द केला. या ठिकाणीं ' प्रवास रद्द झाला ' हें सांगणें प्रस्तुत आहे. पण तें सरळ न सांगतां कारणाच्या वर्णनावरून तें सुचविलें आहे.

व्यवहारांतहि आपण अनेकदा असें बोलतों—आपणाला कोणी विचारलें—" आंघोळ केलीस का ? " त्यावर आपण म्हणतों—" मला थोडा ताप आहे. " येथेहि आंघोळ न करण्याचें जें कारण ' ताप येणें,' त्यावरून आंघोळ न होणें हें कार्य सुचविलें आहे. वस्तुतः येथे " आंघोळ केली नाही " हें प्रस्तुत वचन आहे. पण तें न सांगतां त्याचें कारण सांगून सुचविलें आहे.

## (३) कारण प्रस्तुत असतां कार्याचें वर्णनः—

(१) मी पाहिली एक सुरम्य बाला;
वर्णू कसा त्या स्मरसंपदेला!
वृक्षावरी वीज जशी पडावी,
त्याच्या स्थितींतचि तिची महती पहावी
नेत्रें क्षणीं तारवटून गेलीं
अंगें ज्वरीं त्या परतंत्र झालीं,
झालों तिला मी बघतां भ्रमिष्ट,
शुद्धी सर्वेचि मग होय अहा! विनष्ट
—केशवसुत, 'माझा अन्त'

बालेचें सौंदर्य हें कारण असून कवीची झालेली दुरवस्था हें कार्य आहे. वरील पद्यांत बालेच्या सौंदर्याचें वर्णन न करतां कवीने 'आपली अवस्था कशी झाली' हें वर्णिलें आहे व या वर्णनावरून त्या बालेचें अनुपम सौंदर्य ध्वनित केलें आहे. कारणाचें वर्णन करण्याऐवजी कार्याचें वर्णन केल्यामुळे येथे 'अप्रस्तुतप्रशंसा' झाली.

(२) तो वैराटि म्हणे, गा! कोणाचाही असा न दर वाजे, ।
बा! लागले असावे अमरपुरींचेहि आजि दरवाजे ॥
—मोरोपंत, विराटपर्व.

अर्जुनाने शंख वाजवून त्यांतून भयंकर आवाज काढला तेव्हा विराट-पुत्र उत्तर म्हणाला की हा भयंकर आवाज ऐकून देवांनी भयभीत होऊन आपल्या नगराचे दरवाजे बंद केले असावेत. वरील आर्येंत शंख वाजवण्यामुळे निर्माण झालेली भीति हें कारण प्रस्तुत असून त्या भीतीमुळे 'अमरपुरींचे दरवाजे लागले असावे' या कार्याचें वर्णन आहे. **कार्याच्या वर्णनावरून कारणाचें स्वरूप** सुचविलें आहे. म्हणून येथे 'अप्रस्तुतप्रशंसा' अलंकार झाला.

**(४) सामान्य प्रस्तुत असतां विशेषाचें वर्णन:--**

शिरोभागीं ज्याला बहुत नृपतींनी मिरविलें ।
जयाच्या मूल्याला सकळ भुवनांशीं तुळियलें ॥
अहा! तो दुर्दैवें शबरवनितेला गवसला ।
अजाकंठीं आता विमल मणि हा स्वस्थ पडला ॥

—ना. न. फडणीस.

अडाणी माणसांना मूल्यवान वस्तूचें मूल्य समजत नाही, या सामान्य गोष्टीचें विवेचन प्रस्तुत असतांना शबरवनितेने अजाकंठीं अडकवलेल्या रत्नाचें अप्रस्तुत वर्णन येथे केलें आहे.

**(५) विशेष प्रस्तुत असतां सामान्याचें वर्णन--**

आहेच साहजिक धूर्तपण स्त्रियांचें
स्वार्थार्थ कैतव जनीं किति हो तयांचें !
ही युक्ति कोण शिकवी वद कोकिलांतें
अन्य द्विजांकडुनि पोषवितीं पिलांतें

—गोडबोले, शाकुंतल

गरोदर शकुंतला दुष्यंताकडे जाते, परंतु त्याला तिचें विस्मरण पडलेलें असल्यामुळे तो तिला ओळखत नाही. त्या वेळीं 'तूं लबाड आहेस' असें विशेष विधान न करतां 'स्त्रिया स्वभावतः लबाड असतात' अशा 'अर्थाचें सामान्य वर्णन करून तिची लबाडी सुचविली आहे. सामान्य विधानानंतर कोकिळेचें विशेष उदाहरण दिल्यामुळे अर्थान्तरन्यास हाहि अलंकार नंतर साधला आहे.

**अप्रस्तुतप्रशंसेचा आणखी एक प्रकार–प्रस्तुतांकुर**

कित्येकदा असें वर्णन असतें—एक प्रियकर आपल्या प्रियेबरोबर उद्यानांत फिरावयास गेला. फिरत असतांना त्याच्या नजरेस दुसरी एक सुंदरी पडली. तिच्याकडे तो आसक्त दृष्टीने पाहूं लागला. या दुसऱ्या तरुणीची

एक मैत्रिण तिच्या बरोबर होती. तिने एका भ्रमरास मालतीवरून केतकीकडे उडतांना पाहिलें. तेव्हा ती मैत्रिण त्या भ्रमरास उद्देशून बोलूं लागली—

मधुपा तत्र सन्निध नव पुष्पवती मालती सदा असते ।
परि का भुजंगसक्ता कंटकयुक्ताचि केतकी रुचते ॥

—भाषांतर (अलंकारचंद्रिकेवरून)

हें वचन त्या नायकाच्या कानावर पडलें. तेव्हा त्याला वाटलें की हें आपल्यासच उद्देशून आहे.

येथे एकूण प्रकार असा आहे. सखीने केलेलें भ्रमरवर्णन हें तिच्या दृष्टीने प्रस्तुत आहे व नायकाने घेतलेला अर्थ त्याच्या दृष्टीने प्रस्तुत आहे. अशा तऱ्हेने एका प्रस्तुताच्या व्यवहारावरून दुसऱ्या प्रस्तुताचें ज्ञान झालें आहे. या प्रकारास कांही आलंकारिकांनी **प्रस्तुतांकुर** म्हणून वेगळा अलंकार मानलें आहे.

पण हा असा वेगळा अलंकार मानण्याचें कांही कारण नाही. तो अप्रस्तुतप्रशंसाच आहे. येथे आणि सर्वच ठिकाणी **प्रस्तुत आणि अप्रस्तुत हा संबंध कविदृष्टीने ठरवावयाचा असतो. कवीने निर्मिलेल्या पात्राच्या दृष्टीने नव्हे.**—या गोष्टींतील पात्रांना आपआपल्या दृष्टीने कोणतीहि गोष्ट प्रस्तुत असली तरी कवीला नायकाचा भावच प्रस्तुत आहे. भ्रमरवर्णन कविदृष्टीला अप्रस्तुत आहे. म्हणून येथे अप्रस्तुताचें विधान असून त्यावरून प्रस्तुताचा व्यवहार सुचविला आहे, म्हणून ही अप्रस्तुतप्रशंसाच होय.—

उदाहरण—

“ कादंबाने निजचंचूने नलिनीकोशद्वय क्षतिलें ।
तसेंच त्या सहकारदलांना पिकराजाने चावियलें ॥”
वापीवरती न्हातांना ती ऐकोनि अशीं सखिवचनें ।
पदराने स्तनयुग्म झाकिते, अधर झाकते हाताने ॥

—भाषांतर

कोणी एक स्त्री विहिरीवर स्नान करीत होती. बाजूला तिच्या मैत्रिणी सृष्टिशोभा पाहात आपसांत बोलत होत्या व " पाहा ग, हे कमलकोश कादंबाने कसे टोंचले, " असें एक म्हणाली. तर ' आम्रवृक्षाची नवी पालवी कोकिलाने कशी चावली ' हें दुसरीनें सांगितलें. सख्यांचें हें बोलणें स्नान करणाऱ्या नायिकेच्या कानावर पडत होतें. त्यांतील ' नलिनीकोशद्वय ' व ' सहकार-दल यांवरून नायिकेला आपले स्तनद्वय व ओष्ठ या प्रस्तुतांचा बोध झाला.

## (२४) पर्यायोक्त

आपणाला एखादी गोष्ट सांगावयाची असतां ती आपण सरळ सांगतों; किंवा वेगळ्या प्रकारेंहि सांगूं शकतों. " आपण आलांत " असें न बोलतां " आपल्या आगमनाने ही भूमि पुनीत झाली. " असें म्हटलेलेंहि प्रसंगविशेषीं आपण ऐकतों. " हयग्रीवाने स्वर्गावर स्वारी केली " ही साधी गोष्ट कवीला सांगावयाची असतां, तो इतकी सरळ सांगूं लागला तर मग तो कवीच कुठला ? " शचीकरता इंद्राने मुद्दाम राखून ठेवलेल्या पारिजाताचे पुष्पगुच्छ हयग्रीवाच्या सैनिकांनी सहज तोडून आणलें " असें तो म्हणेल. असें बोलणें म्हणजे पर्यायोक्त होय.

पर्यायोक्त म्हणजे पर्यायाने किंवा वेगळ्या प्रकाराने तीच गोष्ट सांगणें. जी गोष्ट आपणास सांगावयाची असते ती वाच्य होय. ती ज्या शब्दांनी सांगावयाची त्या शब्दांना आपण वाचक म्हणतों. आपल्या बोलण्यांत नेहमी वाच्यवाचक संबंध असतो. अशा वाच्यवाचक संबंधाचा उपयोग न करता कवि जेव्हा वेगळ्या प्रकारें तीच गोष्ट सांगतो तेव्हा पर्यायोक्त अलंकार होतो.

हा वेगळा प्रकार कोणता ? वरच्याच उदाहरणाने पाहूं. " स्वर्गावर स्वारी केली " हें सरळ बोलणें झालें. " शचीकरिता मुद्दाम राखून ठेवलेल्या पारिजाताचीं फुलें आणलीं " हें कांहीं सरळ बोलणें नव्हे. यांत व्यंजना आहे.

इंद्राने शचीकरता मुद्दाम राखून ठेवलेला बगीचा, त्यांतील फुलें शत्रूकडील सैनिकांनी आणलीं असें सांगून कवीने आपणास असें सुचविलें की हयग्रीवाने स्वर्गावर स्वारी करून स्वर्ग जिंकला. अर्थात् जी गोष्ट सरळपणें वाच्य वाचकांनी सांगतां आली असती ती कवीने व्यंजनेने सुचविली.

**पर्यायोक्त आणि अप्रस्तुतप्रशंसा**—पर्यायोक्त आणि कार्य-कारणरूप अप्रस्तुतप्रशंसा यांच्यांत साम्य आहे. पण फरक हा आहे की, पर्यायोक्तांत वाच्य आणि व्यंग्य दोन्हीहि प्रकृत असतात. उलट अप्रस्तुत-प्रशंसेंत वाच्य अप्रकृत असतें तर व्यंग्य प्रधान असतें. दुसरें, पर्यायोक्तांत व्यंग्य हें वाच्यपर असतें. म्हणजे व्यंजनेचें अखेर पर्यवसान वाच्य द्योतित करण्यांतच होतें; तर अप्रस्तुतप्रशंसेंतील वाच्य हें व्यंग्यपर असतें. म्हणजे वाच्याचें पर्यवसान व्यंग्य द्योतित करण्यांत होतें. दुसऱ्या शब्दांत सांगायचें म्हणजे पर्यायोक्तांत व्यंग्याकडून आपण वाच्याकडे जातों; तर अप्रस्तुत-प्रशंसेंत वाच्याकडून व्यंग्याकडे जातों.

पर्यायोक्ताचे विशेष असे—

१. पर्यायोक्तांतील वाच्य हे त्याने सूचित केलेल्या व्यंग्यापेक्षा अधिक वैचित्र्यपूर्ण असलें पाहिजे.

२. पर्यायोक्तांत वाच्य–व्यंग्य सामान्यपणें कार्यकारणभावाने संबंधित असतात.

३. कवीला वाच्य आणि व्यंग्यांत फारसा फरक वाटत नाही.

४. म्हणून ते दोन्हीहि प्रकृतच असतात.

म्हणून पर्यायोक्ताची व्याख्या अशी—

**एखादी गोष्ट आपणांस सांगावयाची आहे तिचे प्रत्यक्ष वाचक शब्द न योजतां ती गोष्ट अप्रत्यक्ष रीतीने जेथे ज्ञात करून दिली जाते तेथे पर्यायोक्त अलंकार होतो.**

उदा.—

(१) स्वस्त्रीवर जुलूम झाल्याचें कळल्यावर जो षंढ कोर्टांत फिर्याद करण्यास जाण्याइतका शांत राहतो, त्याच्या देशाची उन्नति अजून फार दूर आहे.

—लो. टिळक.

वरील वाक्यांत जी गोष्ट वाच्य आहे ती ही की " नादान माणसांचा देश उन्नतीस चढत नाही. " पण " जनतेचा नादानपणा " सांगण्यासाठी लेखकाने वेगळा मार्ग स्वीकारला आहे. ती गोष्ट अप्रत्यक्ष रीतीने सांगितली आहे. म्हणून पर्यायोक्त हा अलंकार झाला.

(२) ज्यांचे घोडे उत्तरेकडे स्वैर संचारून गंगा व सिंधु नदींतील पाणी प्यायले त्या मराठ्यांच्या कुळांत मी जन्म घेतला आहे.

मी शूर मराठ्यांच्या कुळांत जन्म घेतला आहे ही वाच्य गोष्ट वरील वाक्यांत पर्यायाने सांगितली आहे.

(३) कुठली दौलत या खांद्यांवर मान ठेवुनी निजते ?
कुण्या कुळाचें नांव उजळतें तरवारीचें पातें ?

—गोविंदाग्रज, 'कृष्णाकाठी कुंडल'

" तुमची प्रिया कोण ? तुमचें नांव काय ? " असें सरळ विचारण्याऐवजी वरील ओळींमध्ये पर्यायाने ते प्रश्न केले आहेत.

(४) स्मरण तुज, मुकुंदा, कां नव्हे आजि माझें ?
तुजविण मज माझा देह हा होय ओझें ।
झडकरि अथवा हा नेशिना जीव देवा !
रवितनयलुलायारूढ देखेन केव्हा ?

—सामराज, रुक्मिणीहरण, सर्ग ३

या श्लोकांतील चतुर्थचरणांत पर्यायोक्त अलंकार आहे. 'मला मृत्यु केव्हा घेऊन जाईल ?' ही गोष्ट सूर्यपुत्राच्या (म्हणजे 'यमाच्या') लुलायांवर

(= रेड्यावर) मी स्वतःला आरूढ झालेली केव्हा पाहीन?" अशा शब्दांनी वळसे घेत घेत सांगितली आहे!

## (२५) व्याजस्तुति

व्यंजनेवर आधारलेला व्याजस्तुति हा आणखी एक अलंकार आहे. व्याजस्तुति या शब्दाचा अर्थ व्याजाने म्हणजे कपटाने स्तुति किंवा व्याजरूप स्तुति. व्याज म्हणजे कपट. आपण पुष्कळदा एखाद्याची वरवर प्रशंसा करतों पण वस्तुतः त्यांत निन्दा असते; तर कित्येकदा वरवर निंदा असते, पण वस्तुतः त्यांत स्तुति असते. अशा बोलण्यांत व्याजस्तुति अलंकार असतो. गंगेला उद्देशून कवि म्हणतो, "हे गंगे, तूं पाप्यालासुद्धा स्वर्गपद देतेस; खरोखर तुला विवेकच नाही!" येथे दिसावयास निंदा पण खरोखर स्तुति आहे. तर नायकाकडून परत आलेल्या दूतीला नायिका म्हणते, "हे दूति, खरोखर तूं माझ्या करिता केवढे कष्ट भोगलेस! तुला दंतक्षत आणि नखक्षतसुद्धा सहन करावे लागले!" येथे वरवर दिसावयास स्तुति पण अंतरीं निंदा आहे. **व्याजस्तुति अलंकाराचा प्रभावी उपयोग आपल्याला शि. म. परांजपे यांच्या निबंधांतून अनेक स्थळीं पाहावयास मिळतो.**

हा अलंकार दिसावयास अप्रस्तुतप्रशंसेसारखा दिसतो, कारण वरवर बोललेलें अभिप्रेत नसतें. त्याहून उलट अर्थ अभिप्रेत असतो. कांही आलंकारिकांनी तर याला अप्रस्तुतप्रशंसेचाच एक प्रकार मानलें आहे. पण या दोन अलंकारांत फरक आहे. अप्रस्तुतप्रशंसेंत ज्याप्रमाणे प्रस्तुत आणि अप्रस्तुत असा भेद असतो तसा येथे करतां येत नाही. स्तुतीला निंदेचें स्वरूप देणें, किंवा निंदेला स्तुतीचें स्वरूप देणें यांत प्रस्तुत–अप्रस्तुत संबंध नाही. यांत फक्त एक गोष्ट दुसऱ्या स्वरूपाने मांडणें एवढाच प्रकार आहे व या दृष्टीने विचार केला तर व्याजस्तुतीचे अप्रस्तुत प्रशंसेपेक्षा पर्यायोक्ताशीं अधिक साम्य आहे. कारण यांत फक्त एक गोष्ट दुसऱ्या

प्रकारें सांगणें (भंग्यंतरसमाश्रय) आहे. पण असें असलें तरी पर्यायोक्तांत हा प्रकार कार्यकारणरूप असतो तर व्याजस्तुतींत स्तुति निंदारूप असते. व्याजस्तुति म्हणजे पर्यायोक्ताचा स्तुतिनिंदारूप असा प्रकार असून तो वेगळा अलंकार मानण्यांत आला असें म्हणतां येईल.

व्याजस्तुतीबद्दल कित्येकदा व्याजोक्ति असा शब्द वापरलेला दिसून येतो; पण ती चूक होय. व्याजोक्ति म्हणजे व्याजस्तुति नव्हे. व्याजोक्ति हा वेगळा अलंकार आहे. विद्यार्थ्यांनी हा फरक नीट लक्षांत ठेवला पाहिजे.

व्याजस्तुतीमधील आवश्यक गोष्टी अशा--

१. व्याजस्तुति म्हणजे व्याजानें किंवा कपटानें केलेली स्तुति, म्हणजे वरवर स्तुति पण वस्तुतः निंदा; किंवा व्याजरूप स्तुति वरवर निंदा पण वस्तुतः स्तुति.

२. यांत स्तुतीचें निंदेंत किंवा निंदेचें स्तुतींत पर्यवसान झालें पाहिजे.

३. हें असें पर्यवसान होतें किंवा नाही हें संदर्भावरून ठरवितां येतें.

म्हणून व्याजस्तुतीची व्याख्या अशी--

**स्तुति करण्याच्या मिषानें निंदा, किंवा निंदा करण्याच्या मिषानें जेथें स्तुति केलेली असते तेथें व्याजस्तुति अलंकार होतो.**

उदाहरणें--

१. ध्रुवाच्या सापत्न मातेनें त्याला लाथ मारून ढकलून दिलें, तेव्हा ध्रुवाला वाईट वाटलें आणि त्यानें परमेश्वराला प्रसन्न करून घेऊन आपल्याला अढळपद मिळवून घेतलें अशी एक गोष्ट आहे...जर ध्रुवाला त्याच्या सावत्र आईनें फक्त एकच काय ती लाथ मारली होती, तर तेवढ्या-वरून त्याच्या मनांत एवढा तीव्र उद्वेग कसा उत्पन्न व्हावा? एकच लाथ आणि तिच्यापासून एवढा भयंकर त्वेष, यांमधील कार्यकारणभाव शक्य दिसत नाही...आम्ही पाहा! शेकडों लाथा खाल्ल्या आहेत, तरी फिरून

निर्लज्जपणाने नोकरी-नोकरी पत्करून जास्त लाथा मिळविण्याची महत्त्वाकांक्षा धरीतच आहोंत! स्वराज्यप्राप्ति काय वाटेवर पडली आहे? त्याच्याकरिता निर्लज्जपणा, बेशरमपणा, कोडगेपणा इत्यादि सद्गुणांची कमाल उडवून द्यावी लागते, तेव्हा कोठे उन्मत्त झालेली राज्यसत्ता वठणीवर येते! म्हणे एका लाथेनेच लाज वाटली! पण एका लाथेनेच इतकी लाज वाटेल कशी? मनुष्यांचीं मनें हीं येथून तेथून सगळ्यांचीं सारखींच बनलेलीं असतात. आमचीं मनें कांहीं निराळ्या तऱ्हेचीं बनवून ध्रुवाचें मन मात्र एका लाथेनें इतकें चिडून जाण्यासारखें देवाने ज्वालाग्राही बनविलें असेल, अशी कल्पना करणें हें मानसशास्त्राच्या तत्त्वाच्या अगदी विरुद्ध आहे. असला पक्षपात परमेश्वर कधीहि करीत नसतो. तेव्हा ध्रुवाची गोष्ट कोणीतरी बनावट करून जुन्या पुराणांत घुसडून दिली असली पाहिजे.

—शि. म. परांजपे

"ध्रुवाची गोष्ट खोटी असली पाहिजे."

( २ ) "आता आमचे धर्मनिष्ठ बंधु 'ज्ञानोदय' व राजनिष्ठ बंधु 'एलिफास्' अशा मंडळीस आमचें पुढील विवेचन कोणत्या तऱ्हेने भासेल व त्यांतील कोटिक्रम त्यांच्या पवित्र व ज्ञानमय चित्तावर कोणत्या प्रकारें आरूढ होईल, हें आम्ही पुरतेपाणी जाणून आहों."

—विष्णुशास्त्री चिपळूणकर, 'आमच्या देशाची स्थिति'

वरील उताऱ्यांतील 'पवित्र' व 'ज्ञानमय' या शब्दांतून आपाततः स्तुति व्यक्त होत असली तरी वस्तुतः निंदावाचक अर्थ त्यांत गर्भित आहे. म्हणून येथेहि व्याजस्तुति अलंकार झाला.

( ३ ) निघून नरजातिला रमविण्यांत गेलें वय,
म्हणून वधिलें मला! किती दया! कसा हा नय!
उदार बहु शूर हा नर खरोखरी जाहला
वधून मज पाखरा निरपराध की दुर्बला!

रे. टिळक, 'केवढें हें क्रौर्य'

वरील श्लोकांत ‘ किति दया ! ’ ‘ कसा हा नय ! ’ ‘ उदार ’ बहु शूर ’ या शब्दांमध्ये बाह्यतः स्तुति असली तरी निंदा गर्भित आहे.

( ४ ) हो म्हणसी सुताचा सूत, भला गा भला भला पदवी,
देसी, हे सीमा तव सुज्ञपणाचीच ! हें असें वदत्री
—मोरोपंत, कर्णपर्व.

वरील आर्येतील शल्याच्या भाषणांत आलेल्या ‘ सुज्ञपणा ’ या शब्दाने दुर्योधनाची वाच्यार्थाने स्तुति केलेली असली तरी त्या शब्दांतून निंदा अभिप्रेत आहे.

( २ ) श्रीरामा, तव नाम-प्रेषित हा माजला असे चोर ।
येतां सन्निध अमुच्या पळवितसे पातकें बहू दूर ॥
—मोरोपंत.

श्रीरामाचें नाम भक्तांचीं पातकें पळवून नेणारा चोर आहे असें येथे वर्णन आहे. ‘ चोर ’ हा शब्द निंदादर्शक असला तरी येथे त्यांतून स्तुति गर्भित आहे.

## (२६) आक्षेप

आक्षेप म्हणजे निषेधाचा आभास किंवा गर्भित निषेध. अर्थात् येथे दोन प्रकारचा निषेध अभिप्रेत आहे. आपण जें अगोदर सांगितलें आहे त्याचाच निषेध करणें किंवा जें आपण सांगणार आहोंत त्याचा निषेध करणें. हें करीत असतांना जी गोष्ट आपण सांगितली किंवा सांगणार आहोंत ती गोष्ट ऐकणाऱ्याच्या मनावर आपण अधिक परिणामकारकतेने बिंबवीत असतो.

अर्थात् यांतहि व्यंजनेचा खेळ असतोच. सांगितलेल्या गोष्टीचा किंवा सांगावयाच्या गोष्टीचा आपण निषेध केला म्हणजे आपल्या मनांत काय आहे हें आपण सुचवितों. बाप रागावून मुलाला म्हणतो, “ तुम्ही अभ्यास नीट

करावयाला हवा ! पण तुम्हाला सांगून तरी काय करावयाचें!" येथे जें सांगावयाचें तें बापाने सांगितलें आणि नंतर त्या सांगितलेल्या गोष्टीचाच निषेध केला. पण कित्येकदा सांगण्यापूर्वीच निषेध केला जातो. उत्तररामचरितांत वासंती रामाला म्हणते—

तूं जीव तूं हृदय तूं मजला विसावा
तूं चंद्रिकाच नयना शरिरा सुधा वा।
मोही जिला वदुनि यापरि गुंतवावें
तीतेच हाय ! तुज काय पुढे वदावें !

येथे "तूं तिलाच टाकून द्यावेंस हें योग्य आहे काय?" असें वासंतीस म्हणावयाचें आहे, पण तें न सांगतांच तिने परिणामकारकतेने सुचविलें आहे.

आक्षेपाचे हे प्रकार वस्तुतः सादृश्यावर आधारलेले नाहीत. पण प्रतीपामध्येहि आक्षेपाचा एक अंश येतो. उपमानाचें कांहीच काम नाही, असें सांगणारा जो प्रतीपाचा प्रकार आहे त्यांत एक प्रकारें आक्षेप गर्भित असतो. दंडी व इतर आलंकारिकांनी आक्षेपाचें क्षेत्र यापेक्षा अधिक वाढविलें आहे. त्यांत इष्ट गोष्टीचा निषेधाभास असतो किंवा अनिष्ट गोष्टींचा विधानाभास असतो. प्रवासाला निघालेल्या आपल्या पतीला निरोप देतांना नायिका म्हणते, "आपण प्रवासाला जातांच आहात तर जा ! आपला प्रवास सुखाचा होवो! माझी एवढीच इच्छा आहे की आपण जेथे जात असाल तेथेच माझा जन्म होवो!" येथे ती नायकाला जाण्याची अनुज्ञा देत असतांनाच खरोखरी निषेध करीत आहे.

आक्षेपांतील विशेष गोष्टी अशा—

१. बोलणारा कांहीतरी बोलून जातो किंवा बोलण्याची इच्छा करतो.
२. बोलावयाचें तें बोलल्यावर किंवा बोलत असतांनाच त्याचा निषेध करतो.

३. हा निषेध वस्तुतः खरा नसतो, तो केवळ आभास असतो.

४. या निषेधाभासाने कांही विशेष परिणामितेने सांगितला पाहिजे.

५. हा विशेष दोन प्रकारचा असूं शकतो—सांगितलेली गोष्ट इतकी स्पष्ट आहे की ती सांगण्याचीच जरूर नाही; किंवा गोष्ट सांगावयाची असल्यास ती सांगणेंच शक्य नाही.

६. कित्येकदा त्यांत विधानाभास असतो.

म्हणून आक्षेपाची व्याख्या अशी—

**वक्त्याच्या मनांत कांही विशेष अर्थ असतो व तो अर्थ त्याला श्रोत्याला कळवावयाचा असतो. परंतु बाह्यात्कारी तो सांगण्याची आपली इच्छा नाही असें दाखवून किंवा जें सांगितलें आहे त्याचाच निषेध केल्यासारखें दाखवून जेथे बोलणारा आपल्या मनांतील अर्थ व्यक्त करतो तेथे आक्षेप अलंकार होतो.**

याचे दोन प्रकार होतात. ( १ ) जें सांगावयाचें आहे त्याचा निषेध करून; किंवा ( २ ) जें अगोदरच सांगितलें आहे त्याचा निषेध करून.

उदाहरणें—

**प्रकार पहिला:—**

" तुम्ही मला तुमच्याबरोबर गावाला न्यावें म्हणून अनेकदां मी इच्छा दर्शविली, पण तुम्ही कांही मला नेलें नाही. तुम्ही या वेळेस मुंबईस जाणार आहा तेव्हा —पण जाऊं द्या. तुम्हीच आपल्या जिवाची मुंबई करून या, म्हणजे झालें ! "

येथे बोलणाऱ्या व्यक्तीच्या मनात ' तुम्ही मला मुंबईस न्या ' असें म्हणायचें आहे. पण हे शब्द उच्चारायच्या अगोदरच त्या बोलण्याचा निषेध आहे. तथापि ऐकणाऱ्याला इष्ट तो अर्थ प्रतीत होतोच म्हणून येथे ' आक्षेप ' आहे.

**प्रकार दुसरा—**

(१) 'आजपर्यंत तुम्ही मला मदत केली नाही. आज मी विशेष अड-चणींत असल्यामुळे आज तरी तुम्ही मला साह्य कराल का! बाकी तुमच्या सारख्यापुढे मी तोंड वेंगाडलें ही मी चूकच केली.'

वरील वाक्यामध्ये 'तुम्ही मला साह्य करावें' असा अर्थ अगोदर व्यक्त करून 'ही मी चूकच केली' या शब्दांनी त्याचा निषेध केला आहे. म्हणून आक्षेप अलंकाराचा हा दुसरा प्रकार झाला.

(२) आणि सांगतों अखेर एकच की भांडणतंटा
जरि झाला कधि तरि तो घ्यावा प्रेमाने मिटता!
आरंभीं येतील अडथळे! जोवरी न हलला—
सदनिं पाळणा—क्षमा करा, हा चुकुनि शब्द गेला!

—केशवकुमार 'वधूवरांस काव्यमय अहेर'
(झेंडूचीं फुलें)

वरील उदाहरणांत 'सदनिं पाळणा हलण्या'चा स्पष्ट उल्लेख अगोदर करून नंतर 'चुकुनि शब्द गेला' या शब्दांनी बोललेल्या मजकुराचा निषेध केला आहे. वस्तुतः ज्या बोलण्याचा निषेध केला तें कवीच्या मनांत बोलायचेंच होतें, पण तें बोलणें अधिक परिणामकारक व्हावें म्हणून नंतर त्याचा निषेध केला. खुंटा हलवून अधिक बळकट करावा त्यांतलाच हा प्रकार आहे.

( ३ ) तसें मज करा, करांबुज धरा शिरीं मावरा।
वराभयपरा! पराक्रमपटो! मना आवरा॥
करांबुज असो. नसे उचित त्यास मी पामर;।
प्रणाम करिती पदाप्रतिहि सन्मुनी सामर.॥

—मोरोपंत, 'केकावलि'

वरील केकेंत 'करांबुज धरा शिरीं' या पूर्वोक्त भाषणाचा 'करांबुज असो' या शब्दांनी नंतर निषेध केला आहे. 'माझ्या डोक्यावर वरदहस्त

ठेवा ' असें अगोदर म्हणून नंतर ' करांबुज राहूं द्या, मी त्याला योग्य नाही ' असें प्रतिपादलें आहे. अशा प्रकारें अगोदरच्या भाषणाचा निषेध करून ' माझ्या शिरावर वरदहस्त ठेवा ' हाच अभिप्राय परिणामकारकपणें सुचविला आहे. म्हणून येथे ' आक्षेप ' अलंकाराचा दुसरा प्रकार झाला.

अप्रस्तुतप्रशंसा, पर्यायोक्त, व्याजस्तुति, आक्षेप या अलंकारांचीं अभ्यासार्थ उदाहरणें:—

(१) उघड झाप यापरी चालतां तुझ्या पापण्यांची
चालविती तव नयन कृती मम हृदय कापण्याची

—यशवंत, ' यशोधन '

(२) जन्मुनि कोण्या राजर्षीचा वंश अलंकृत केला ?
आत्मवियोगें देश कोणता पावविला दुःखाला ?
आत्मदर्शनें कोण्या देशा सांगा द्याल सुखाला ?
तपोवनीं येण्याचे श्रम कां दिधले या देहाला ?

—गोडबोले, ' शाकुंतल '

(३) तूं देशी न तुझें, कशास मग मी द्यावें तुला आपलें,
दे माझें परतोनि चित्त मज, जें ठायीं तुझ्या गुंतलें.
छे ! तें ठेव तसेंच नाहक नको तो शीण कां कीं हटें,
माझें चोरुनि चित्त नेतिल पुन्हा डोळे तुझे चोरटे !

—बी, ' तूं देशी न तुझें '

(४) जिवंत बहु बोलकें किति सुरम्य तें उत्पल
नरें धरुनि नाशिलें खचित धन्य बुद्धीबल !

—रे. टिळक

(५) शशमंडळांत कोल्हा म्हणतो मी सिंह वल्गना करितों ।
जोवरि न पाहिला गजमुक्ताफळ कवळ भक्षिता हरि तो ॥

—मोरोपंत, कर्णपर्व.

(६) वसंत-समयीं फुले, परिमळें दिशा व्यापि जो ।
जयास अवलोकुनी सुर-तरूहि चित्तीं थिजो ॥
तया सतत सेविती विहग आम्र-वृक्षा किती ।
परी पिकचि एकला मधुर वाणि लाधे कृती ॥

—कृष्णशास्त्री चिपळूणकर.

(७) करि एकवीस वेळां क्षत्रियरहिता मुनीश जो धरणी ।
तत्प्रियशिष्य शरांहीं खिळिला गांगेय मुख्ययोध रणीं ॥

—मोरोपंत, कर्णपर्व.

(८) अमृतकराचा उदय न होतां रजनिसमय जैसा ।
तुमच्या विरहीं आज जाहला कवण देश तैसा ॥

—रघुनाथपंडित, दमयंतीस्वयंवर.

(९) ज्या ह्यूमसाहेबाने ही राष्ट्रसभा अस्तित्वांत आणली आणि आपलें सामर्थ्यसर्वस्व खर्च करून तिचें हरएक प्रकारें आज सात वर्षें संगोपन केलें, त्यावर त्याच्या जातभाईंनी राजद्रोहाचा बडगा उचलतांच आमच्यांतले शहाणेसुर्ते म्हणविणारे कांही लोकहि त्यावर तुटून पडूं लागले! खासा न्याय! खासें धैर्य! खाशी देशभक्ति!

—गो. ग. आगरकर.

## (२७) विरोधाभास किंवा विरोध.

मम्मटाने ज्याला विरोध म्हटलें आहे तो खरोखर विरोधाभास आहे. विरोधामध्ये सत्य असतें पण तें सत्य अशा तऱ्हेने मांडलेलें असतें की त्यांत विरोध आहे असें वरवर पाहतांना दिसतें. मात्र विचारांतीं त्या विरोधाचा परिहार करतां येतो. इंदुमतीच्या अंगावर नाजूक फुलांची माला पडावी आणि तिचा प्राण जावा ह्या दोन गोष्टी परस्परविरोधी नाहीत का? किंवा चंद्राने आपल्या थंड किरणांनी अग्निवर्षाव करावा ह्यांत केवढा तरी विरोध

आहे ! पण हा विरोध असला तरी त्यांत सत्य आहे. कारण या विरोधाचा परिहार करतां येतो. पुष्पमाला इंदुमतीचा प्राण घेण्यास समर्थ कशी ठरली ? " ती ईश्वरेच्छा " असें कालिदास उत्तर देतो. " चंद्रांतून अग्निवर्षाव कसा होईल ? "--" विरहतापामुळे तसें वाटतें " असें कालिदास उत्तर देतो. येथे विरोधपरिहार आहे, म्हणून तें सत्य आहे.

याचा अर्थ असा-वस्तूच्या जाति-गुण-क्रिया वर्णन करीत असतांना कवि त्या अशा तऱ्हेने मांडून दाखवितो की त्या एकमेकींस विरुद्ध नसतांना सुद्धा विरुद्ध आहेत असें आपणांस भासतें. विचारांतीं मात्र त्या भासणाऱ्या विरोधाचा परिहार करतां येतो. असें जेथे असतें तेथे विरोधाभास किंवा विरोध अलंकार होतो.

**विरोध आणि रूपक**---विरोधामध्ये कवि एका वस्तूवर विरुद्ध धर्मांचा एका प्रकारे आरोप करीत असतो. " मृणालवलयें म्हणजे अग्निकंकणेंच होत " 'चंद्र प्रत्यक्ष अग्निसारखा भासतो.' येथे विरुद्ध धर्मांचा आरोप आहे. उलट 'मुख चद्रच आहे.' येथील आरोपांत सादृश्यप्रतीति आहे. मुख आणि चंद्र यांच्यांत विरोध नाही असें नाही. पण कवि तेथे त्यांच्यांतील आल्हादकारकत्व या सादृश्यावर भर देतो.

**विरोधाभासाचे विशेष**---

१. विरोधाभासांत दोन परस्परविरोधी गोष्टी किंवा धर्म एकत्र राहतात असें दाखविलेलें असतें. दोन विरोधी गोष्टी एकाच ठिकाणी आहेत असें दाखविणें ही विरोधाची मध्यवर्ती कल्पना आहे; नाही तर ती असंगति होईल.

२. हा विरोध कार्यकारणभावांतील नको. त्याशिवाय इतर संबंधाचा पाहिजे. कार्यकारणभावांतील विरोध असेल तर तो विभावना किंवा विशेषोक्ति अलंकार होईल.

३. विरोध हा नुसता भासमान होणारा पाहिजे. याचा अर्थ असा. त्या दोन गोष्टींत वस्तुतः विरोध नसतो. तो केवळ तसा भासतो.

४. म्हणूनच त्या विरोधाचा परिहार करतां आला पाहिजे. विरोधाचा परिहार न झाला तर तेथे अलंकार होत नाही.

५. विरोधाभास कित्येकदा श्लेषावर आधारला जातो.

म्हणून विरोधाची व्याख्या अशी—

**जेथे वस्तूच्या जाति, गुण, क्रिया इत्यादि धर्मांत वस्तुतः विरोध नसतांहि, त्यांच्यांत विरोध आहे असें भासविलें जातें ( मात्र असें भासविलें असतांहि अखेर त्या विरोधाचा परिहार होऊं शकतो ) तेथे विरोधाभास किंवा विरोध अलंकार होतो.**

उदाहरणें—

( १ ) तरी नसतों मी दरिद्री धनाने
तरी नसतों मी क्षुद्र शिक्षणाने

—केशवसुत, एक खेडें.

धनप्राप्तीने मनुष्य श्रीमंत होतो, दरिद्री नव्हे. पण शहरांतील लोक 'धनाने दरिद्री' बनतात असें कवीला सांगावयाचें आहे. यांत विरोध असला तरी तो केवळ आभास आहे. 'दरिद्री' याचा अर्थ 'दरिद्री मनोवृत्तीचे' असा घ्यावयाचा आहे. क्षुद्र मनोवृत्तीचा मनुष्य धनाने श्रीमंत असू शकतो, म्हणून वरील वाक्यांतील विरोधाचा परिहार होऊं शकतो.

'शिक्षणाने क्षुद्र' यांतहि विरोध आहे. परंतु "शहरवासीयांना लाभणारें शिक्षण हें खरें शिक्षण नसतें, नुसती पोपटपंची असते व तशा शिक्षणाचा लाभ घेऊनहि शहरवासीयांचीं मनें क्षुद्र राहतात." हा अर्थ लक्षांत घेतां विरोधाचा परिहार होतो, म्हणून येथेहि विरोध अलंकार झाला.

( २ ) ऐसें वदोनि राजा सकुटुंब निघोनि गजपुरा आला; ।
त्याला पाहुनि आप्तां थोडा, बहु हर्ष दुर्जना झाला ॥
—मोरोपंत, सभापर्व.

द्यूत खेळण्यार्चे कौरवांकडून आलेलें निमंत्रण स्वीकारून धर्मराज द्यूत खेळण्यासाठी हस्तिनापुरास आला, त्या वेळीं त्याच्या आगमनानें आप्तांना थोडा हर्ष झाला, पण दुर्जनांना मात्र फार हर्ष झाला.

धर्माच्या आगमनानें आप्त व दुर्जन यांच्या मनांत अशा प्रकारचे परस्परविरुद्ध भाव निर्माण व्हावेत हें वर्णन विरोधदर्शक आहे. परंतु हा विरोध वरवर दिसणारा असून त्याचा परिहार होऊं शकतो. धर्मराज द्यूतांत हरण्याचा संभव असल्यामुळे त्याच्या आगमनानें आप्तांना फारसा हर्ष न होणें स्वाभाविक होतें, याच्या उलट 'धर्मराज द्यूतांत हरल्यावर त्याची चांगलीच फजिती होणार' हें जाणून दुर्जनांना अत्यानंद होणेंहि त्यांच्या स्वभावास अनुरूप होतें.

(३) मायबापाहूनी बहू मायावंत । करूं घातपात शत्रूहूनी ॥
—तुकाराम.

वरील उदाहरणांत 'आम्ही संत मायबापाहूनहि मायाळू व शत्रूं-पेक्षाहि घातकारक आहों' असें म्हटलें आहे. मायाळूपणा व घातकारकता हे परस्परविरुद्ध गुण संतांच्या ठिकाणी दर्शविल्यामुळे येथे विरोध भासतो. परंतु 'संत हे भल्यांशी वागतांना मायाळू आणि दुर्जनांशी वागतांना घातपाती असतात' हा वास्तविक अर्थ लक्षांत घेतां उपर्युक्त वचनांतील विरोधाचा परिहार होतो.

(४) भर दुपारच्या ग प्रहरीं । मंडळी सारी शेजारी
अशी कशी घरांत झाली बाई चोरी ॥ धृ. ॥
मी घरांत होतें बसलें । मज अंगणांत ते दिसले ।

मी बघतां बघतां फसलें । अन् चोरा पाहुन हसलें ।।
मंडळी असुनी शेजारी । अशी. ।। १ ।।

—नामदेव व्हट्कर, 'दुपारची चोरी !'

वरील उदाहरणांत 'भर दुपारी सारी मंडळी असतांना घरांत चोरी झाली' शिवाय 'चोरा पाहुन हंसलें' या विधानांतून विरोध दिसून येतो. मात्र हा वास्तविक विरोध नसून भासमान विरोध आहे. कारण हा 'चोर' म्हणजे 'हृदय चोरणारा प्रियकर' असतो.

(५) महर्षि कर्वे हे नव्वदी उलटून गेलेले तरुण आहेत.

वरील वाक्यांत 'नव्वदी उलटून गेलेले' व 'तरुण' हे परस्पर-विरोध दर्शवितात. परंतु 'तरुण आहेत' असें म्हणण्याने कर्वे यांची तरुणा-सारखी उद्योगशीलता तेवढी व्यक्त करावयाची आहे, ही गोष्ट लक्षांत घेतली तर वरील वाक्यांतील भासमान विरोध नष्ट होतो.

( ६ ) 'जेथे हजारो वीर हां हां म्हणतां गोळा व्हावयाचे तेथे आता कोणास स्वप्नींहि तरवारीचें किंवा बंदुकीचें दर्शन नाही.'

—विष्णुशास्त्री चिपळूणकर, 'आमच्या देशाची स्थिति'

वरील वाक्यांत भासमान विरोध आहे. पारतंत्र्यामुळे निर्माण झालेली परिस्थिती लक्षांत घेतां वरील विरोध नाहीसा होतो.

सुपात्र न रमाहि यद्रतिसुखास दारा परी,
असा प्रभुहि सेवकां भजसि खासदारापरी; ।।

—मोरोपंत, केकावलि.

'स्वामी असूनहि सेवकांना भजतो' असें वर्णन द्वितीय—चरणांत केल्यामुळे तेथे विरोध अलंकार झाला. स्वामित्व व सेवकत्व या दोन परस्परविरोधी गोष्टी आहेत. पण या सेवेच्या मागे भक्तीला वश होणें हा अर्थ असल्यामुळे विरोधपरिहार होतो.

## (२८) विभावना

विरोधालंकाराचें सामान्य स्वरूप कसें आहे हें मागील अलंकारांत सांगितलें. यापुढे विशिष्ट प्रकारच्या विरुद्ध संबंधांवर आधारलेले अलंकार पाहूं. त्यांपैकी कार्यकारणसंबंधांत विरोध असलेले असे विभावना, विशेषोक्ति आणि असंगति हे अलंकार आहेत; व कार्यकारणाच्या पौर्वापर्यावर आधारलेली अतिशयोक्ति हा चवथा प्रकार आहे. या अतिशयोक्ति प्रकाराचें विवेचन मागे येऊन गेलें आहे. कार्यकारण संबंधांतील विरोधाचे चार प्रकार होतील. त्यावर हे अलंकार आधारले आहेत.

१. कार्य व कारण यांचा क्रम उलटा होणें — विपर्ययातिशयोक्ति.

२. कारणाशिवायहि कार्य दिसणें—विभावना.

३. कारण असतांहि कार्य न दिसणें—विशेषोक्ति.

४. कारण व कार्य व हीं भिन्नस्थलीं प्रकट होणें—असंगति.

कारणाशिवाय कार्य दिसून येतें अशा प्रकारचें जेथे वचन असतें तेथे विभावना अलंकार होतो. “ अपीतमत्ताः शिखिनः” — मद्यपानाशिवायच मोर उन्मत्त दिसूं लागले. येथे विभावना आहे. एखादा मनुष्य मत्त किंवा झिंगल्यासारखा दिसतो तेव्हा त्याने मद्य घेतलें असावें असा आपण अंदाज करतों. सारांश, मद्य हें कारण आणि मत्तता हें कार्य हा संबंध आपल्या मनांत ठरून गेलेला असतो. पण जेव्हा आपण मयूराला मद्याशिवायच मत्त झालेलें पाहतों तेव्हा आपल्या मनांत कारणाशिवायच कार्य झाल्याचा विरोध उभा राहतो. अर्थात् विरोधाचा इतर प्रकारांप्रमाणेच येथेहि परिहार होऊं शकतों. मद्य हें मत्ततेचें प्रसिद्ध कारण आहे तें येथे दिसत नाही. पण येथे दुसरेंच कारण आहे तें म्हणजे वर्षाऋतूचा समय, अर्थातच हा प्रसिद्ध हेतु नाही. “ तिच्या चरणांवर लाक्षारसाशिवायच लाली दिसूं लागली. ” येथे सुद्धा असेंच आहे. पायाला लालवटपणा दिसावा म्हणून सामान्यतः लाक्षारस लावतात. तेव्हा लाक्षारस हें कारण व रक्तिमा हें कार्य

आहे. पण येथे कारणाशिवायच कार्य दिसत आहे असें कवि म्हणतो. येथे विभावना आहे व तिच्या द्वारें सामान्य कारणाहून वेगळें असें तिच्या अंगीं मुसमुसणारें यौवन हें कारण सुचविलें आहे. सारांश कारणाशिवाय कार्य दिसणें हें विभावनेचें स्वरूप असलें तरी तिचें कार्य लोकप्रसिद्ध कारणाहून वेगळें असें स्वाभाविक किंवा कविकल्पित कारण सुचवणें हें आहे व विभावना शब्दांतहि हाच अर्थ गर्भित आहे. ( विभाव्यते कारणान्तरम् अस्याम् )

कवि हें कसें साधूं शकतो ? मद्यामुळे येणारी मत्तता व वर्षाकाला-मुळे येणारी मत्तता यांना कवि एक समजतो. लाक्षारसाने येणारें रक्तत्व आणि यौवनामुळे येणारा रक्तिमा यांनाहि तो एक मानतो; व या मानीव एकतेवर विभावनेचा खेळ करतो. अर्थात् येथेहि वस्तुतः दोन कार्यांच्या ठिकाणी कवि आहार्य अभेद मानतो. ही आहार्यअभेदबुद्धि विभावनेंत असते.

**विभावना आणि विरोध**:--विभावना हा विरोधाचा कार्यकारण भावाच्या विरोधावर आधारलेला एक प्रकार आहे. म्हणून विरोधाप्रमाणे यांतहि विरोधाचा आभास व विरोध परिहार सापडतात. पण दोहोंमध्ये फरक असा आहे की, विभावनेंत आपलें लक्ष फलावरच केंद्रित होतें, तर विरोधांत दोन्हीहि विरुद्ध गोष्टींवर सारखेंच केंद्रित होतें. म्हणजेच विभावनेंत एकता-बोध असतो तर विरोधांत मिथोबोध असतो.

विभावनेंतील विशेष गोष्टी अशा —

१. कारणाशिवायहि एखादी गोष्ट घडली असें विभावनेंत वर्णन असलें पाहिजे.
२. ही कारणाशिवाय होणारी कार्योत्पत्ति कविप्रतिभानिर्मित असते, वास्तवतेंत तिला कारण असतें. म्हणूनच येथे विरोधाभास असतो.
३. येथे कारणाशिवाय म्हणजे लोकप्रसिद्ध कारणाशिवाय.
४. अर्थात् येथे रसिकाला दुसरें स्वाभाविक किंवा कविकल्पित कारण प्रतीत होत असतें.

विभावनेचें लक्षण—

**लोकप्रसिद्ध कारणावाचून कार्याची उत्पत्ति झाली असें जेथे वर्णन असतें तेथे विभावना अलंकार होतो.**

उदा.—

(१) न ताप निवला, तृषा न शमली, रजें माखलें।
शरीर, अजुनी नसे कमल एकही चाखलें॥
न सोंड उचलोनियां कमलिनी गजें स्पर्शिली।
हकाक मधुपीं, पहा, अधिच काय आरंभिली॥

—कृष्णशास्त्री चिपळूणकर, अन्योक्तिकलाप.

मधुपांना हकाक करण्याचें कांही कारण नसतांहि त्यांनी हकाक सुरू केली. म्हणजे कारणावाचून कार्य घडलें असें येथे वर्णन असल्यामुळे 'विभावना' अलंकार झाला.

( २ ) अधरा वदनीं रमते लाली रविसहवासानें
। रवि नसतां परि कां रंगावें प्राचीच्या वदनें ?

—गोविंदाग्रज, गुलाबी कोडें.

संध्याकाळीं रविसहवासामुळे पश्चिमेस तांबुसवर्ण दिसतो. लाली येण्याचें कारण म्हणजे सूर्याचा सहवास हें होय, परंतु हें कारण नसतांहि संध्याकाळीं पूर्व दिशा रंगते असें दुसऱ्या ओळींत वर्णिल्यामुळे तेथे 'विभावना' अलंकार झाला.

(३) आला प्रकाश नेत्रीं अंधत्वाचा वरें नुरे गंध,
परि भूप पुत्रमोहें केला पहिल्यापरीसही अंध॥

—मोरोपंत, वनपर्व.

अंधत्व नष्ट झाल्यावर पुन्हा अंधत्व येण्याचें कारण नसतांहि तो राजा पुत्रमोहान्ध झाला असें म्हटलें आहे. म्हणून 'विभावना' अलंकार झाला.

# (२९) विशेषोक्ति

विभावनेंत सुप्रसिद्ध कारणांशिवायच कार्य घडलेलें दाखविलें असतें; तर विशेषोक्तींत सुप्रसिद्ध कारणें असूनहि कार्य घडलें नाही, असें दाखविलें असतें. हाहि विरोधाचा एक प्रकारच होय. अर्थात् येथेहि जो कारणांचा संच दिला असतो त्यावरून कार्य घडत नाही असें म्हटलें असतें. तें कार्य न घडण्याचें खरें कारण किंवा विशेष कारण नसतेंच असें नाही. त्या विशेष कारणाकडेच रसिकाचें चित्त जावें असा कवीचा अभिप्राय असतो. म्हणूनच याला विशेषाची म्हणजे कार्य न घडून येण्याला जें खरें कारण झालें आहे त्याची उक्ति असें म्हटलें आहे.

**विरोध आणि विशेषोक्ति**:—विभावना आणि विरोध यांच्यांत जो संबंध आहे तोच विरोध आणि विशेषोक्ति यांच्यांत आहे. म्हणजे यांतहि विरोधाभास व विरोधपरिहार असतात. तसेंच यांतहि फलाभावावर लक्ष केंद्रित झाल्याने एकताबोध असतो.

**विशेषोक्ति आणि विभावना**—हे दोन्हीहि अलंकार कार्यकरणांतील विरोधावर आधारले आहेत. पण विशेषोक्तींत कारण असूनहि कार्य घडत नाही असें दाखविलें असतें, तर विभावनेंत कारणाशिवायच कार्य दिसून आल्याचें सांगितलें असतें. विशेषोक्तींत कार्याभाव चमत्कृति निर्माण करतो, तर विभावनेंत कार्योत्पत्ति चमत्कृति निर्माण करते.

विशेषोक्तीमध्ये इतर सर्व कारणें असूनहि फलाभाव दाखविलेला असतो; ज्यामुळे कार्य दिसत नाही तें निमित्त रसिकाला शोधावयाचें असतें. कवीने कित्येकदा तें काव्यांतच कोठे तरी सांगितलेलें असतें, तर कित्येकदा तें सांगितलेलें नसेलहि, अशा वेळीं तें विचाराने शोधावें लागतें. कित्येकदा तर तें अतर्क्यच असतें.

विशेषोक्तीमधील विशेष गोष्टी अशा —

१. विशेषोक्तींत सुप्रसिद्ध कारणें असताहि कार्य घडत नाही असें सांगितलेलें असतें.

२. यामुळे आपलें लक्ष कार्य न घडण्यास कोणतें निमित्त झालें याकडे खेचलें जातें.

३. या निमित्तालाच विशेष म्हणतात.

४. हें निमित्त कवीने कोठेतरी सांगितलें असेल किंवा त्याचा तर्क रसिकावर सोपविला असेल. जेव्हा कवि तें सांगत नाही तेव्हा विशेषोक्तींत अधिक वैचित्र्य येतें.

५. हें निमित्त केव्हा केव्हा अतर्क्यहि असूं शकतें.

व्याख्या —

**सुप्रसिद्ध कारणांचा संच असूनहि कार्य दिसत नाही असें जेथे वर्णन असतें तेथे विशेषोक्ति अलंकार होतो.**

उदाहरणें —

(१) उपनिषदें वाचियलीं, गीताहि तशीच कंठगत केली ।
तरिहि पहा विधुवदना मानससदनांतुनी नसे गेली ॥

येथे वैराग्य उत्पन्न व्हावयास कारणें उपस्थित असतांहि कांतेची आसक्ति कमी होणें हें कार्य घडलें नाही असें दाखविलें आहे. म्हणून विशेषोक्ति अलंकार झाला.

(२) भिक्षाटणें अशन तें क्षण एकवार ।
शय्या महीवरि जया न कलत्र पोर ॥
कंथा जया वसन की शतखंड तेंही ।
टाकीच ना तदपि तो विषयांस देही ॥

—वामन.

कारणें अनेक असतांहि मनुष्याकडून विषयत्यागाचें कार्य घडत नाही असें या श्लोकांत वर्णिलें आहे. म्हणून ही विशेषोक्ति आहे. विषयत्याग न होण्याचें निमित्त येथे सांगितलें नाही. पण तें कारण म्हणजे मनोदौर्बल्य होय हें आपणास ओळखतां येतें.

( ३ ) तसाचि उरलों कसा ? पतित मी नसें काय ? कीं;
कृपाचि सरली ? असेंहि न घडे जगन्नायकीं; ।
नसेन दिसलों कसा ? नयन सर्वसाक्षी रवी,
विषाद धरिला म्हणों ? न सुरभी विष क्षीर वी ॥
— मोरोपंत, केकावलि.

पंतांनी वरील केकेंत कांही शंका घेऊन त्यांचें निवारणहि केलें आहे. आपल्या उद्धारासाठी विपुल कारणें असूनहि उद्धाराचें कार्य घडलेलें नाही असें त्यावरून दर्शविलें आहे. म्हणून विशेषोक्ति अलंकार झाला. कवीची पतितता, जगन्नायकाची कृपा न सरणें, ईश्वराचें सर्वसाक्षित्व, विषाद न धरणें हीं अनेक कारणें येथे असूनहि कवीचा उद्धार झाला नाही.

(४) एवढीशी बाई, घोळू घोळू खाई ।
खंडीभर दिलें तरि तृप्तिच नाही !

मुलें आपसांत उखाणे सांगतात त्यांतला हा एक आहे. 'खंडीभर दिलें' हें पुरेसें कारण उक्त असून 'तृप्ति' होण्याचें कार्य घडत नाही असें येथे वर्णन आहे, म्हणून विशेषोक्ति अलंकार झाला. या उखाण्याचें उत्तर 'जातें' हें तर्कानें ओळखलें म्हणजे तृप्ति न होण्याचें खरें कारणहि लक्षांत आलेंच. 'जातें' या निर्जीव वस्तूवर सजीव व्यक्तीप्रमाणे आरोप केला असल्यामुळे येथे 'चेतनोक्ति' हा अलंकार आहे. विशेषोक्ति चेतनोक्तीवर आधारली आहे.

## (३०) असंगति

कवि म्हणतो " कांटा माझ्या पायीं रुतला ! शूळ तुझ्या का हृदयीं उठला. " ज्याला कांटा रुततो त्यालाच वेदनाहि होते, हा नियम आहे. येथे कांटा नायकाच्या पायाला रुततो व वेदना मात्र प्रियेला होते. येथे लौकिक कार्यकारणाचें उल्लंघन झालें आहे. ही असंगति होय.

असंगतींत कार्यकारणांचा विशेष स्वरूपाचा विरोध असतो. जेथे कारण होत असतें तेथेच कार्यहि दिसत असतें. पण येथे कार्य आणि कारण वेगवेगळ्या ठिकाणी एकाच वेळीं दिसून येतात. अर्थात् येथेसुद्धा विभावना विशेषोक्तीप्रमाणेच विरोधाभास असतो आणि विरोधपरिहारहि होतो. हा विरोधाभासहि आहार्य अभेदावर आधारला आहे. ज्याच्या पायाला कांटा बोचतो त्याला जी वेदना होते ती कांट्यामुळे होय. प्रियेला झालेली वेदना कांट्यामुळे नव्हे. नायकावरील प्रेमामुळे किंवा आपुलकीमुळे तिला नायकाचें दुःख पाहून वेदना होते. पण कवि कांट्याची वेदना आणि प्रियकराचें दुःख पाहून झालेली वेदना यांचा अभेद मानून कांटा बोचणें व प्रियेची वेदना यांचा कार्यकारणभाव निर्माण करतो व अशा प्रकारें विरोधाचा आभास निर्माण करतो. या विरोधाभासांतून तो रसिकाला प्रियेच्या प्रेमवृत्तीचें दर्शन घडवून आणतो.

**असंगति आणि विरोध**—असंगतींत विरोधाभास असतो पण तो कार्यकारणभावापुरता असतो. विरोधांतील विरोधाभास हा इतर प्रकारचा असतो. शिवाय असंगतींतील विरोध भिन्न आश्रयावर आधारलेला असतो. म्हणजे कारण एका ठिकाणीं तर कार्य दुसऱ्या ठिकाणी दिसतें. विरोधांतील विरोध जाति–गुण–क्रिया यांच्या बाबतींत असल्याने एकाश्रयनिष्ठ असतो.

असंगतींत दिसून येणाऱ्या विशेष गोष्टी अशा —

१. असंगतींत कार्यकारणभावाने संबंधित असलेल्या गोष्टी एकाच वेळीं दोन वेगवेगळ्या ठिकाणीं निर्माण होतात असें दाखविलेलें असतें.

२. कार्यकारण समान्यतः एकाच ठिकाणी दिसून येत असतां येथे भिन्न ठिकाणीं दाखविले जातात. यांतच असंगतीच्या वैचित्र्याचें बीज आहे.

३. असंगतींत विरोधाभास असला पाहिजे, वास्तवविरोध नको. व्याध एका ठिकाणाहून बाण मारतो व हरिण दुसऱ्या स्थानीं मरतें येथे भिन्नाश्रयाने कार्यकारण राहत असलें तरी असंगति नाही. कारण येथे विरोधाभास नाही.

४. असंगतींत एका कारणाचें कार्य व दुसऱ्या कारणाचें कार्य यांचा अध्यवसाय असतो. यांत आहार्य अभेदबुद्धि असते.

व्याख्या —

**ज्यांच्यामध्ये कार्यकारणभाव आहे अशा दोन वस्तु एकाच काळीं निरनिराळ्या ठिकाणीं कार्यकारणसंबंधाने राहतात असें जेथे वर्णन असतें तेथे असंगति अलंकार होतो.**

उदाहरणें —

(१) कुणि कोडें माझें उकलिल का ?
कुणि शास्त्री रहस्य कळविल कां ॥ ध्रु. ॥

हृदयिं तुझ्या सखि, दीप पाजळे,
प्रभा मुखावरि माझ्या उजळे;
नव रत्नें तूं तुज भूषविलें,
मन्मन खुललें आंतिल कां ? ॥ १ ॥

गुलाब माझ्या हृदयीं फुलला,
रंग तुझ्या गालांवर खुलला;
कांटा माझ्या पायीं रुतला,
शूल तुझ्या उरिं कोमल कां ? ॥ २ ॥

माझ्या शिरिं ढग निळा डवरला,
तुझ्या नयनिं पाउस खळखळला;
शरच्चंद्र या हृदयिं उगवला,
प्रभा तुझ्या उरिं शीतल कां ? ॥ ३ ॥

मद्याचा मी प्यालों प्याला,
प्रिये, तयाचा मद तुज आला;
कुणीं जखडिलें दोन जिवांला
मंत्रबंधनीं केवळ? कां? ॥ ४ ॥

—भा. रा. तांबे, 'कुणि कोडें माझें उकलिल का?'

( २ ) ऊष्ण वारे वाहती नासिकांत,
गुलाबाला सुकविती काश्मिरांत,
नंदनांतिल हलविती वल्लरींला
कोण माझ्या बोललें छबेलीला? ॥

— बी. 'माझी कन्या'

'नासिकांत ( नासिक गांवांत ) वाहणारे ऊष्ण वारे काश्मिरांतील गुलाबांना सुकवितात व नंदनांतील ( नंदनवनांतील ) वल्लरींना हलवितात' असा अर्थ घेतला म्हणजे असंगति अलंकार संभवतो. ( 'नासिक' 'नंदन' हे शब्द श्लिष्ट आहेत. 'काश्मिरांतील गुलाब' म्हणजे दोन गाल ).

## (३१) विषम.

मम्मटाने काव्यप्रकाशांत विषमालंकाराचे प्रकार दिलेले आहेत पण त्या सर्व प्रकारांना सामान्य असें लक्षण दिलें नाही. तें सामान्य लक्षण ठरविण्याचा आपण प्रथम प्रयत्न करूं आणि मग या प्रकारांचें विवेचन करूं. मम्मटाने विषमाचे दिलेले चार प्रकार असे —

१. अत्यंत वैधर्म्यामुळे जेथे दोन गोष्टी एकत्र येणें अयोग्य ठरतें.

२. एखादें कार्य आरंभिलें असतां इष्टप्राप्ति होण्याचें तर राहोच; उलट कांही तरी अनिष्ट मात्र घडून येतें.

३. कारणाच्या गुणांशी विरुद्ध असे कार्याचे गुण दिसून येणें.

४. कारणाच्या क्रियेशी विरुद्ध अशी कार्याची क्रिया असणें. वरच्या प्रकारांपैकीं कोणतीहि एक गोष्ट दिसून आली म्हणजे विषम अलंकार होतो.

पुढे ' सम ' नांवाचा अलंकार येईल. त्याच्या अगदी उलट विषम अलंकार आहे. सम म्हणजे एकमेकास अनुरूप अशा गोष्टी एकत्र येणें. यावरून विषम म्हणजे एकमेकांस अननुरूप अशा गोष्टी एकत्र येणें असा अर्थ निघतो. याला " **अननुरूप संसर्ग** " असें म्हणतात. तेव्हा **विषम म्हणजे अननुरूप संसर्ग**. हा अननुरूप संसर्ग विषमाच्या सर्व प्रकारांत सामान्य आहे असें रुय्यक म्हणतो. अननुरूप संसर्गाची ही कल्पना जगन्नाथाने घेऊन विषमाचें वर्गीकरण केलें तें असें —



मम्मटाने दिलेले प्रकार अशा प्रकारें एका सूत्रांत गोवतां येतात व विशेषालंकाराचें पद्धतशीरपणें स्वरूप समजून घेतां येतें.

विषम म्हणजे अनुरूप नसलेल्या गोष्टी एकत्र येणें. अशा गोष्टी कवि एकत्र आणतो आणि त्यांपासून वैचित्र्य निर्माण करतो. " शिरीष पुष्पाप्रमाणे नाजुक अशी ही प्रिया कुठे, आणि तिला ताप देणारा हा मदनज्वर कुठे" असें कवि म्हणतो. येथे कवीच्या दृष्टीला दोन अननुरूप गोष्टी एकत्र आलेल्या दिसल्या. अशा प्रकारच्या नायिकेला विरहताप सहन करण्याची पाळी येणें योग्य नाही असें कवीला म्हणावयाचें आहे. किंवा मदनाला उद्देशून अग्निमित्र म्हणतो, " कोठे तें तुझें नाजुक शस्त्र; आणि कोठे त्यापासून होणारा हा तीव्र मनस्ताप ! " येथेंहि या दोन गोष्टी एकत्र शोभत नाहीत असें त्याला म्हणावयाचें आहे. या दोन विरुद्ध गोष्टी एकत्र आल्या आहेत. सारांश विषम हा विरोधाचाच एक प्रकार असून स्वतंत्र अलंकार म्हणून वेगळा झाला आहे.

तेव्हा विषमाचें सामान्य लक्षण आपल्याला असें सांगतां येईल--

**एकमेकांशीं अनुरूप नसलेल्या गोष्टी एकत्र आल्या आहेत असे जेथे कवि दाखवितो, किंवा कोणत्याहि दोन गोष्टींचा घडलेला संसर्ग अननुरूप किंवा अयोग्य आहे असें कवि दाखवितो तेव्हा विषम अलंकार होतो.**

## विषमाचे प्रकार

संसर्ग दोन प्रकारें येतात. अगोदरच सिद्ध असलेल्या गोष्टी एकत्र आल्या म्हणजे तो संयोगरूप संसर्ग असतो. किंवा एक वस्तू दुसऱ्यापासून निर्माण होऊन त्या एकत्र येतात, तो उत्पत्तीने होणारा संसर्ग येतो. कोणत्याहि प्रकारांत अननुरूपता असू शकते. ती असली म्हणजे विषम झाला.

**प्रकार १ ला**--जेथे दोन गोष्टींमध्ये मूळचेच विरुद्ध धर्म असतात व अशा गोष्टी एकत्र येणें हें अयोग्य असतें असें कवि सांगतो, तेव्हा

विषमाचा पहिला प्रकार होतो. " कोठे इंद्राचा ऐरावत व कोठे शामभट्टाची तट्टाणी " असा हा प्रकार आहे.

> किती वय ? कसें तप प्रखर ? काय विश्वास तो ?
> ध्रुव ध्रुव खरा; स्तवा उचित होय विश्वास तो; ।
> कशी तुळितसां तुम्ही प्रकट मेरुशीं मोहरी ?
> प्रसाद करितां उणें अधिक नाठवा, हो ! हरी ! ॥

—मोरोपंत, 'केकावलि.'

ध्रुवाची व आपली तुलना मुळीच अनुरूप नाही. कोठे मेरु पर्वत व कोठे मोहरी. असें वर्णन कवीने केलें असल्यामुळे येथे ' विषम ' अलंकार झाला.

**प्रकार २ रा**—एका घटनेपासून निर्माण होणारें कार्य अगदी उलट धर्माचें निपजतें असें कवि सांगतो तेथे विषमाचा दुसरा प्रकार होतो. याचेहि तीन प्रकार होतात. आपण एखादें कार्य करावयास जातो त्यापासून इष्ट फळ मिळेल अशी आपणास अपेक्षा असते. पण कार्य पुरें झाल्यावर आपणास असें दिसतें की अपेक्षित कार्य साधलें तर नाहीच पण त्यापासून अनिष्ट मात्र घडलें. हा विषमाचा दुसरा प्रकार होय. " विनायकं प्रकुर्वाणः रचयामास वानरम् " असा हा प्रकार आहे.

उदाहरण—

> (१) लाभे महेशाश्रय दैवयोगें
> तो चंद्र झाला कृश दुःखवेगें
> पराश्रयीं लाभ घडे कुणाला ?
> इच्छा तयाची धरिता कशाला ?

—मराठी सुभाषित.

सुदैवाने चंद्राला शंकराचा आश्रय मिळाला पण त्यामुळे उत्कर्ष होण्याऐवजी चंद्र दुःखाने क्षीण मात्र झाला ! इष्टार्थ सिद्धीस न जातां त्याच्या उलट मात्र घडलें असें येथे वर्णन असल्यामुळे 'विषम' अलंकार झाला.

(२) भक्ष्यार्थ सर्पपेटकिं मूषक शिरतां तयासि अहि खाय ॥

—केमकर शास्त्री, अलंकार विकाश.

येथे भक्ष्य शोधावयाच्या प्रयत्नांत उंदिराचें मरण ओढवलें असें म्हटलें आहे म्हणून विषमालंकार.

(३) गोविंदाग्रजांची 'प्रेम आणि मरण' ही समग्र कविता या अलंकाराचें उत्तम उदाहरण होय.

**प्रकार ३ रा**:—कारणांत जे गुण असतात तेच कार्यांत उतरावयास पाहिजेत. तसे ते उतरले तर योग्य होत. दिलीपाला रघु हा अगदी अनुरूप पुत्र होता असें सांगतांना कालिदास म्हणतो, "ज्या प्रमाणे दिव्यापासून लावलेला दुसरा दिवा प्रकाशयुक्तच्च असतो अगदी तसाच कुमार रघु होता." आपल्या कारणापासून (पित्याहून) गुणांनी तो मुळीच्च भिन्न नव्हता. ही झाली योग्यता किंवा अनुरूपता. पण जेथे कारणाच्या गुणाहून अगदी विरुद्ध गुण दिसून येतात तेथे कार्यकारणांचा गुणांच्या बाबतींत अननुरूप संसर्ग दिसून येत असल्याने विषम अलंकार होतो. हा विषमाचा तिसरा प्रकार. 'सूर्यापोटीं शनैश्चर' असा हा प्रकार आहे.

उदा.—

गोरा नंद, यशोदा गोरी, वसुदेवदेवकी गोरा।
तत्सुत काळा कां तूं ? भोळे जन ठकविशी हृदयचोरा ॥

—मोरोपंत, 'आर्या केकावली.'

कृष्णाचे मातापिता गोरे पण कृष्ण काळा. कारणगुणाहून कार्यगुण वेगळे निष्पन्न झाले म्हणून विषम अलंकार.

**प्रकार ४ था**——जसें गुणांचें तसेंच क्रियेचें. कारणाच्या क्रियेच्या विरुद्ध जेव्हा कार्याची क्रिया दिसून येते तेव्हा विषमाचा हा प्रकार होतो.

उदाहरण——

या भटवंशीं महाप्रतापी ख्यात जाहले असूनिया
तुळशीमध्यें भांग निघाली अभद्र ऐशी कोठुनिया !
निजनामाचा ‘ गाजी ’ ऐसा अर्थ उरवुनी तो गेला,
तर हळहळली आर्यमाउली ऐकुनि त्याच्या निधनाला,
मरणाआधिच मरून आणुनि काळोखी निजराष्ट्राला,
तूं गेलासी करून ‘ पाजी ’ अहह ! पितामहनामाला !

——केशवसुत, ‘ दोन बाजी ’

महापराक्रमी भटवंशांत पहिल्या बाजीरावासारखा वीर जन्मला, पण त्याचा नातू जो दुसरा बाजीराव तो मात्र अत्यंत नादान निपजला ! वीरकुलांत वीर पुरुष जन्मास येणें हें योग्यच ठरतें, पण अत्यंत नालायक माणूस त्याच कुळांत जन्मणें ही अननुरूप गोष्ट होय. म्हणून वरील उदाहरणांत विषम अलंकार ( चौथा प्रकार ) झाला.

## (३२) अधिक

विषमालंकाराप्रमाणेच अधिक अलंकारसुद्धा वैषम्यावरच आधारला आहे. मात्र हें वैषम्य आधार किंवा आश्रय आणि त्यावर राहणारा आधेय किंवा आश्रित यांच्या संबंधास अनुलक्षून असतें. अधिक म्हणजे “ परिमाणानें मोठें. ” सामान्य संबंध असा असतो की आधार किंवा आश्रय हा आधेय किंवा आश्रितापेक्षा परिमाणानें मोठा असतो. पण आधारापेक्षा त्या आधारानें राहणारी वस्तु ( आधेय ) मोठी आहे असें कोणी दाखवून दिलें तर ती विषमता होईल. कवि अशा वैषम्यांतून चमत्कृति निर्माण करतो व त्याद्वारें प्रकृताचा उत्कर्ष तो रसिकास सांगतो.

सामान्यतः 'आधेय' वस्तूच यांत प्रकृत असते व आधारापेक्षा आधेय मोठें आहे असें दाखविण्यांत आधेयाचा उत्कर्ष आपोआपच होतो. "ज्या श्रीकृष्णाच्या उदरांत प्रलयकालीं ब्रह्मांडें समावतात, त्यांत मुनिदर्शनाचा आनंद मावेनासा झाला." येथे आनंद हा प्रकृत आहे व तो आधेयापेक्षा मोठा आहे हें दाखविण्यांत त्याचा उत्कर्ष सरळपणें साधला आहे.

पण आधेय प्रकृत असतां कित्येकदा कवि आधेयाचें मोठेंपण वर्णन करूनहि प्रकृताचा उत्कर्ष साधतो.

उदा.—"तुझे गुण ज्यांत समावतात तें वाग्ब्रह्म किती मोठें असावें बरें!" येथे गुण प्रकृत आहेत व कवीने वाग्ब्रह्माचें मोठेंपण वर्णन केलें आहे. पण त्यामुळेच गुणांचेंहि मोठेंपण दाखविलें आहे. म्हणून आधाराचा मोठेपणा वर्णन करूनहि कवीने प्रकृताचा उत्कर्ष साधला आहे. अधिकाच्या या प्रकारांत व्यंजनेचा खेळ असल्याने तो अधिक रमणीय झाला आहे.

पण कित्येकदा आधारहि प्रकृत असूं शकतो व त्याचाहि प्रकर्ष दाखविला जातो. उदा.—"तुझ्या हृदयाचा विस्तार कसा वर्णन करावा; त्यामध्ये तर विश्वाश्रय भगवान् सुखाने राहतो!!" येथे राजाचें हृदय हें प्रकृत आहे.

अधिक अलंकाराला अपेक्षित असलेलें हें आधिक्य कविप्रतिभानिर्मित असलें पाहिजे; वास्तविक नसावें. ईश्वर जगापेक्षा मोठा आहे, किंवा पिंजरा पोपटापेक्षा मोठा आहे यांत अधिकालंकार नाही.

**अधिक आणि विषम**—दोन्हीहि वैषम्यावरच आधारले आहेत व यांच्यांतील हें वैषम्यविषयक साहश्य इतकें आहे की कित्येक पद्यांत एकाच्या दृष्टीने अधिक तर दुसऱ्याच्या दृष्टीने विषम असूं शकतो. कांही आलंकारिकांच्या मतें तर अधिक हा वेगळा अलंकार मानण्याचें कारण नाही. पण असें असलें तरी त्यांच्यातील भेद दाखविला पाहिजे. अधिकांतील वैषम्य आधारआधेयांच्या परिमाणाबद्दल असतें तर विषमांत तें कार्यकारणांच्या गुणांबद्दल किंवा क्रियेबद्दल असतें. शिवाय अधिकाचा उद्देश प्रकृताचा उत्कर्ष दाखविण्याचा असतो, तर विषमाचा उद्देश केवळ वैषम्य दाखविण्याचा असतो.

अधिकालंकारांतील आवश्यक गोष्टी अशा—

१. अधिकालंकार हा आधार व आधेय यांच्या परिमाणांतील वैषम्यावर आधारलेला आहे.

२. त्यांत आधारापेक्षा आधेय मोठें आहे असें दाखविलेलें असतें.

किंवा

३. आधाराचें मोठेपण दाखवून त्याद्वारें आधेयाचें मोठेपण सुचविलें असतें.

४. अधिकालंकाराचा हेतु प्रकृताचा गुणोत्कर्ष दाखविण्याचा असतो.

५. सामान्यतः आधेय हें प्रकृत असतें; पण कित्येकदा आधारहि प्रकृत असू शकतो.

६. हें आधिक्य किंवा न्यूनत्व कविकल्पित असलें पाहिजे; वास्तविक नको.

म्हणून अधिकाची व्याख्या अशी—

**आधारापेक्षा आधेय वास्तविक लहान असूनहि जेव्हा तें आधारापेक्षा मोठें आहे असें वर्णन असतें; किंवा एखादा आधार हा अत्यंत मोठ्या आधेयाला पुरेसा झाला आहे असें वर्णन असतें, अशा ठिकाणीं अधिक अलंकार होतो.**

उदाहरणार्थ —

( १ ) गीतध्वनि स्तुतिध्वनि —वाद्यध्वनि —पुष्पवृष्टि—लक्षा या ।
न पुरे ब्रह्मांड, प्रभुरुचिसहि शक्रादि–दृष्टि लक्षाया ॥

—मोरोपंत, 'हनुमंत रामायण'

रामाचें यश हा विषय येथे प्रस्तुत व आधेय आहे. रावणास मारल्यावर देवादिकांकडून रामयशोवर्णनपर जे गीतांचे, वाद्यांचे वगैरे ध्वनि उठले ते ब्रह्मांडांतहि मावले नाहीत असें येथे वर्णन आहे. ब्रह्मांड हें जें आश्रयस्थान त्याचें मोठेंपण सर्वविदित आहे. पण त्या आश्रयापेक्षा आधेय अधिक मोठें आहे, असें म्हणण्यामुळे येथे ' अधिक ' अलंकार झाला.

( २ ) ब्रह्मांड अखिल ज्याच्या उदरीं प्रलयांत मावतसे ।
तोहि भगवान् सुखाने तुझिया हृदयीं सदैव राहतसे ॥
—भाषांतर.

या उदाहरणांत आधाराचें मोठेंपण दाखविलें आहे. ब्रह्मांडाला आपल्या उदरांत साठविणारा परमेश्वरच अगोदर किती मोठा. तोहि ज्याच्या हृदयांत सुखाने राहतो तें हृदय किती विशाल असलें पाहिजे! म्हणून येथे 'अधिक' अलंकार झाला.

अधिक अलंकारांतील आधिक्य जसें महापरिमाणवाचक आहे तसें तें अल्पपरिमाणवाचकहि असूं शकेल. उदाहरणार्थ—

" जी रत्नखचित मुद्रिका डाव्या करांगुलीला शोभवीत होती तीच आज तिच्या हातांत जपमालेप्रमाणे दिसूं लागली. काय ही तिची दशा !"

हें एका विरहिणीचें वर्णन आहे. विरहाने तिचें अंग किती कृश झालें हें यांत दाखविलें आहे. मुद्रिकेच्या आधाराचें अशा प्रकारें अल्पत्व दाखविलें आहे. अशा ठिकाणीं कोणी '**अल्प**' अलंकार मानतात; पण त्याचा समावेश अधिक अलंकारांत करणेंच युक्त आहे. वेगळा अलंकार मानण्याची गरज नाही.

## (३३) व्याघात

एक गृहस्थ आपली ओळख सांगतांना म्हणाला— " मी जन्मभर मौनव्रत पाळतों; माझा पिता ब्रह्मचारी होता; माता वांझ होती; आणि आजा निपुत्रिक वारला. "—ज्या शब्दांनी या गृहस्थाने आपली माहिती सांगितली, त्याच शब्दांनी तिचें खंडनहि झालें. अशा बोलण्याला "**वदतो व्याघात**" म्हणतात. ज्या साधनाने आपण एखादी गोष्ट करावयास जातों त्यानेच ती नाहिशी होणें हें व्याघाताचें सामान्य स्वरूप आहे. अशा प्रकाराचा उपयोग कवि जेव्हा काव्यांत करून घेतो तेव्हा व्याघात अलंकार होतो.

" शंकराने दृष्टिक्षेपाने मदनाला जाळलें. स्त्रिया दृष्टिक्षेपानेच त्याला पुनः जिवंत करतात. " येथे व्याघातच आहे. शंकर आणि स्त्रिया हे दोन येथे प्रतिस्पर्धि आहेत. त्यांपैकी शंकराने दृष्टि या साधनाने मदनदहनाचें कार्य साधलें. स्त्रियांनी तेंच साधन घेतलें आणि शंकराचें कार्य उलट फिरवून टाकलें. येथे एका साधनाने एकाने जी गोष्ट साधली, ती त्याच साधनाने नाहीशी करून टाकली असा प्रकार आहे म्हणून व्याघात आहे. येथे प्रकृत ' स्त्री ' आहे व शंकर उपमान आहे व त्यांचें गर्भित औपम्य असून त्यांत व्यतिरेकाची छटा आहे. येथे अगोदर एक स्थिति एकाने निर्माण केली व नंतर दुसऱ्याने ती स्थिति त्याच साधनाने नाहीशी केली.

पण व्याघाताकरिता एखादी गोष्ट सिद्ध झालीच पाहिजे असें नाही. एखादा ती गोष्ट साधण्याचा प्रयत्न करीत असतो. अशा वेळीं ती गोष्ट सिद्ध होण्यापूर्वीच दुसरा त्याच साधनाने ती गोष्ट नाहीशी करतो. एक प्रियकर प्रवासाला निघाला. आपल्या प्रियेचें सांत्वन करतांना तो म्हणतो, " प्रिये, तूं इतकी दुबळी झाली आहेस की तुला प्रवास मुळीच सोसायचा नाही. " त्यावर ती प्रिया लागलीच उत्तर देते, " नाथ, म्हणूनच तर मी प्रवासाला येतें; एवढ्या दुबळेपणांत आपला विरह मला कसा सहन होईल ! " येथे ज्या मुद्याच्या आधारावर प्रियकर आपलें म्हणणें पटवून देत होता तोच मुद्दा घेऊन प्रियेने त्याचा हेतु उलटविला. येथेहि व्याघात आहे.

**व्याघात आणि विषम**–व्याघाताचें अशा प्रकारें विषमाच्या दुसऱ्या-प्रकाराशीं साम्य दिसतें. तेथेहि एक साधत असतांना भलतेंच कांही तरी साधलें जातें. पण या दोहोंत सूक्ष्म पण महत्त्वाचा फरक आहे. विषमामध्ये मूळ गोष्ट साधूं पाहणारा आणि अखेर भलती गोष्ट निर्माण करणारा कर्ता तोच असतो. येथे साधन जरी एकच असलें तरी कर्ते भिन्न असतात. शिवाय विषमांत मूळ गोष्ट साधत नाही. दुसरीच निष्पन्न होते. पण येथे एका प्रकारांत तरी मूळ गोष्ट प्रथम निष्पन्न होते व त्यानंतर दुसरा ती नाहीशी

करतो. विषमांत गणपति निर्माणच होत नाही; एकदम वानरच बनतो. पण व्याघातांत एकाने गणपति केल्यावर दुसरा तीच सोंड पाठीला चिकटवून मूळचा गणपती नाहीसा करतो.

त्याच साधनाने विरुद्ध गोष्टी निर्माण करणें ही व्याघातांतील मध्यवर्ती कल्पना आहे. म्हणून हा अलंकारहि विरोधाभासावर आधारलेला आहे.

**व्याघातांतील विशेष गोष्टी अशा—**

१. व्याघातांत एकाने ज्या साधनाने एक क्रिया केली त्याच साधनाने दुसरा ती क्रिया नाहींशी करतो असें वर्णन असतें.

२. हे दोन कर्ते एकमेकांचे प्रतिस्पर्धी असतात.

३. कित्येकदा त्यांच्यांत उपमेयोपमान भाव असतो. तसें असलें तर त्यांत व्यतिरेकाची छटा असते.

४. व्याघातांत कित्येकदा साधलेली गोष्ट नाहीशी करण्यांत येते; तर कित्येकदा एक गोष्ट साधण्याच्या क्रमांतच दुसरी व्यक्ति ती गोष्ट उलटून देते.

५. पहिल्या प्रकारांतील वैचित्र्य ती गोष्ट नाहीशी करण्यांत असतें; तर दुसऱ्यांतील वैशिष्ट्य ती गोष्ट उलटाविण्यांत असतें.

व्याघाताची व्याख्या——

**ज्या साधनाने एखादी व्यक्ति एक गोष्ट सिद्धीला नेते किंवा सिद्ध करण्याचा प्रयत्न करते, त्याच उपायाने दुसरी व्यक्ति ती सिद्ध झालेली गोष्ट नाहीशी करते किंवा त्या दुसऱ्यावर उलटवून देते, असें जेथे वर्णन असतें तेथे व्याघात अलंकार होतो.**

उदाहरणें—

(१) दीन–तरूंना दुर्जन वचनांनी तोडिती सदैव कसे ।
पल्लवित करिति सज्जन वचनेंच तयास उल्लसित तैसें ॥

—रसगंगाधर ( भाषांतर )

दुर्जन ज्या उपायाने दीनांना दुःख देतात; त्याच उपायाने सज्जन त्यांच्या दुःखाचा परिहार करितात असें येथे वर्णन आहे, म्हणून व्याघात अलंकार.

(२) शंकरें जाळिला काम दृष्टीने, त्यास कामिनी
दृष्टीनेच क्षणांआंत अहो ! आणिति जीवनी.

शंकराने दृष्टीने जें कार्य केलें तें त्याच साधनाने स्त्रीने उलटविलें असें येथे दाखविलें, म्हणून व्याघात अलंकार.

(३) **प्रियकर**---प्रिये, माझ्याबरोबर तूं प्रवासाला येऊं नकोस. इथेच थांब. मी थोड्याच दिवसांत परत येईन. तूं इतकी कृश झाली आहेस की तुला प्रवासाचे श्रम मुळीच सहन व्हावयाचे नाहीत.

**प्रिया**---मी कृश झालें आहे ना ? म्हणूनच म्हणतें आपण मला आपल्या बरोबर न्या. कारण कृशतेमुळे मला आपला विरह मुळीच सहन व्हायचा नाही.

येथे ज्या उपायाच्या योगाने प्रियकर आपला हेतु साधूं पाहत होता त्याच उपायाने प्रियेने नेमका तो उलटवला. म्हणून व्याघात अलंकार.

(४) 'प्रिया' म्हणुनि ठेविशी मज घरींच नाथा जरी
मदीय अनुराग हा क्षणहि राहुं देना तरी ।
असें प्रकृति भीरु ही तरि धरूनि बाहून्तरीं
करी मज सुशांत बा सकल भीतिला तूं हरी ॥

— अलंकारचंद्रिका.

येथे 'प्रेम' या साधनामुळे राम सीतेस घरीं ठेवण्याचा प्रयत्न करतो. पण सीता त्याच कारणास्तव वनास नेण्याबद्दल सांगत होती. उत्तरार्धांत सीतेचें भीरुत्व हें कारण आहे. त्यामुळे राम सीतेला घरीं राहावयास सांगत होता. तर त्याच कारणास्तव तूं मला क्षणभरहि अलग ठेवूं नयेस असें सीता म्हणत होती. अशा प्रकारें रामाने ज्या उपायाने कार्य साधण्याचा प्रयत्न केला त्याच उपायाने सीतेने तो उलटविला, म्हणून व्याघात अलंकार.

## (३४) विशेष

विशेष अलंकाराचे मम्मटाने पुढील तीन प्रकार दिले आहेत.

१. प्रसिद्ध आधाराशिवायच आधेय राहतें असें जेथे वर्णन असतें;

किंवा

२. एकच वस्तु एकाच रूपाने एकाच वेळी अनेक ठिकाणी दिसते;

किंवा

३. एक कार्य करीत असतां दुसरी अशक्य किंवा असंभवनीय गोष्ट केली असें जथे वर्णन असतें.

विशेषालंकाराची सामान्य व्याख्या करण्यांत आली नाही व ती करतां येणें फारसें शक्यहि नाही. कारण वरील तीन प्रकारांत सामान्य अशी कोणतीहि गोष्ट दिसत नाही. ते प्रकार विरुद्ध संबंधावर आधारले आहेत एवढेंच फार तर म्हणतां येईल. आलंकारिकांनी मानलेला सामान्य नांवाचा एक अलंकार आहे, त्याचा आणि या विशेषाचा कोणताहि संबंध नाही.

**विशेष म्हणजे अतिशय**—या अर्थाने विशेष हा शब्द साहित्य-शास्त्रांत अनेकदा वापरला गेला आहे. पण एवढ्याने विशेष अलंकाराचें लक्षण सांगितल्यासारखें होत नाही. खरा प्रकार असा दिसतो. विशेष अलंकार हा विरोधावर आधारलेल्या अलंकारांपैकी एक आहे. **विरोधमूलक इतर अलंकार निश्चित केल्यावर** इतर **जें विरोधमूलक वैचित्र्य काव्यांत दिसून आलें तें विशेषालंकारांत घालण्यांत आलें.** विरोधाभासांत जाति गुण-क्रिया यांचा विरोध दिसतो; विभावना, विशेषोक्ति व असंगति यांच्यांत कार्यकारणभावांतील विरोध दिसतो; विषमांत अननुरूप संसर्ग दिसतो; अधिकांत आधाराधेयांतील विरोध दिसतो; व्याघातांत निष्पत्तिविरोध दिसतो. अशा प्रकारें निरनिराळ्या प्रकारचे विरोध निश्चित केल्यावर जें कांही इतर विरोधमूलक वैचित्र्य राहिलें तें सर्व विशेषालंकारांत घालण्यांत आलें. **विशेषालंकार हा या दृष्टीने विरोधमूलक वर्गाचा शेष** (Residue)

आहे. मग त्याची सलग व्याख्या होणें कसें शक्य आहे ? त्यांत अतिशयोक्ति आहे एवढेंच सामान्यतः सांगतां येतें. म्हणूनच विशेषालंकाराचे प्रकार व उदाहरणें दिल्यानंतर मम्मट म्हणतो–"अशा प्रकारें ( विशेषाच्या ) सर्व प्रकारांत सामान्यतः अतिशयोक्तीच प्राणभूत असलेली दिसून येते. सामान्यतः अतिशयोक्तीशिवाय अलंकारच सापडत नाही" विशषाचें सामान्य लक्षण सापडत नाही. विशेषाचे प्रकार म्हणजे एका वस्तूचे तीन प्रकार नाहीत; ते वस्तुतः तीन वेगवेगळे अलंकार आहेत असे रुय्यकहि सांगतो. तेव्हा विशेषाचें सामान्य लक्षण शोधण्याच्या भरीस न पडतां त्याचे प्रकार पाहणें हेंच चांगलें.

## विशेष : प्रकार १ ला

**प्रसिद्ध आधाराशिवाय आधेय राहतें असें जेथे वर्णन केलेलें असतें तेथे विशेषाचा पहिला प्रकार होतो.**

उदा.—

वंद्य न ते कवि कैसे जे होऊनिही दिवंगत जनास ।
स्वोक्तें अनंत कालावधि लाविति मान डोलवायास ॥

—भाषांतर ( वि. वा. भिडे )

कवि दिवंगत झाले पण त्यांची वाणी अजूनहि आपला प्रभाव दाखविते. येथे कविवाणी, कवि या आधाराशिवायच राहत आहे असें दाखविलें आहे. म्हणून विशेष अलंकार होय.

## विशेष : प्रकार २ रा

**एकच वस्तु एकाच रूपाने एकाच वेळीं अनेक ठिकाणीं दिसून येते असें वर्णन असतें तेथे विशेषाचा दुसरा प्रकार होतो.**

उदा.—

ती तव हृदयांत वसे, वचनांत विलोचनांत तीच असे ।
मज मंदभागिनीला आता अवकाश सांग कोठ असे ॥

—भाषांतर ( वि. वा. भिडे. )

एक स्त्री आपल्या पतीला सवतीबद्दल असें सांगते. येथे ती एकच सवत हृदय, बोलणें व डोळे अशा अनेक ठिकाणी एकाच वेळीं राहते असें दाखविलें आहे. म्हणून येथे विशेष अलंकार झाला.

## विशेष : प्रकार ३ रा

**एक कार्य करीत असतां अशक्य कोटींतील असें दुसरेंच कार्य घडून येतें तेथे विशेषाचा तिसरा प्रकार होतो.**

उदा.—

( १ ) आतां सोडवितों पशु, खळबळ पळ न लगतांचि पळवीतों ।
मी विजय असें तुजचि न, सकळांही कौरवांसि कळवीतों ॥

—मोरोपंत, 'विराटपर्व.'

कौरवांनी पळविलेल्या विराटाच्या गाई सोडविण्यासाठी अर्जुन सिद्ध झाला, त्या वेळीं त्याने उत्तर याला उद्देशून जें विधान केलें तें वरील आर्येत दिलें आहे. " पशु सोडविण्याचें कार्य करीत असतांनाच ' खळबळ पळविण्याचें, ' तसेंच ' मी कोण आहे हें सर्वांस कळविण्याचें कार्य ' मी करतों " असें वर्णन असल्यामुळे ' विशेष ' अलंकार झाला.

( २ ) चोरें पिंडिवरीच देउनि पदें तो चांदवा सोडिला
भक्तें देह समर्पिला म्हणुनिया गौरीपती तुष्टला
कैलासाप्रति तस्करा मग शिवें नेलेंचि, भोळा असा
त्याचें चिंतन हो करा निजमुखें पाहों तरे ना कसा

—अलंकारचंद्रिका.

चोर चोरी करावयास गेला पण तें करीत असतां त्याला अशक्य अशा दुसऱ्या गोष्टीची म्हणजे कैलासाची प्राप्ती झाली म्हणून विशेष अलंकार झाला.

## विशेषाचा आणखी एक प्रकार : लेश

**गुण हेच दोष ठरले आहेत; किंवा दोष हेच गुण ठरले आहेत असें जेथे वर्णन केलेलें असतें तेथेहि विशेष अलंकार होतो.**

काही आलंकारिकांनी याला लेश म्हणून वेगळा अलंकार मानलें आहे. पण तसा तो मानण्याची गरज नाही.

उदा.—

तुझी वाणी कोणी म्हणति गुण हा अद्भुत असे ।
मला वाटे मोठा तुजजवळि हा दोषचि वसे ॥
शुका, तीच्या योगें सतत पिंजऱ्यामाजि पडशी ।
पडल्या ! स्वातंत्र्याची अनुपम सुखें सर्व मुकशी ॥

—कृष्णशास्त्री चिपळूणकर, अन्योक्तिकलाप.

शुकाची वाणी हा गुण असल्यामुळे त्याला पिंजऱ्यांत बंदिस्त ठेवण्यांत येतें, तेव्हा तो गुण दोषस्वरूप आहे असें वर्णन केल्यामुळे 'लेश' नामक अलंकार—विशेषाचा जो प्रकार—तो येथे झाला.

सारांश, विरोधमूलक कोणत्याहि स्वतंत्र प्रकारांत जें पद्य बसत नाही तें विशेष अलंकारांत बसू शकतें. कारण विशेष हा विरोधमूलक अलंकारांचा शेष ( Residue ) आहे.

———

## विरोधमूलक अलंकारांचीं अभ्यासार्थ उदाहरणें:—

( १ ) क्लीब म्हणुनि पाठविलें मन मीं त्या प्रियेस हांकेला ।
तो तें तेथेच रते, पाणिनिनें सत्य घात हा केला ॥

केमकर,—'अलंकारविकाश'

( २ ) ते राजसुता सीता सेवितसे प्रेमयुक्त कमलाक्षा;
जीचे वनसंचारिं दिसती पद रक्त, जरि नसे लाक्षा ॥

—मोरोपंत, मंत्ररामायण

( ३ ) पळतां धावोनि तिला त्या केशांतें धरूनि आकर्षी
ज्यां राजसूय यज्ञीं अभिषेचिति बहु महर्षि नाकर्षी ॥

—मोरोपंत, सभापर्व

( ४ ) कढीभातखाऊ म्हणती ब्राह्मणां जगांत
दिली कांस ज्यांची म्हणुनी हासती, हसोत,
तयांनीच करणी केली प्रसंगीं अचाट
खोल गढे परसत्ता ती ढासळली लाथें

—विनायक, ' महाराष्ट्रलक्ष्मी '

( ५ ) सहदेवासि म्हणे, " त्वां कां रे ! जीव न दिला ? परवश स्त्री ।
कसि देखिली ? सहाता दासीचाहि न विलापरव शस्त्री ॥ "

—मोरोपंत, उद्योगपर्व.

( ६ ) मरणांत खरोखर जग जगतें ।

—भा. रा. तांबे

( ७ ) वज्रापेक्षांहि कठिणें, पुष्पाहूनि मृदू अशीं !
लोकोत्तरांचीं हृदयें कोणा जाणवतील तीं ॥

—परशुरामपंत गोडबोले.

( ८ ) पुष्पाविण येई वास
वाऱ्याविण चाले श्वास
हर्षाविण आता हास
मरणाविण सुटका झाली
कन्हय्या बजाव, बजाव, मुरली ।

— गोविंदाग्रज

( ९ ) मेघ गर्जेना ! पाणी बरसेना !
कैसें रान हिरवें राही ? कांहीं कळेना ॥ १ ॥
आकाशाच्या उद्यानांत कुणी लावी दिव्य वेली !
चंद्र–सूर्य–फुलें आलीं ! वेली दिसेना ॥ २ ॥
काय अभिनव झालें । बाग नभीं जे फुललें–
रातोरात सुकुनी गेले ! कैसे कळेना ! ॥ ३ ॥

—गु. ह. देशपांडे, ' कांहीं कळेना '

(१०) सौंदर्य पुष्पासम वर्णितात
झालें मला कंटकसें प्रतीत ।
सौंदर्य मानोत सुधानिधान
तें जाहलें मज परंतु विषासमान ॥

—केशवसुत.

## (३५) अर्थांतरन्यास

साधर्म्य आणि विरोध या संबंधावर आधारलेले अलंकार आपण आतापर्यंत पाहिले. आता न्यायाश्रित अलंकाराचें विवेचन करूं. त्यांपैकी तर्कन्यायमूल अलंकार प्रथम आपण घेऊं. पुष्कळदा बोलतांना आपण असें करतों. एखादी विशेष गोष्ट सांगत असतां आपण सामान्य नियमाने तिचें समर्थन करतों किंवा एखाद्या सामान्य नियमाचें समर्थन विशेष गोष्टीने करतों. काव्यामध्ये जेव्हा असा प्रकार दिसतो तेव्हा तेथे अर्थांतरन्यास अलंकार होतो. अर्थांतर=दुसरा अर्थ. (अर्थात् येथे सामान्य-विशेष यांपैकी अर्थ अपेक्षित आहे.) न्यास=ठेवणें. जेथे सामान्य-विशेषांपैकी एकाचें समर्थन करण्यास दुसरा अर्थ सांगितला असतो तेथे अर्थांतरन्यास होतो. उदा. "मारुतीने सागराचें सहज उल्लंघन केलें; बरोबरच आहे, महात्म्यांना अशक्य असें काय आहे !"

अर्थांतरन्यासांतील दोन अर्थांपैकी एक सामान्य व दुसरा विशेष अर्थ असतो. तसेंच त्यांपैकी एक प्रकृत आणि दुसरा अप्रकृत असतो आणि समर्थनहि साधर्म्याने किंवा वैधर्म्याने होऊं शकतें.

**अर्थांतरन्यास व निदर्शना**—मागे आपण संभवद्वस्तुनिदर्शना पाहिली. तींत आणि अर्थांतरन्यासांत बरेंच साम्य दिसेल. निदर्शनेच्या या प्रकारांत एखाद्या विशेष उदाहरणाच्या साह्याने एक सामान्य तत्त्व निदर्शित केलेलें असतें. तसें पाहिलें तर अर्थांतरन्यास व निदर्शना यांच्यांत इतकें साम्य आहे की एकाचें दुसऱ्यांत सहज परिवर्तन होऊं शकतें. महात्म्यांना अशक्य असें

कांहीच नाही असें दाखविण्यासाठीच ' मारुतीने समुद्रावरून उड्डाण केलें ' असें म्हटलें की वरील अर्थांतरन्यासाची निदर्शना होते. दोहोंत फक्त स्वरूपाचा भेद आहे. निदर्शनेंत हेतु व उदाहरण एकाच वाक्यांत गोवलें असतें, तर अर्थांतरन्यासांत दोन स्वतंत्र वाक्यांत तीं सांगितलेलीं असतात. शिवाय निदर्शनेंत बोध्यबोधक संबंध असतो तर अर्थांतरन्यासांत समर्थ्य-समर्थक संबंध असतो.

**अर्थांतरन्यास आणि दृष्टांत व प्रतिवस्तूपमा**—या तिन्हींतहि स्वतंत्र वाक्यें असतात व एका प्रकारें पाहिलें तर अर्थांतरन्यासाप्रमाणेच दृष्टांत व प्रतिवस्तूपमेंतहि समर्थन असतेंच. पण त्यांच्यांत फरक आहे. दृष्टांत व प्रतिवस्तूपमा यांच्यांतील समर्थन निर्णायक नसतें. तें फक्त सादृश्य-मूलक असतें. न्यायशास्त्रीय भाषेंत सांगावयाचें म्हणजे दृष्टांत प्रतिवस्तूपमेमधील समर्थन केवळ विशेषसंबंधामुळे Anology प्रमाणे प्रायःसमर्थन असतें; पण अर्थांतरन्यासांत सामान्यविशेष भावामुळे निर्णायक (Syllogistic) समर्थन असतें. याशिवाय त्यांच्यांतील स्वरूप व हेतु याच्यांतहि भेद आहे. दृष्टांत व प्रतिवस्तूपमेंतील हेतु औपम्य हा असतो. म्हणून त्यांत दोन्हीहि वाक्यें विशेष वाक्यें असतात. अर्थांतरन्यासांतील हेतु निर्णायक समर्थन असल्याने त्यांत सामान्य वाक्य व विशेष वाक्य असा प्रकार असतो. आणखी एक फरक म्हणजे प्रतिवस्तूपमेंत वस्तु-प्रतिवस्तु-भाव, दृष्टांतांत बिंबप्रतिबिंब भाव, तर अर्थांतरन्यासांत सामान्यविशेष भाव असतो.

**अर्थांतरन्यास आणि अप्रस्तुतप्रशंसा**—अप्रस्तुतप्रशंसेचा एक प्रकारहि सामान्यविशेष भावावर आधारलेला आहे पण त्यांत आणि अर्थांतर-न्यासांत फरक आहे. अप्रस्तुतप्रशंसेंत सामान्य व विशेष यांच्यापैकी एकच वाच्य असतें, दुसरें व्यंग्य असतें. तर अर्थांतरन्यासांत दोन्हीहि वाच्य असतात. अप्रस्तुतप्रशंसेंत फक्त समर्थक वाच्य असतें; समर्थ्य हें गम्य असतें, तर अर्थांतरन्यासांत समर्थक व समर्थ्य दोन्हीहि वाच्य असतात.

**अर्थांतरन्यास आणि कार्यकारणभाव**—सामान्यविशेष भावाप्रमाणे कार्यकारणभावाच्या समर्थनानेहि अर्थांतरन्यास होऊं शकतो असें रुय्यक व विश्वनाथाचें मत आहे. त्याच्या मतें समर्थ्य वाक्यांत कार्य असतें व समर्थक वाक्यांत कारण असतें. उदा —

१. हे पृथ्वी, तूं स्थिर रहा; शेषा, तूं तिला नीट सावर; हे कूर्मा, तूं त्या दोघांनाहि आधार दे; आणि हे दिग्गजांनो, तुम्ही या तिघांनाहि सावरून धरा. राम आता शिवधनुष्य सज्ज करीत आहे.

येथे पृथ्वीने मुद्दाम स्थिर राहिलें पाहिजे इत्यादि गोष्टी कवि मुद्दाम सांगतो, असें सांगण्याचें कारण राम शिवधनुष्य सज्ज करतो हें आहे. येथे कारणाने कार्याचें समर्थन केलें. किंवा

२. "कोणतीहि गोष्ट एकदम करूं नये; अविचार अनर्थाचें मूळ आहे. विचारपूर्वक कार्य करणाऱ्यालाच लक्ष्मी वश होते."

येथे विचारवंताला लक्ष्मी वश होणें या कार्यानें कारणाचें समर्थन केलें आहे.

काव्यहेतु तीन प्रकारचा असतो. ज्ञापक हेतु, कारक हेतु व समर्थक हेतु. यांपैकी ज्ञापकहेतु अनुमानाच्या मुळाशी असतो; कारकहेतूवर काव्यलिंग आधारलें असतें; व समर्थक हेतूमुळे अर्थांतरन्यास होतो. पण हें मत जगन्नाथ व इतर आलंकारिकांस मान्य नाही. त्यांचें म्हणणें असें की अर्थांतरन्यास फक्त सामान्यविशेष भावांवरच असूं शकतो. कार्यकारणभावाशी संबद्ध असलेलें वचन हें काव्यलिंग होईल.

अर्थांतरन्यासाच्या विशेष गोष्टी अशा—

१. अर्थांतरन्यासांत स्वतंत्र अशीं दोन वाक्यें असतात.

२. त्यांपैकी एक सामान्यवाचक व दुसरें विशेषवाचक असतें.

३. त्यांच्यापैकी एक प्रकृत व दुसरें अप्रकृत असतें. प्रकृत हें समर्थ्य व अप्रकृत हें समर्थक असतें.

४. समर्थन हें साधर्म्यानें किंवा वैधर्म्यानेहि होऊं शकतें.

अर्थांतरन्यासाची व्याख्या--

**जेथे प्रकृत सामान्याचें किंवा विशेषाचें समर्थन अनुक्रमें अप्रकृत विशेषाने किंवा सामान्याने केलेलें असतें तेथे अर्थांतरन्यास अलंकार होतो.**

( हें समर्थन साधर्म्यानें किंवा वैधर्म्यानेहि होऊं शकतें. )

उदाहरणें—

**सामान्य प्रकृताचें अप्रकृत विशेषाने समर्थन:--**

(१) प्रबळाला सर्वच साह्य करतात, पण दुर्बलाला कोणीच साह्य करीत नाही. वायु हा अग्नीला प्रज्वलित करतो, पण दीपज्योतीस विझवतो.

वरील उदाहरणांतील पहिल्या वाक्यांत एक सामान्य विधान केलें आहे. दुसऱ्या वाक्यांत विशेष विधान आहे. पहिलें विधान प्रकृत, तर दुसरें अप्रकृत आहे. 'प्रबळ अशा अग्नीला वायु साह्य करतो व दुर्बल दीपज्योतीस साह्य करीत नाही' या अप्रस्तुत विधानाने प्रस्तुत विधानाचें समर्थन केलें आहे. हें समर्थन साधर्म्याने केलें आहे.

(२) 'बोध खलास न रुचे, अहिमुखीं दुग्ध होय गरल ।
श्वानपुच्छ नलिकेंत घातलें होईना सरल ॥'

—विनायक

'बोध खलास न रुचे' ही सामान्य गोष्ट प्रथम देऊन तिच्या समर्थनार्थ पुढे दोन विशेष गोष्टी दिल्या आहेत. येथे सामान्य विधानाप्रमाणेच विशेष विधानेहि नकरणरूपाने सांगितल्यामुळे साधर्म्यानेच समर्थन झालें.

( ३ ) ओसरीवरुनि या तव मैत्रिणी
गात स्वैर फिरतात सुलक्षणी
परि तुला न बघती मुळि ढुंकुनि
'संकटीं जगिं कुणा न असे कुणी !'

—केशवकुमार.

चहाच्या कपांत पडून गटंगळया खाणाऱ्या माशीस उद्देशून एक विनोदप्रचुर व वक्रोक्तिपूर्ण कविता केशवकुमारांनी लिहिली असून तिच्यांतून वरील श्लोक घेतला आहे. त्यांतील पहिल्या तीन चरणांत संकटांत सांपडलेल्या माशीचें वर्णन असून त्या विशेष गोष्टीचें समर्थन चतुर्थचरणांतील सामान्य विधानाने केलें आहे.

( ४ ) जो तो आपल्या मनाप्रमाणे जगाची परीक्षा करीत असतो. कनक व कांता यांना तुच्छ मानणारे प्राणी या जगांत आहेत असें जर चोर व जार याना सांगितलें तर त्यांना तें कधी खरें वाटायचें नाही !

—किर्लोस्कर, ' सौभद्र ' नाटक.

वरील उदाहरणांतील पहिलें वाक्य सामान्यवाचक व दुसरें विशेषवाचक आहे. दुसऱ्या वाक्याने पहिल्याचें समर्थन झालें; म्हणून हा ' अर्थान्तरन्यास ' जाणावा.

( ५ ) तुम्हीहि बळि बांधिला म्हणुनि आपुली माय जी
मनांत सहजा दया, निपट टाकिली काय ! जी !
सकोप दिसती गुरु क्षणभरींच; जें तापलें
जल ज्वलनसंगमें, त्यजि न शैत्य तें आपलें ॥

—मोरोपंत, केकावलि.

वरील केकेच्या तृतीय चरणांत " थोर लोकांचा राग स्वल्पकाळ टिकतो " असें सामान्य विधान असून तें विधिरूप ( Affirmative ) आहे. या विधानाचें समर्थन पुढील निषेधरूप ( negative ) विशेष विधानाने केलें आहे:—अग्नीमुळे पाणी तापलें तरी तें तात्पुरतेंच; आपल्या अंगचा थंडपणा पाणी सोडीत नाही.

येथे वैधर्म्याने समर्थन झालें.

### विशेषाचें सामान्यानें केलेल्या समर्थनाचीं उदाहरणें--

(१) वदुनी जननी जनीप्रति रामचंद्र निघे, तदा ।
'ने मलाहि' म्हणोनियां धरि लक्ष्मण प्रभुच्या पदा, ॥
मायबापहि टाकिले, परि बंधुरत्न न सोडिलें !
स्नेह-बंधन सज्जनें भुवनत्रयींहि न तोडिलें ॥

—मोरोपंत, छंदोरामायण.

'बंधुरत्न न सोडिलें' या विशेष विधानाचें समर्थन चतुर्थ-चरणांतील सामान्य विधानाने केलें असल्यामुळे वरील श्लोकांत अर्थान्तर-न्यास अलंकार झाला. दोन्हीं वाक्यें निषेधरूप असल्यामुळे हें समर्थन साधर्म्यानेच होय.

(२) सज्जनातें सर्वदा दुःख होई ।
सदा दुष्टातें सौख्य देव देई ॥
काय उफराटा न्याय हा जगाचा ।
गमे कंटाळा विधिस चांगल्याचा ॥

—गोविंदाग्रज, वाग्वैजयंती 'गुलाबास'

येथे प्रथम विशेष गोष्ट सांगून नंतर सामान्य सिद्धांताने त्याचें समर्थन केलें आहे.

( ३ ) रोज पहाटे दोन श्लोकांचें पाठान्तर करून केशवाने पांच वर्षांत हजारो श्लोक मुखोद्गत केले. थेंबें थेंबें तळें साचे !

पहिल्या वाक्यांत विशेष गोष्टीचें विधान असून दुसऱ्या वाक्यांत त्याच्या समर्थनार्थ सामान्य गोष्ट सांगितली आहे. हीं दोन्हीं वाक्यें विधिरूप असल्यामुळे हें समर्थन साधर्म्याने सिद्ध झालें.

( ४ ) 'पाटिल' 'पाटिल' म्हणुनी जो तो गौरव करी धनाजीचा, ।
पण नवल काय ? लोकीं गौरव नसतोच निर्धनाजीचा ॥

—चंद्रशेखर, 'काय हो चमत्कार!'

"धनाजी श्रीमंत झाल्यावर सर्व लोक त्यांचा गौरव करूं लागले" ही विशेष गोष्ट प्रथमचरणांत सांगून नंतर 'यांत कांहीं नवल नाहीं, निर्धन माणसाचा गौरव होत नसतोच" या सामान्य विधानानें त्या गोष्टीचें समर्थन केलें.

या उदाहरणांत पहिलें वाक्य विधिरूप व दुसरें निषेधरूप असल्यामुळे हें समर्थन वैधर्म्यानें झालें.

(५) तदितर खग भेणें वेगळाले पळाले ।
उपवन—जल—केली जे कराया मिळाले ॥
स्वजन गवसला जो त्याजपाशी नसे तो ।
कठिण समय येतां कोण कामास येतो ? ॥

——रघुनाथपंडित, दमयंती स्वयंवर.

वरील श्लोकाच्या पहिल्या तीन चरणांत विशेष गोष्ट सांगितली असून त्या गोष्टीच्या समर्थनार्थ चतुर्थ चरणांत एक सामान्य गोष्ट सांगितली आहे. म्हणून या श्लोकांत अर्थान्तरन्यास अलंकार आहे.

## (३६) काव्यलिंग

काव्यलिंग या अलंकाराला **काव्यहेतु** असेंहि नांव आहे व काव्यहेतु हेंच नांव वस्तुतः अलंकाराचा अर्थ सुचवायला चांगलें आहे. पण हेतु या अर्थी लिंग हा शब्द न्यायशास्त्रांतून घेतला आहे. **काव्यलिंग म्हणजे काव्यमय कारण** आणि काव्यमय कारण म्हणजे कविप्रतिभानिर्मित कारण. एखाद्या घटनेचें कवि कारण देतो. तें कारण वैचित्र्यपूर्ण असलें म्हणजे तेथे काव्यलिंग अलंकार होतो.

कालिदासाच्या मालविकाग्निमित्रांत एक असा प्रसंग आहे. अग्निमित्राचें मालविकेवर प्रेम असतें. अग्निमित्राची दुसरी राणी इरावती हिला तें कळतें व ती रागावते. तिला खुष करण्याकरिता राजा तिची

मनधरणी करतो व अखेर तिला नमस्कार घालण्यापर्यंत त्याची पाळी येते. पण इरावती रागावून निघून जाते. तेव्हा राजा आपल्या मित्राला म्हणतो, "मित्रा, मालविकेवर माझें मन अगोदरच जडलें आहे; आता इरावतीने माझा जो धिःकार केला, त्यामुळे तिचे माझ्यावर उपकारच झाले" धिःकाराने उपकार हा प्रकार आपल्याला विलक्षण वाटतो. आणि आपल्याला वाटते कालिदासाने काय हें वेड्यासारखें लिहिलें? धिःकाराने कधी उपकार होतो का? आपल्या मनांत असा विचार येतो न येतो तोंच कालिदास आपल्याला कारण दाखवितो. "अग्निमित्राचें मन मालविकेकडे ओढलें गेलें." (आता इरावतीने धिःकारल्यामुळे त्याला मालविकेचा अनुनय करण्यास मोकळीक झाली) कवीने सांगितलेलें हें कारण मोठें रमणीय आहे व त्याने तें वैचित्र्यपूर्ण सांगितलेंहि आहे.

## काव्यलिंग हा अलंकार होऊं शकतो काय?

काव्यलिंग अलंकारांत हेतु अशा प्रकारें सुचविलेला असतो. तो हेतु कित्येकदा एखाद्या शब्दाने सांगितला जातो किंवा त्याकरिता वाक्यहि वापरलें असतें. एखादी घटना अशीच कां घडली असा प्रश्न जेव्हा येतो तेव्हा त्याचें कारण देण्यात काव्यलिंगाचें स्वारस्य आहे. पण केवळ हेतु आहे एवढ्याच कारणावरून त्याला अलंकार मानावयास काही आलंकारिक तयार नाहीत. केवळ हेतूंमध्ये कसलें वैचित्र्य सापडणार? गोष्ट खरी आहे. आणि काव्यांत दिलेल्या प्रत्येक कारणालाच जर काव्यहेतु मानूं लागलों तर मग काव्यलिंग अलंकार नसलेलाच बरा असें वाटावयाचा प्रसंग येईल. पण हीहि गोष्ट खरी की अनेकदा या हेतूमुळे काव्याचें सौंदर्य वाढतें. अशा वेळीं काव्यलिंग अलंकार मानणें अवश्य होतें.

**काव्यलिंग आणि अर्थांतरन्यास**—काव्यलिंगांतील हेतु जेव्हा पूर्ण वाक्यात सांगितला असतो तेव्हा त्यांत व अर्थांतरन्यासांत साम्य दिसतें. कारण काव्यलिंगांत सुद्धा एखाद्या घटनेचें समर्थनच केलेलें असतें. पण

या दोघांत फरकहि आहे. काव्यलिंगांतील समर्थन कार्यकारणावर आधारलें असतें तर अर्थांतरन्यासांतील समर्थन सामान्यविशेषावर असतें. अमुक एका गोष्टीमुळे अमुक गोष्ट अशी घडली असें काव्यलिंगांत कवि सांगतो. तर अमुक गोष्ट अशी घडणें हें अमुक नियमाचें उदाहरणच होय असा भाव अर्थांतरन्यासांत असतो. शिवाय अर्थांतरन्यासांत प्रस्तुत अप्रस्तुत असतात. तर काव्यलिंगांत कारण हें प्रस्तुताचाच भाग असतें.

**काव्यलिंग आणि परिकर**—काव्यलिंगांतील कारण जेव्हा एखाद्या विशेषणानें सांगितलेलें असतें तेव्हा त्यांत आणि परिकरांत साम्य दिसतें. कारण परिकरांतसुद्धा सहेतुक विशेषणें वापरलीं असतात. पण दोहोंत फरक आहे. काव्यालिंगांतील कारण हें विशेषणाने सांगितलेलें असलें तरीहि वाक्यार्थ पूर्ण करण्यास त्याची गरज असतें. परिकरांतील विशेषणांचें तसें नाही. परिकरांत विशेषणाची जरूर वाक्यार्थाला नसते. विशेषणाशिवायहि वाक्यार्थ पूर्ण होतो. विशेषणाने त्याला जास्त सौंदर्य येतें म्हणून जेथे कारण दाखविणाऱ्या विशेषणाशिवाय वाक्यार्थच पूर्ण होत नाही असें असतें तेथे काव्यलिंग असतें. पण जेथे त्याशिवाय वाक्यार्थ पूर्ण होतो व विशेषणाने फक्त अधिक सौंदर्य येतें तेथे परिकर असतो.

काव्यलिंगांतील आवश्यक गोष्टी —

१. काव्यलिंग म्हणजे काव्याला अभिप्रेत असलेला हेतु.
२. काव्यांतील एखाद्या घटनेचें स्पष्टीकरण देण्याकरिता कारण सांगणें हें काव्यलिंगाचें प्रयोजन आहे.
३. पण कवि तें कारण सरळ सांगत नाही. तें काव्यमय पद्धतीने सांगतो.
४. या कारणाचें वैचित्र्य मूलतःच असतें किंवा तें सूचकतेने येतें.
५. एखाद्या घटनेंत दिसून येणारा विरोध जेव्हा या कारणाने नाहीसा होतो तेव्हा त्यांत अधिक चमत्कृति असते.

६. हा हेतु शब्दांनी किंवा वाक्यांनीहि सांगितला असतो.

७. ' कारण ' ' म्हणून ' वगैरे शब्द अध्याहृत असतात.

व्याख्या—

**जेव्हा एखाद्या गोष्टीचें समर्थन कविप्रतिभानिर्मित हेतु देऊन केलेलें असतें तेव्हा काव्यलिंग अलंकार होतो.**

उदाहरणें—

(१) स्तुति ही अजून कुमारिकाच आहे. ती मूर्खांना पसंत करीत नाही व शहाणे लोक तिला स्वीकारीत नाहीत.

वरील उदाहरणांतील दुसऱ्या वाक्यांत प्रतिभानिर्मित कारण दिलें असून त्यायोगें पहिल्या वाक्यांतील अर्थाचें समर्थन केलें आहे. म्हणून येथे ' काव्यलिंग ' अलंकार झाला.

(२) वनवासें मुक्ति, असी येऊं देऊं नको मनीं लहरी; ।
झाले मुक्त खग, हरिण, वृक, जंबुक, कां वनीं न कोल हरी ?

—मोरोपंत, शांतिपर्व.

' केवळ वनांत राहिल्याने मुक्ति लाभते असें नव्हे ' या प्रथम-पंक्तींतील अर्थाचें समर्थन द्वितीय पंक्तींतील अर्थाने केलें आहे. या दोन वाक्यात कार्यकारणसंबंध असल्यामुळे हें ' काव्यलिंग ' अलंकाराचें उदाहरण झालें.

( ३ ) वारा, वणवा, थंडी, वीज अशीं तुज भयें बहुत असती ।
वृक्षा ! करिं उपकारा; चंचल ही मृत्युलोकिंची वसती ॥

—कृष्णशास्त्री चिपळूणकर.

उपकार करण्याचें कारण ( हेतु ) ' चंचल ही मृत्युलोकिंची वसती ' हें होय.

## (३७) अनुमान

अनुमान हें ज्ञान मिळविण्याचें एक प्रमाण आहे. कांही गोष्टींचें ज्ञान आपल्याला प्रत्यक्ष होतें; पण ज्या गोष्टींचें ज्ञान प्रत्यक्षानें होत नाही अशा गोष्टींचें ज्ञान आपल्याला अनुमानानें कळतें. अनुमान म्हणजे तर्क. आपल्याला पर्वतावर धूर दिसतो व यावरून पर्वतावर अग्नि आहे असा आपण तर्क करतों. येथे अग्नीचें ज्ञान प्रत्यक्ष झालें नाही तर तें अनुमानानें झालें. या अनुमानांत धूर हें साधन आहे व अग्नि हें साध्य आहे. कवि सुद्धां कित्येकदां काव्यांत असा प्रकार वापरतो तेव्हां अनुमान अलंकार होतो.

तार्किकाला पर्वतावर धूर दिसतो. कवीला रमणीकटाक्षानें हृदय विद्ध होतांना दिसतें. त्यावरून पर्वतावर अग्नि असला पाहिजे असें तार्किक अनुमान करतो तर रमणीच्या पुढें मदन आपलें धनुष्यबाण घेऊन धावत असला पाहिजे असें कवि अनुमान करतो. येथे हृदय विद्ध दिसणें हें साधन व मदनाचें असणें हें साध्य आहे. अशा प्रकारें काव्यगत अनुमानांतहि प्रत्यक्ष दिसणाऱ्या साधनावरून न दिसणाऱ्या साध्याचें अनुमान केलें असतें. हें काव्यगत अनुमान आहे. तर्कशास्त्रांतील अनुमान आणि काव्यातील अनुमान यांच्यांत अशा प्रकारचें स्वरूपसाम्य आहे. मात्र काव्यानुमानांत यापेक्षा अधिक खोलांत जाऊं नये. तर्कशास्त्रांत अनुमानाला जेवढ्या बारीक-सारीक गोष्टी अवश्य असतात तेवढ्या सर्व गोष्टी देण्याच्या भरीला कवि पडत नाही. तो एक गोष्ट पाहतो आणि त्यावरून तर्क बांधतो. न्यायशास्त्राच्या कटिकोरपणानें पाहिलें तर त्याचें अनुमान कदाचित् आभासहि ठरेल; पण तें वैचित्र्यपूर्ण व रमणीय असतें हें खास!

**अनुमान आणि काव्यलिंग**––अनुमानांत साधन आणि साध्य असतें; काव्यलिंगांत साधन आणि कार्य असतें. एवढेंच त्यांच्यांत साम्य आहे. पण त्यांच्यांत फरकहि आहे. अनुमानांत साध्यसाधनभाव स्पष्ट सांगितलेला असतो; काव्यलिंगांत तो गर्भित असतो. अनुमानामधील हेतु

ज्ञापक असतो; तर काव्यलिंगांतील हेतु समर्थक असतो. म्हणून अनुमानांतील साधन ज्ञात असतें पण साध्य तर्कावें लागतें; काव्यलिंगांत कारण आणि कार्य दोन्हीहि ज्ञात असतात. अनुमानांत आपण साधनाकडून साध्याकडे जातों. काव्यलिंगांत आपण कार्यावरून कारणाकडे जातो. एका दृष्टीने पाहिल्यास काव्यलिंगांतील कार्य आणि हेतु हे अनुमानांत साधन आणि साध्य बनतात.

**अनुमान आणि उत्प्रेक्षा**––अनुमान व उत्प्रेक्षा यांमध्ये एकप्रकारचा तर्कच असतो. पण अनुमानाच्या तर्कात निश्चिति असते तर उत्प्रेक्षेच्या तर्कात संभावना असते. शिवाय अनुमानांतील तर्कात सादृश्यप्रतीति नसते, तर उत्प्रेक्षेंतील तर्कच सादृश्यावर आधारलेला असतो.

म्हणून अनुमानांतील विशेष असे––

१. अनुमानालंकारांत एका घटनेवरून दुसऱ्या घटनेचा तर्क केलेला असतो.

२. जीवरून तर्क केला जातो तें साधन व जिचा तर्क केला जातो तें साध्य होय

३. साधन आणि साध्य हीं दोन्हीहि कविप्रतिभानिर्मित असावीं लागतात.

४. काव्यगत अनुमानांत फक्त अनुमानाचें स्वरूप असतें. तर्कशास्त्राच्या कसोटीवर तें घासून पाहतां येत नाही.

व्याख्या––

**साधनरूप अशा एखाद्या घटनेवरून साध्यरूप घटना कोणती असावी याबद्दल जेथे रमणीय तर्क केलेला असतो तेथे अनुमान अलंकार होतो.** उदा.––

‘ भवन्मतिस आवडे तरि, धनादिकांलागि ते
मदीयगुणकीर्तनश्रवण कां तरि त्यागिते ? ।
असेंहि म्हणशील बा ! जरि, तरी तुझी मावली
तुज त्यजुनि पाजितां कशि दुधाकडे धावली ? ॥

वरील केकेंतील पूर्वार्धात ' अनुमान ' अलंकार आहे. मी तुला जर आवडतों तर धनादि विषयांमागे लागून माझें गुणसंकीर्तन तुझ्या मनाने कां बरें टाकलें असतें ? ज्याअर्थी तूं माझ्या गुणांचें कीर्तन व श्रवण करीत नाहीस त्याअर्थी तुझ्या मनाला मी आवडत नाही, हें अनुमान काढलें आहे. ' धनादिकांकडे कविमनाने धाव घेणें ' हो एक घटना असून तीवरून ' मी तुला आवडत नाही ' या घटनेचा तर्क केला आहे.

## (३८) सम

सम म्हणजे एकमेकांना अनुरूप. जगामध्ये अनुरूप अशा गोष्टींचा संसर्ग क्वचितच दिसून येतो व तो दिसला म्हणजे आपणास चमत्कार वाटतो. प्रत्यक्ष व्यवहारांत दिसून येणारा हा चमत्कार जर आपल्याला इतका आकृष्ट करतो तर कवीच्या वाणींतून तो किती आकर्षक होईल ?

हा अनुरूप गोष्टींचा संसर्ग दोन प्रकारचा असूं शकतो. दोन चांगल्या गोष्टींचा संसर्ग किंवा दोन्हीहि वाईट गोष्टींचा संसर्ग. पहिल्यात त्या गोष्टींची प्रशंसा असते; दुसऱ्यात त्या गोष्टींची निंदा असते या दुसऱ्या प्रकारांत कित्येकदा व्याजस्तुतीचाहि अंश असतो.

सम हा विषमाच्या अगदी उलट आहे. विषमामध्ये दोन गोष्टींचा संसर्ग अनुरूप नाही असें दाखविलेलें असतें; तर येथे तो अनुरूप आहे असें दाखविलेलें असतें. हा प्रकार विषमाच्या पहिल्या प्रकारासारखा आहे. मम्मट एवढाच प्रकार मानतो. पण विषमाच्या इतर प्रकारांसारखेच जगन्नाथाने आणखी प्रकार दिले आहत ते म्हणजे कारणापासून अनुरूप कार्याची उत्पत्ति होणें आणि वांच्छित फळाची प्राप्ति होणें.

समालंकाराला आवश्यक गोष्टी—

१. समालंकारा परस्पराला योग्य अशा गोष्टींचा संसर्ग दाखविलेला असतो.

२. त्या सर्वच गोष्टी चांगल्या असतात; किंवा सर्वच वाईट असतात.

३. चांगल्या गोष्टींचा संसर्ग दाखविण्यांत त्यांची प्रशंसा करण्याचा कवीचा हेतु असतो.

४. वाईट गोष्टींचा संसर्ग दाखविण्यांत निंदा करण्याचा कवीचा हेतु असतो. त्यांतच व्याजस्तुतीची छटा असली तर ती अधिक रमणीय होते.

५. जगन्नाथाने 'अनुरूप कार्योत्पत्ति आणि वांच्छित फळाची प्राप्ति' असे आणखी दोन प्रकार मानले आहेत.

व्याख्या—

**दोन पदार्थ परस्परांना अनुरूप असल्याने त्यांचा संबंध योग्य आहे असें जेथे वर्णन असतें तेथे सम अलंकार होतो.**

उदाहरणें—

(१) ज्याचे पल्लव मंगलप्रद, शिणा छाया जयाची हरी।
गंधे युक्त फुलें फळेंहि असतीं ज्याचीं सुधेच्या परी ॥
वाटे जो रमणीय भूषण वनश्रीचे मुखींचें, भला
आम्रा त्या पिक सेवितां सम-समां संयोग की जाहला ॥

—कृष्णशास्त्री चिपळूणकर, 'आम्रान्योक्ति.'

आम्रवृक्ष व कोकीळ या दोन गुणवंतांचा संयोग वर्णिल्यामुळे वरील श्लोकांत 'सम' अलंकार उघडच दिसून येतो.

(१) श्रीकृष्ण रुक्मिणीला, श्रीकृष्णा रुक्मिणी जशी आता।
दमयंतीस नल, नला दमयंती आयकों जनें गातां ॥

मोरोपंत, वनपर्व.

वरील आर्येत श्रीकृष्ण-रुक्मिणी आणि नळ-दमयंती या दोन जोड्या या परस्परांस अत्यंत अनुरूप अशा व्यक्तींच्या झालेल्या आहेत असें दाखविलें आहे, म्हणून येथेहि 'सम' अलंकार झाला.

( १ ) उंटांच्या सदनीं लग्न, गर्दभ स्तुतिपाठक
प्रशंसती एकमेका ' अहोरूप, अहोध्वनि "

—भाषांतर.

उंट हा कुरूप ' नवरदेव ' व गाढव हा कर्णकटु आवाजाचा प्राणी ' गायक, ' अशी दोषांमुळे परस्परांस अनुरूप असणारी जोडी वरील वाक्यांत सांगितली आहे. म्हणून येथे सम अलंकार झाला.

( २ ) मर्कटांच्या सभेमाजी वृक्षशाखाच आसनें ।
चीत्कार, नखदंतें हीं स्वागताचींच साधनें.

मर्कटांच्या सभेत आसनाकरिता वृक्षशाखा, आणि स्वागताकरिता चीत्कार व दांतनखांनी ओरबडणें हेंच योग्य आहे. येथे असद् वस्तूंचा अनुरूपयोग आहे.

( ३ ) नवल किति हें विधि आज सुज्ञ झाला
उचित वस्तूंचा आज योग आला ।
निंबवृक्षीं फलभार पक्क झाला
त्यास सेवाया काकवृंद आला ॥

येथे कडूनिंबाचीं फळें चाखण्यास कावळेच योग्य आहेत असा असद्-वस्तूंचा योग्य संसर्ग दाखविला आहे.

## (३९) अन्योन्य

उपमेयोपमेमध्ये एकमेकासारख्या दोनच वस्तु आहेत असें सांगितलें असतें. " एकाशिवाय दुसरी वस्तु शोभत नाही " अशा प्रकारच्या विनोक्तींत त्या दोन वस्तु परस्परांस शोभा देतात असें केवळ सुचविलें असतें. समालंकारांत त्या दोन वस्तु परस्परांस योग्य आहेत एवढेंच सांगितलें असतें; पण कवि कित्येकदा यापुढे पाऊल टाकतो. तो सांगतो— " रात्र चंद्रामुळे शोभते आणि चंद्र रात्रीमुळे शोभतो. " येथे दोघांनीहि परस्परांची शोभा

वाढविण्याचें कार्य अपेक्षित आहे. “ पार्वतीचा कंठ व तिने घातलेला अलंकार यांनी एकमेकांची शोभा वाढविल्यामुळे परस्परांच्या ठिकाणीं भूषणभूष्यभाव निर्माण झाला ” असें कालिदास म्हणतो. येथेहि तोच प्रकार आहे. अशा ठिकाणी अन्योन्य अलंकार असतो. एकत्र आलेल्या दोन गोष्टी एकाच क्रियेने परस्परांचा एखादा धर्म उत्कर्षाप्रत नेतात असें कवि येथे दाखवीत असतो.

अन्योन्यालंकारांत पुढील गोष्टी अवश्य असतात—

१. अन्योन्यालंकारांत दोन गोष्टींचें एकत्र वर्णन असतें.
२. त्या दोन गोष्टी परस्परांना उद्देशून एकच क्रिया करतात.
३. त्या क्रियेने ते परस्परांचा कोणतातरी धर्म वाढवितात. हा धर्म गुणरूप किंवा क्रियारूप असतो.
४. या अलंकारात शब्दांची पुनरुक्ति असेल तर अधिक रमणीयता येते.
५. या गुण आणि क्रिया परस्परधर्माला जशा उत्कर्षावह असूं शकतात तशाच त्या अपकर्षावहहि असूं शकतील व त्या विनोद निर्माण करूं शकतील.

व्याख्या—

**दोन वस्तु एकाच गुणरूप किंवा क्रियारूप व्यापाराने परस्परांस शोभा देतात असें वर्णन असतें तेव्हा अन्योन्य अलंकार होतो.**

उदा.—(१) नथ तशीच हीं कर्णिचीं फुलें ।
खुलति मौल्यवान् मौक्तिकांमुळे ।
दिसति साजरीं ह्या मुखास तीं, ।
मुखहि त्यांमुळे साजतें किती ! ॥

—चंद्रशेखर.

'नथ व कर्णिंचीं फुलें ह्या वस्तु मुखाची शोभा वाढवतात तसेंच मुखहि त्यांची शोभा वाढवतें असें वर्णन असल्यामुळे येथे 'अन्योन्य' हा अलंकार झाला.

(२) जैसें अंगाचेनि सुंदरपणें । लेणिया अंगचि होय लेणें ॥
तेथे अलंकारिलें कवण कवणें । हें निर्वचेना ॥

—ज्ञानेश्वरी अ. १०

सुंदर शरीर व दागिने यांपैकी कोणी कोणास शोभा आणली याचा निवाडा करतां येत नाही, असें वरील ओवींत म्हटलें आहे. तीं दोन्ही अन्योन्यास शोभासंवर्धक झालीं आहेत असा भावार्थ आहे. तेव्हा हेंहि 'अन्योन्य' अलंकाराचें उदाहरण झालें.

## (४०) तद्गुण

"एकीने आपल्या मैत्रिणीला कुंदाचें टपोरें फूल दिलें. ती हुंगायला जाते तो काय? तिला वाटलें आपण जास्वंदीचेंच फूल हुंगतों आहोंत. तिने पुनः पाहिलें तो फूल कुंदाचेंच!—ही जादू कशी काय झाली?" असें कवि आपल्याला विचारतो. याचें उत्तर तद्गुण अलंकारांत सापडतें. कुंदाचें फूल पांढरें स्वच्छ खरें, पण तें तिच्या ओठांजवळ जातांच त्याचा रंग पालटला. कुंद आणि ओठ जवळजवळ येतांच कुंदाने स्वतःचा वर्ण टाकून दिला आणि ओठांचा रंग घेतला. तें जोपर्यंत ओठाच्या सानिध्यांत होतें तो पर्यंत तें लाल दिसूं लागलें. पुन्हा दूर नेतांच त्याचा मूळचा रंग दिसूं लागला. वरील वर्णनांत कवीचा हेतु तिच्या ओठांची लाली वर्णन करण्याचा आहे.

तद्गुण अलंकारांत याच गोष्टी आहेत.

१. दोन वस्तूंचे त्यांचे स्वतःचे गुण असतात व ते परस्परांपासून वेगळे असतात.

२. एका वस्तूचा गुण दुसऱ्या वस्तूच्या गुणापेक्षा अधिक उज्ज्वल असतो.

३. त्या दोन वस्तु परस्परांच्या सान्निध्यांत आल्या म्हणजे उज्ज्वल गुणाची वस्तु दुसऱ्या वस्तूच्या गुणाला झाकाळून टाकते.

४. त्यामुळे तिचा मूळचा गुण लुप्त होतो व दुसरीचा गुण त्या ठिकाणी दिसूं लागतो.

५. उज्ज्वल गुणाने युक्त असलेली वस्तु प्रकृत असते. तेव्हा तिचा गुणोत्कर्ष कवीला अभिप्रेत असतो. कित्येकदा ती गोष्ट अप्रस्तुतहि असते.

६. जोपर्यंत त्या दोन वस्तु सान्निध्यांत असतात तोपर्यंतच एक दुसरीचा गुण घेते.

७. तत्=प्रकृत किंवा अप्रकृत, तिचा गुण दुसरी वस्तु घेते असा अलंकार तो तद्गुण.

व्याख्या—**दोन वस्तु एकमेकांच्या जवळ आल्यावर एक वस्तु आपला गुण टाकून देऊन, अधिक उज्ज्वल असलेल्या वस्तूचा गुण घेते असें वर्णन जेथे असतें तेथे तद्गुण अलंकार होतो.**

उदाहरणें—

(१) कृष्ण हृदय धवलतेजवळ तें झालें धवल पळीं ।
नवल न धवलच बिंब शशीचें विलसे नील जळीं ॥

—विनायक, ‘ कृष्णाकुमारी ’

कृष्णाकुमारीचा वध करण्यासाठी मारेकरी जेव्हा तिच्याजवळ गेला तेव्हा तिचें सात्त्विक, पवित्र रूप पाहून त्याचें कृष्ण हृदय क्षणांत धवल झालें. म्हणजे त्या दुर्जनाच्या हृदयाने आपला ‘ कृष्णपणा ’ सोडून कृष्णाकुमारीचा ‘ धवलता ’ हा गुण स्वीकारला. या ठिकाणीं कृष्णाकुमारीच्या धवलतेचा ( पावित्र्याचा ) गुण विशेष प्रभावी असल्याचें सुचविलें आहे. येथे तद्गुण अलंकार झाला.

(२) त्यांहीहून विशेष अंधुक दुजीं त्यामागचीं; यापरी ।
ओळीने शिखरें जशीं चढत हीं जाती नभोभ्यंतरीं ॥
तैसा आदिम वर्ण पालटुनियां नीलत्व त्यां येतसे ।
त्यायोगें गगनाभ्र आणिक तया वर्णैकता होतसे ! ॥

—चिंतामणि पेटकर, ' गंगावर्णन '

वरील श्लोकांत हिमालयाच्या अत्युच्च प्रदेशाचें वर्णन करतांना कवि म्हणतो की एका मागून एक अशीं जीं उंच उंच शिखरें होतीं त्यांतील मागचीं म्हणजे अधिक उंच शिखरें हीं स्वतःचा वर्ण सोडून आकाशाचा नीलिमा धारण करीत होतीं. ' आदिम ' म्हणजे मूळचा, पहिला वर्ण सोडून नभाचा नीलवर्ण स्वीकारण्याचें वर्णन केल्यामुळे ' तद्गुण ' अलंकार झाला.

## (४१) अतद्गुण

तद्गुणाच्या उलट अतद्गुण अलंकार आहे. उज्ज्वल गुणांनी युक्त असलेली वस्तु जवळ असूनहि न्यूनगुणाने युक्त असलेली वस्तु जेव्हा आपला गुण सोडून दुसरीचा गुण घेत नाही तेव्हा अतद्गुण अलंकार होतो. [ एक प्रेयसी प्रियकराला म्हणते, " तूं धवल गुणांचा असूनहि माझें हृदय रक्त केलेस; पण माझ्या रागभरित हृदयांत ठेवूनहि तूं मात्र रक्त झाला नाहीस. येथे पूर्वार्धांत विरोध व उत्तरार्धांत अतद्गुण आहे ] हा अलंकार तद्गुणाच्या उलट म्हणून मम्मटानेच प्रथम मानला आहे.

तसें पाहिलें तर हा विशेषोक्तीचाच एक प्रकार आहे. एकीने दुसरीचा गुण घ्यावा अशी परिस्थिति असतांना तें गुण घेण्याचें कार्य दिसत नाही असें येथे आहे म्हणून ही विशेषोक्तीच आहे असें मानावयास हरकत नाही. फार तर गुणांच्या बाबतींत लागणारी विशेषोक्ति एवढेंच याला म्हणतां येईल.

अतद्गुणाचे विशेष असे —

१. येथेहि दोन वस्तु असून त्यांचे भिन्न गुण असतात व एकीचा गुण उज्ज्वल असतो.

२. त्या सन्निध येऊनहि एकीने दुसरीचा उज्ज्वल गुण घेतला नाही असें दाखविलेलें असतें.

३. याच्या मुळाशी अतिशयोक्ति असेल तर अतद्गुण अधिक उठावदार दिसतो.

४. त्या दोन गोष्टींपैकी कोणतीहि प्रकृत किंवा अप्रकृत असू शकते.

व्याख्या—**जेव्हा एखादी न्यूनगुण वस्तु जवळच असलेल्या उज्ज्वलगुण वस्तूच्या सान्निध्यांत असून सुद्धा उज्ज्वलगुण घेत नाही असें वर्णन असतें तेव्हा अतद्गुण अलंकार होतो.**

उदा.—

(१) निंबाचिया झाडा साखरेचें आळें । आपलीं तीं फळें न संडीच ।
तैसे अधमाचें अमंगळ चित्त । वमन हें हित करुनी सांडी ॥
परिसाचे अंगीं लापिलें खापर । पालट अंतर नेघे त्याचें ।
तुका म्हणे वेळू चंदनासंगतीं । काय ते नसती जवळिक ? ॥

—तुकाराम.

सान्निध्य असूनहि साखरेच्या गुणाचा स्वीकार निंबाचें झाड करीत नाही, परिसाचा गुण खापरी घेत नाही, चंदनाचा गुण वेळू ग्रहण करीत नाही, असें वर्णन वरील अभंगांत असल्यामुळे ' अतद्गुण ' अलंकार झाला.

(२) पंकांत पद्म न मळे, काकांच्या दुर्गुणा सिकें न पिक, ।
चंदन परगंध न घे, होय तृणांमाजि तृणचि काय पिक ? ॥

—मोरोपंत, कर्णपर्व.

(३) कडू कारलें तुपांत तळलें अन् साखरेंत घोळलें तरी कडू तें कडूच.

(४) काकांच्या समाजीं पिक गेला तरी
कर्कश न स्वरीं गाई कधी ।
पंकांत न कधी मळतें कमळ
सदा तें निर्मळ राहतसें ॥

**अर्थान्तरन्यासापासून अतद्‌गुणापर्यंत अलंकाराचीं अभ्यासार्थ उदाहरणें—**

(१) आली जरी कष्टदशा अपार
न टाकिती धैर्य तथापि थोर ।
केला जरी पोत बळेंचि खालें
ज्वाला तरी ते वरती उफाळे ॥

—वामन.

(२) आधी होता वाघ्या । दैवयोगें झाला पाग्या ।
त्याचा येळकोट राहीना । मूळ स्वभाव जाईना ।

—तुकाराम

(३) शिवे न तुझिया पदा अदयताख्य दोष क्षण;
प्रभो ! चुकतसों, तरी करिसि तूंचि संरक्षण
नसेचि शरणागती घडलि सत्य अद्यापि ती; ।
रुचे विषय; ज्या मिळे अमृत, ते न मद्या पिती ॥

——मोरोपंत, केकावलि

(४) मोठमोठ्या महात्म्यांचीं मनें क्षुल्लक कारणावरून उगीच बिघडून जातात. एका क्षुल्लक धोब्याचें बोलणें मनावर घेऊन जानकीदेवीचा त्याग करण्याचें साहस प्रभु रामचंद्राने केलें.

— कृ. प्र. खाडिलकर, सवाई माधवरावाचा मृत्यु.

(५) कवीश्वरमनः पयोनिधिसुतास्तुतीच्या पते !
भले न वरिती स्तुतिप्रति; न जोडिती पाप ते;
गळां पडति ज्यांचिया तव गुणैकदेशभ्रमें,
तिहीं तुजचि दावितां, भजति बा ! तुला संभ्रमें ॥

— मोरोपंत, केकावलि.

(६) युष्मत् पद राज्यपद, प्रभुजी ! करितों जपोनि परिचरण।
मी तों अशक्त मंदचि, तुमचे श्रितकल्पवृक्ष परि चरण ॥

—मोरोपंत, सभापर्व.

(७) जागसी अपरात्री नी दीर्घ निःश्वास टाकिसी।
सुनीतें रचिसी तैशीं, मदनें खास वेधिलें ॥

— रा. श्री. जोग, काव्यविभ्रम.

(८) योग्या तीच तयाला, तोचि तिला योग्य, जेवि काम रती।
अनुरूप योग सन्मत; साधूत्कर्षें असाधु कां मरती ? ॥

— मोरोपंत, वनपर्व

(९) शोभे रजनी चंद्रें, रजनीने चंद्रही तसा शोभे।

— केमकर, अलंकारविकाश

## (४२) मीलित

प्रमदेने मद्यपान केलें. त्यामुळे तिचा चेहरा व डोळे आरक्त झाले. तशांतच तिला रुसवा आला. पण तो रुसवा प्रियकराच्या लक्षांत येईना. त्याला वाटलें की तो रक्तिमा मद्यपानाचाच आहे. एका तरुणीची दृष्टि मूळचीच चंचल होती, गति अंगचीच मंद होती, व चेहरा मुळचाच टवटवीत होता. त्यांतच तिने मद्य घेतलें. पण तिचें मूळचेंच सौंदर्य इतकें उज्ज्वल होतें की ती मद्य प्याली हें तिच्या प्रियकराच्या लक्षांत सुद्धा येईना.

पहिल्या उदाहरणांत दोन गोष्टी आहेत. मद्यपान आणि कोप. या दोघांचीं चिन्हें म्हणजे रक्तिमा. तीं सारखींच आहेत. पण प्रकार असा झाला आहे की मद्याच्या रक्तिम्याने कोपाची रक्तता झाकून गेली आहे. दुसऱ्या उदाहरणांतहि असेंच झालें आहे. तरुणीचे विभ्रम स्वाभाविकहि आहेत. तसेच ते मद्यामुळेहि आले आहेत. पण स्वाभाविक विभ्रमच इतके बलवान् आहेत की त्यांत मद्याचा परिणाम दिसूनहि येत नाही. दोन्हीहि वस्तूंमध्ये

सारखे गुण आहेत. त्यांपैकी एक वस्तु आपल्या प्रबलतेने दुसऱ्या वस्तूला झाकून टाकते असा येथे प्रकार झाला आहे. अशा प्रकाराला ‘ मीलित ’ म्हणतात. मीलित=मिसळून जाणें, भिन्नतेने न दिसणें.

**मीलित आणि भ्रांतिमान्**—पण या मिळून जाण्यांत भ्रांति नसते. भ्रांतिमान् व मीलित या दोघांतहि एक वस्तु दुसरीला झाकून टाकते हें खरें. पण भ्रांतिमानांत दिसणारी वस्तु अस्तित्वांत नसतेच, उलट मीलितांत दिसून येणारी वस्तु अस्तित्वांत असते. भ्रांतिमानांत खरी वस्तु दिसत नाही. मीलितांत दिसणारी वस्तु खरी असते व ती दुसऱ्या वस्तूला आपल्या प्राबल्याने झाकून टाकते.

**मीलित आणि तद्गुण**—दोन्हींहि अलंकारांत दोन वस्तु संनिध असतांना एक दुसरीला झांकते. पण तद्गुणांत दोन्ही वस्तूंचे धर्म भिन्न असतात, तर मीलितांत दोघींचेहि धर्म सारखें असतात. तद्गुणांत एका वस्तूचा धर्म दुसरीच्या धर्माचा लोप करून तिची जागा घेतो तर मिलितांत एक धर्म दुसऱ्याच्या प्रभावापुढे दिसून येत नाही. प्रबल वस्तूच फक्त दिसते.

मीलितामध्ये प्रबल चिन्ह आंगचेंहि असूं शकतें, किंवा आगंतुकहि असूं शकतें. मद्यपानामुळे कोप लक्षांत आला नाही. येथे आगंतुक चिन्हांनी मूळ गोष्टीला झाकलें आहे. पण तिच्या सहजविभ्रमामुळे मद्यपानाचा परिणाम दिसत नाही येथे स्वाभाविक चिन्हांनी आगंतुक गुणांना झाकलें आहे.

मीलिताचे विशेष असे—

१. एकाच आश्रयाने दोन वस्तु असल्या पाहिजेत.

२. त्या दोन्ही वस्तूंचीं चिन्हें सारखींच असलीं पाहिजेत व त्यांचे परिणामहि सारखेच असले पाहिजेत.

३. हे परिणाम एका गोष्टीमुळे झाले असें पाहणाऱ्याला वाटलें पाहिजे.

४. म्हणजेच त्याच्या वाटण्यावरून एका गोष्टीचें प्राबल्य दिसलें पाहिजे.

५. त्यामुळे एक वस्तु दुसऱ्या वस्तूने झाकली गेली असा अखेर बोध झाला पाहिजे.

६. ही प्रबल गोष्ट स्वाभाविक किंवा आगंतुक असू शकेल.

७. मीलिताचें सौंदर्य दोन वस्तूंतील सादृश्यांत नसून, त्यामुळे निर्माण होणाऱ्या एका वस्तूच्या झाकाळण्यांत आहे.

**व्याख्या—ज्या दोन वस्तूंच्या सारख्याच खुणा दिसतात अशा वस्तूंपैकी एक वस्तु आपल्या प्राबल्याने दुसऱ्या वस्तूला अगदी झाकून टाकते तेव्हा मीलित अलंकार होतो.** मीलितांत एका वस्तूच्या स्वाभाविक चिन्हांमुळे दुसरी वस्तु झाकली जाते, किंवा आगंतुक चिन्हांनी झाकली जाते.

उदा.—

(१) प्रियकर—तूं अजून तांबूल कसा घेतला नाहीस ?

प्रिया—मी तर तो केव्हाचाच घेतला.

प्रियकर—पण तो ओळखावा कसा ? मुखाचा सुगंध आणि ओठांचा रक्तिमा तर तुझा मुळचाच आहे !

—भाषांतर

येथे तांबुलाने आलेला सुगंध आणि ओष्ठांचा रक्तवर्ण तरुणीच्या मूळच्या गुणांनी झाकला आहे म्हणून मीलित अलंकार.

(२) रक्तवर्णें कुंडलें माणिकांचीं
प्रभा गालांवर पडे सदा ज्यांची ।
ध्यानिं येना त्यामुळे प्रियकराचे
प्रणयकोपें आरक्त मुख प्रियेचें ॥

गालांवर पडलेल्या माणिकांच्या रक्तवर्णांत प्रियेचा कोपरक्तिमा झाकून गेला असें वर्णन आहे. येथे आगंतुक गुणांनी मूळच्या गुणाला झाकलें आहे म्हणून मीलित अलंकार

## (४३) सामान्य

मीलित अलंकारांत एक वस्तु आपल्या गुणप्राबल्याने दुसऱ्या सारख्या गुणांच्या वस्तूला लोपून टाकते. तर सामान्यांत सारख्या गुणांच्या दोन वस्तु एकत्र आल्या असता त्यांचा वेगळेपणा दिसत नाही. त्या दोन वस्तु समान गुणांनी एकमेकींशी संबद्ध होतात. एक तरुणी क्रीडा करितांना एका लतेआड लपली. तिचा प्रियकर तिला शोधावयास लतेजवळ गेला पण लतेच्या व तिच्या सारखेपणामुळे ती तरुणी त्याला दिसेचना. येथे सामान्य अलंकार आहे. असें वर्णन करण्यांत कवीला लता आणि तरुणी यांच्यांतील गुणसाम्य दाखवावयाचें आहे हें उघड आहे.

**सामान्य आणि मीलित**—येथे सामान्य आणि मीलिताचा भेद ओळखणें अवश्य आहे. दोघांतहि सारख्या गुणांमुळे एक वस्तु लुप्त होते. पण सामान्यांत गुणाच्या सारखेपणामुळे त्या वस्तु वेगळेपणाने ओळखतां येत नाहीत; तर मीलितात एक वस्तु दुसरीला आपल्या प्राबल्यामुळे दडपून टाकते. सामान्यांत दोन्ही वस्तूंचे गुणधर्म सारख्याच शक्तीचे असतात पण मीलितांत एकींचे गुण दुसरीपेक्षा अधिक प्रभावी असतात. सामान्यांत दोन वस्तूंमधील भेद कळत नाही. पण मीलितात एकीसमोर दुसरी वस्तु लपूनच जाते.

**सामान्य आणि तद्गुण**—दोहोंतहि वस्तुस्थिति जशी असते तशी दिसत नाही. पण सामान्यांत ती सारखेपणामुळे दिसत नाही तर तद्गुणांत एका गुणाचा दुसरीवर प्रभाव झाल्याने दिसत नाही. सामान्यांत गुणसाम्य असतें तर तद्गुणांत गुणभिन्नता असते. सामान्यांत गुण सारख्या शक्तीचे असतात तर तद्गुणांत एक प्रभावी गुण असतो.

एका दृष्टीने पाहिलें तर मीलित, सामान्य आणि तद्गुण हे एकाच अलंकाराचे वेगळे प्रकार मानतां येतील व तसे मानावेत असें एक मत रसगंगाधरांत नमूद आहे. कुवलयानंदांत तर मीलित आणि सामान्य यांना एकाच कक्षेंत घातलें आहे.

सामान्यालंकारांत विशेष गोष्टी अशा —

१. दोन वस्तु असून त्यांचे सारखेच गुण असतात.

२. त्या गुणांच्या सारखेपणामुळे दोन्ही वस्तु एकच भासतात, दोन अशा ओळखूं येत नाहीत.

३. एका वस्तूचे गुण दिसून पडतात, पण दुसऱ्या वस्तूचे विशेष गुण दिसत नाहीत, म्हणून ती ओळखतां येत नाही.

४. गुणांची शक्ति सारखी असते; मीलिताप्रमाणे एक प्रबळ नसते.

५. गुणसाम्य दाखवणें हा कवीचा अभिप्राय असतो.

६. दोन्ही वस्तु सर्वस्वी सारख्या नसतात पण कवि तसें समजतो.

व्याख्या —

**प्रकृत आणि अप्रकृत यांच्यांत विशिष्ट गुणांचें साम्य असतें. हें गुणसाम्य दाखविण्याकरिता त्या दोन वस्तूंची एकात्मता झाली असें कवि वर्णन करतो; तेव्हा सामान्य अलंकार होतो.**

उदा. —

( १ ) तऱ्हेतऱ्हेचीं फुलें उमललीं
रंगीबेरंगीही सगळीं
तूंही शिरतां त्यांच्या मेळीं,
माझें मग तें फूल कोणतें, कसें ओळखूं सांग ?

—गोविंदाग्रज ' बागेत बागडणाऱ्या लाडक्या लहानग्यास '

या उदाहरणांत बागेत बागडणाऱ्या बाळाचें वर्णन आहे.

( २ ) कोणी वणिग्जन विकी तुळितां तराजे ।
कस्तूरिका तिजसवें अलिनी विराजे ॥
दोन्ही समान निरखी विकणार देतो ।
घेणार तो न समजोति उगाच घेतो ॥

—' रघुनाथपंडित, दमयंती स्वयंवर '

कस्तुरी व अलिनी ( भृंग ) या दोहोंत कृष्णत्व हा समान गुण असल्यामुळे त्या दोन वस्तु एकमेकांपासून वेगळया ओळखतां आल्या नाहीत असें वर्णन आहे. कस्तुरी विकणाऱ्याने आलिनीसह कस्तुरी विकली व घेणाऱ्याने ती घेतली म्हणून येथे 'सामान्य' अलंकार झाला.

(३) उडुपा उडुसें धर्मौदार्यालागोनि अभ्र मुरडे हो ।
सावित्रीच्या सुयशीं न दिसे पति म्हणुनि अभ्रमु रडे हो ॥
—मोरोपंत

सावित्रीच्या यशाने जग अगदी उजळून गेल्यामुळे अभ्रमूचा नवरा ऐरावत हा शुभ्र असल्यामुळे दिसेनासा झाला असें वर्णन.

## (४४) प्रत्यनीक

विरहाने पीडलेला एक प्रियकर चंद्राला उद्देशून म्हणतो—"चंद्रा, माझ्या प्रियेने आपल्या मुखकांतीने तुला जिंकलें, यांत माझा कोणता गुन्हा झाला की तूं मला ताप द्यावास!" दुसरी एक सखी नायकाजवळ नायिकेची स्थिति सांगत असतां म्हणते, "तू मदनाला रूपाने जिंकलें आहेस; आणि ती बिचारी तुझ्यावर प्रेम करते; म्हणूनच तर मदन तिला विद्ध करीत आहे!"

या दोन्हीहि उदाहरणांवरून काय दिसतें तें आपण पाहूं. प्रियेने चंद्राला मुखकांतीने जिंकलें. यांत मुख हें उपमेय आहे व चंद्र हें उपमान आहे. हे दोन प्रतिस्पर्धी आहेत. चंद्राच्या ठिकाणी मुखाला जिंकण्याची शक्ति नाही. म्हणून प्रियेशी संबद्ध असलेल्या प्रियकराला तो ताप देत आहे. असाच प्रकार दुसऱ्या उदाहरणांतहि आहे. नायक आणि मदन प्रतिस्पर्धि आहेत. नायकाने मदनाला जिंकलें आहे. नायकाला सरळ जिंकण्याचें मदनांत सामर्थ्य नाही. म्हणून नायकावर अनुरक्त असलेल्या नायिकेला तो ताप देतो. या अशा वर्णनाचा परिणाम मात्र असा होतो की त्यामुळे उपमेयाचा उत्कर्ष दिसून येतो.

परस्पर शत्रूंच्या व्यवहारासारखा हा व्यवहार आहे. एका शत्रूने दुसऱ्याला जिंकलें. त्याचा सूड प्रत्यक्ष शत्रूवर उगवणें दुसऱ्याला शक्य नाही. म्हणून त्या शत्रुशी संबंधित असलेल्या सैन्याच्या एका तुकडीवर तो सूड उगवून घेतो. म्हणूनच या अलंकाराला प्रत्यनीक म्हटलें आहे. प्रत्यनीक ( प्रति = प्रतिनिधी, सदृश + अनीक = सैन्य = सैन्य प्रतिनिधि किंवा सैन्या-सारखें म्हटलें आहे ) प्रत्यनीकामध्ये वरच्यासारखें वर्णन करून उपमेयाचा उत्कर्ष दाखविणें हा कवीचा हेतु असतो.

**प्रत्यनीक आणि हेतूत्प्रेक्षा**——प्रत्यनीक आणि हेतूत्प्रेक्षा यांच्यांत इतकें साम्य आहे की प्रत्यनीकांत हेतूत्प्रेक्षा असतेच असें म्हटलें तरी चालेल. म्हणून प्रत्यनीक हा स्वतंत्र अलंकार मानूं नये असेंहि एक मत आहे. फार तर असें म्हणतां येईल की प्रत्यनीक ही विशिष्ट प्रकारची हेतूत्प्रेक्षा आहे.

प्रत्यनीकाचे विशेष —

१. उपमेयाचा उत्कर्ष दाखविणें हा प्रत्यनीकाचा हेतु असतो.

२. त्याकरिता उपमेय व उपमान हे प्रतिस्पर्धी आहेत असें कवि दाखवितो.

३. उपमेयाने उपमानाला जिंकलें हें शत्रुत्वाचें कारण असतें.

४. उपमानाला उपमेयावर सूड उगवावयाचा असतो पण तो उगवण्यास उपमान समर्थ नसतें.

५. म्हणून उपमेयाशी संबंधित असलेल्या एखाद्या वस्तूवर उपमेय सूड उगवून घेतें.

६. या प्रकारांत उपमानोपमेयाचें शत्रुत्व कवीने कल्पनेनें निर्मिलेलें असतें.

७. पण कित्येकदा तें खरेंहि असूं शकतें. जसें कृष्ण ( विष्णु ) आणि राहू यांचें खरें शत्रुत्व आहे. राहूला प्रत्यक्ष कृष्णावर सूड उगवतां येत नाही

म्हणून कृष्णाशी सादृश्यसंबंध असलेल्या चंद्रावर तो सूड उगवतो. हाहि एक प्रत्यनीकाचाच प्रकार होय. कारण यांत चंद्रापेक्षा कृष्ण मातब्बर आहे हें सुचविलें.

व्याख्या--

**कोणीएक आपल्या प्रतिपक्षावर सूड घेण्यास किंवा बरोबरी करण्यास समर्थ नसल्याने त्या प्रतिपक्षाशी संबंधित असलेल्या एखाद्या व्यक्तीस पीडा देतो असें वर्णन असतें तेव्हा प्रत्यनीक अलंकार होतो--**

उदा.—

(१) ' हे मदना ! पूर्वी शिवाने तुला जाळून टाकलें, त्याचा सूड म्हणूनच शिवभक्त अशा मला तूं छळतोस ! '

शंकराने मदनास दग्ध केलें पण शंकराचा उलट पराभव करणें मदनास शक्य नाही. तेव्हा शंकराचा भक्त असणाऱ्या नायकाला जी कामबाधा होत आहे ती शंकरावर अप्रत्यक्षपणें सूड उगवण्यासाठी ' वड्याचें तेल, वांग्यावर ' या न्यायाने मदन मुद्दाम देत आहे असें वर्णन केल्यामुळे वरील वाक्यांत ' प्रत्यनीक ' अलंकार झाला.

(२) सेतु न तो, यत्पतिने स्वसुता नेली जशी वृकें एणी ।
त्या लंकेची श्रीभू-देवीने ओढिली असे वेणी ।।

--मोरोपंत, वनपर्व.

भू-देवीची मुलगी ( सीता ) लंकेच्या पतीने ( रावणाने ) हिरावून नेली, त्यामुळे भूदेवीस रावणाचा राग आला. पण रावणाचें पारिपत्य करण्यास भूदेवी असमर्थ असल्यामुळे, तिने रावणाच्या लंकारूपी पत्नीची सेतुरूपी वेणी ओढली व अशा प्रकारें तिने रावणाचा सूड उगविला. येथे वर्णिलेलें शत्रुत्व कविप्रतिभानिर्मित आहे.

## (४५) समुच्चय

हितोपदेशांत एक असें सुभाषित आहे " यौवनं धनसंपत्तिः प्रभुत्वं अविवेकिता । एकैकमप्यनर्थाय किमुयत्र चतुष्टयम् ॥ "—अनर्थ निर्माण करण्यास यांपैकी एकएकटें कारणच पुरें आहे. मग हे चार जमल्यावर केवढा अनर्थ होईल ?—येथे समुच्चय अलंकार आहे. **समुच्चय म्हणजे कारणांचा समुच्चय.** मात्र कार्य निर्माण होण्यास या सर्वच कारणांच्या समुच्चयाची गरज असते असें नाही. त्यांच्यापैकी प्रत्येक कारण स्वतंत्रपणें तें कार्य उत्पन्न करण्यास पुरेसें असतें. पण असें असतांहि एक कारण तें कार्य निर्माण करावयास जातें तोंच इतरहि तेथे येतात. समुच्चय अलंकार " खलेकपोत " न्यायावर आधारला आहे.

समुच्चयामध्ये जीं कारणें एकत्र जमतात त्यांत सर्व चांगलीं असतील किंवा वाईटहि असतील; किंवा तो चांगल्यावाईटांचा योग असेल. अर्थात् कारणांचें हें चांगलेंवाईटपण बोलणाऱ्याच्या दृष्टीने असतें हें येथे लक्षांत ठेवलें पाहिजे. " अनिवार मदनपीडा, प्रियकर दूर असणें, गाढ प्रेम व तारुण्य हे सर्व एकत्र झाल्यावर विरह कसा सहन व्हावा ! " येथे त्या विरहिणीच्या दृष्टीने प्रेम आणि यौवन सुद्धा वाईट ठरलें आहेत.

समुच्चयाचा दुसराहि एक प्रकार आहे. वर सांगितलेल्या प्रकारांत स्वतंत्रपणें कार्य उत्पन्न करणारे अनेक हेतु एकाच वेळीं एकत्र जमणें असा प्रकार आहे; तर दुसऱ्या प्रकारांत, दोन गुण, किंवा दोन क्रिया किंवा गुण आणि क्रिया एकाच वेळीं दिसून येणें असा प्रकार असतो. अग्निमित्र इरावतीला म्हणतो, "तूं रागावतेस तसतसे तुझे विलासहि वाढतात." येथे दोन क्रिया एकाच वेळीं बरोबर घडून येत आहेत. " मेघांच्या आगमनाबरोबर आकाश काळें झालें; आणि तरुणांचीं मनें रक्त झालीं." येथे दोन गुण बरोबरीने निर्माण झालेले दिसतात. " चंद्राला पूर्णता यावी आणि तोंच राहूने त्याला ग्रासावें ! " येथे गुण व क्रिया यांचा समुच्चय आहे. हा समुच्चयाचा दुसरा प्रकार होय.

**समुच्चय आणि कारकदीपक**—समुच्चयाचा हा दुसरा प्रकार आणि कारकदीपक यांच्यांत भेद आहे. समुच्चयामध्ये क्रियेचें यौगपद्य म्हणजे एकाच वेळीं घडणें असा आशय असतो; तर कारकदीपकांत क्रिया एकामागे एक घडतात. समुच्चयांतील सौंदर्य यौगपद्यांत असतें, तर कारकदीपकांतील सौंदर्य अनेक क्रियांचा एकच कर्ता असणें यांत असतें. समुच्चयामध्ये क्रिया एका कर्त्याच्या असतील किंवा भिन्न कर्त्यांच्याहि असतील. कारकदीपकांत त्या एकाच कर्त्याच्या असतात.

**समुच्चय आणि अतिशयोक्ति**—कित्येक आलंकारिक कार्यकारणांचें यौगपद्य घडून येणें हा अतिशयोक्तीचा प्रकार मानतात. मम्मट तो प्रकार मानत नाही. पण जे तो प्रकार मानतात त्यांना समुच्चय आणि कार्यकारण यौगपद्य अतिशयोक्ति यांच्यांत भेद करतां येणार नाही. फार तर असें म्हणतां येईल की अतिशयोक्तीचा हा प्रकार समुच्चय म्हणून वेगळा अलंकार झाला. पण हा समुच्चय केवळ कार्यकारणापुरताच आहे असें नाही. कार्यकारण नसलेल्या दोन क्रियांचे एका वेळीं असणें हा प्रकारहि या समुच्चयांत संभवतो. " काय प्रकार आहे पाहा ! माझ्या प्रियेचा एकाएकी असा वियोग व्हावा; आणि त्याच वेळीं आकाशांत मेघांची गर्दी व्हावी ! " असें पुरुरवा म्हणतो. येथेंहि समुच्चय आहे.

**समुच्चय आणि असंगति**— समुच्चय आणि असंगतीमध्ये कित्येकदा सादृश्य दिसतें. जेव्हा दोन क्रिया एकाच वेळीं दोन ठिकाणी घडतात आणि त्या कार्यकारणसंबंधाने जोडलेल्या असतात तेव्हा असंगति आणि समुच्चय सारखेच वाटतात. पण त्यांच्यांतील एक फरक लक्षांत घेतला पाहिजे. समुच्चयामध्ये चमत्कृति " एकाच काळीं क्रिया घडल्यामुळे (यौगपद्य) असते; तर असंगतीमध्ये कार्यकारणांचा विरोध प्रामुख्याने चमत्कार निर्माण करतो.

समुच्चय अलंकाराचे विशेष असे —

**प्रकार पहिला:—**

१. समुच्चय अलंकाराचा पहिला प्रकार खलेकपोत न्यायावर आधारलेला आहे.

२. त्यांत अनेक कारणें एकत्र जमलेलीं असतात.

३. त्यांपैकीं प्रत्येक कारण स्वतंत्रपणें कार्य निर्माण करण्यास समर्थ असतें.

४. एकापेक्षा जास्त कारणें देण्यांत चमत्कृति निर्माण करणें हा हेतु असतो.

५. हीं कारणें चांगलीं, वाईट, किंवा चांगलीं–वाईट एकत्र असूं शकतील.

६. कारणांचा हा चांगलेवाईटपणा बोलणाऱ्याच्या दृष्टीनें ठरवावयाचा असतो.

**प्रकार दुसरा:—**

१. हा प्रकार गुणक्रियांच्या यौगपद्यावर ( म्ह. गुणक्रिया एकाच वेळीं घडण्यावर) आधारला आहे.

२. दोन गुण, किंवा दोन क्रिया, किंवा गुण आणि क्रिया एकाच वेळीं घडून येतात असें यांत वर्णन असतें.

३. त्यांच्यामध्ये कार्यकारणभाव असला तर त्यांत अतिशयोक्तीची छटा असते.

४. या समुच्चयांतील स्वारस्य क्रिया किंवा गुणांच्या यौगपद्यांत असतें.

म्हणून समुच्चयाची व्याख्या अशी —

**एकच कारण कार्यनिर्मितीस समर्थ असतांहि दुसरीं अनेक कारणें एकत्र मिळून तीं कार्य उत्पन्न करतात असें जेथे वर्णन असतें किंवा जेथे दोन गुण, किंवा दोन क्रिया, किंवा गुण आणि**

**क्रिया बरोबरच दिसून येतात असें जेथे वर्णन असतें, तेथे समुच्चय अलंकार होतो.**

उदा.—

( १ ) विपत्कालीं धैर्य, प्रभुपणिं सहिष्णुत्व बरवें,
सभे पांडित्याचा प्रसर, समरीं शौर्य मिरवे,
स्वकीर्तीच्या ठायीं प्रचुर रति, विद्या-व्यसन जे,
तयांचे हे स्वाभाविक गुण सहा सत्पुरुष जे ॥

—वामन

थोरपणाच्या सिद्धीसाठी एखादा गुण पुरेसा असतां सत्पुरुषांच्या ठिकाणी धैर्यादि सहा गुण समुच्चयाने वास करतात असें वर्णन केल्यामुळे वरील श्लोकांत ‘ समुच्चय ’ अलंकार झाला.

( २ ) अवलोकितांचि आधी भुलला लावण्यकल्पलतिकेला,
त्यांत तिने उचितादर सस्मित मधुरोदितेंहि अति केला ॥

—मोरोपंत, आदिपर्व

शकुंतलेचें ‘ लावण्य ’ हें एक कारण दुष्यन्तास मोह पाडण्यास समर्थ असतांहि ‘ उचितादर ’ व ‘ सस्मित मधुभाषण ’ हीं अन्य कारणेंहि येथे सांगितलीं आहेत, म्हणून ‘ समुच्चय ’ अलंकार झाला

वरील उदाहरणांमध्ये कार्यसिद्धीसाठी अनेक चांगलीं कारणें एकत्र जमल्याचें वर्णन आहे. याच्या उलट, एक वाईट कारण कार्यसिद्धीस समर्थ असतांना अनेक वाईट कारणें उपस्थित असल्याचीं उदाहरणें असतात. खालील पद्यांत तसा प्रकार आहे:—

( ३ ) वाट तरी सरळ कुठे पांदींतिल सारी
त्यांतुनि तर आज रात्र अंधारी भारी !
आणि बैल कसल्याही बुजती आवाजा
किरकिरती रातकिडे झाल्या तिनिसांजा ॥

—यशवंत.

रात्र होत आली तरी घरधनी शेतावरून घरीं परत आला नाही. त्याची वाट पाहणाऱ्या पत्नीने 'वाट सरळ नसणें' 'अंधारी रात्र' व 'बैलांचा बुजरेपणा' अशीं तीन कारणें वरील पद्यांत सांगितलीं आहेत. यांतील कोणत्याहि एका कारणामुळे घरधन्यास येण्यास उशीर होऊं शकतो. येथे तर अनेक कारणांचा समुच्चय आहे. हा समुच्चय वाईट गोष्टींचा झालेला आहे.

**प्रकार दुसरा:—**

(१) जेव्हा कृष्णग्रीवा मन्माळा या युगासि गांठि पडे ।
त्याचि क्षणांत बाई ! खल—भूप—भ्रूलतांसि गांठि पडे ॥
—मोरोपंत, कृष्णविजय.

मित्रविंदेने श्रीकृष्णाच्या गळयांत माळ घालतांक्षणींच शत्रुनृपांच्या भुवयांना आठ्या पडल्या. 'माळ पडणें' व 'आठ्या पडणें' या कार्य-कारणभावावर आधारलेल्या दोन क्रिया एकाच वेळीं घडून आल्या असें काव्यमय वर्णन केल्यामुळे येथे 'समुच्चय' अलंकाराचा दुसरा प्रकार झाला.

(२) क्षितिवरि समकाल पडे मत्स्य, प्रेमळ जनाश्रु, सुमवर्ष ।
हर्ष ब्रह्मांडघटीं कोंदे, तों देव गाति उत्कर्ष ॥
—मोरोपंत, कृष्णविजय.

श्रीकृष्णाने आपल्या बाणाने मत्स्य खाली पाडला, त्याच वेळीं लोकांचे आनंदाश्रु, पुष्पवृष्टि, ब्रह्मांडांत हर्ष भरणें, देवांकडून स्तवन, या गोष्टी घडल्या असें येथे वर्णन आहे. वरील अनेक क्रिया एकाच वेळीं घडल्याचें दाखविल्यामुळे समुच्चयाचा दुसरा प्रकार झाला.

## (४६) समाधि

समुच्चयांत खलेकपोत न्याय आहे, तर समाधींत काकतालीय न्याय असतो. मानिनीचा रुसवा काढण्याची प्रियकर शिकस्त करीत होता पण ती प्रसन्न होईना. इतक्यांत मेघगर्जना झाली आणि प्रियकराचें काम

सफल झालें. प्रेमानें वेडी झालेली स्त्री अंधारांतून प्रियकराकडे चालली होती. तिला रस्ता दिसेना तरी पण ती कशी तरी मार्ग काढीत होती. इतक्यांत वीज चमकली व तिचें कार्य सुलभ झालें. येथे समाधि अलंकार आहे. **समाधि म्हणजे सुलभतेने कार्य घडून येणें.** आपण एखादें कार्य करीत असतों. आपली धडपड चालू असते. इतक्यांत अनपेक्षितपणें कांही तरी कारण होतें आणि आपलें काम साधतें असें समाधीचें स्वरूप आहे.

**समुच्चय प्र. १ आणि समाधि**—यांच्यांतील फरक ओळखला पाहिजे. समुच्चयांत खलेकपोत न्याय असतो; तर समाधींत काकतालीय न्याय असतो. समुच्चयांत अनेक कारणांची गरज असतेच असें नाही. एकहि कारण कार्यास पुरेसें असतें. पण समाधींत अनपेक्षित कारण घडल्याने कार्य सुकर होतें. तें कारण घडलें नसतें तर कार्य कदाचित् झालें नसतेंहि. कार्याचें अनपेक्षित रीतीनें सफल होणें यांत स्वारस्य आहे.

समाधीचे विशेष—

(१) कोणतें तरी कार्य निर्माण करण्याचा प्रयत्न चालू आहे असें वर्णन असलें पाहिजे.

(२) कोणतें तरी आकस्मिक कारण घडल्याने तें कार्य सुकर झालें असें दाखविलें पाहिजे.

(३) समाधीचें स्वारस्य अनपेक्षित कारणाने सफलता होण्यांत आहे.

म्हणून समाधीची व्याख्या अशी—

**आरंभिलेलें कार्य दुसऱ्याच आकस्मिक कारणाने सफल झालें असें जेथे वर्णन असतें तेथे समाधि अलंकार होतो**

उदा.—

(१) ऐन्यामध्ये महालीं निरखित असतां रूपशृंगार बाला,
आला मागूनि भर्ता, पुढति बघुनियां बिम्बयोगें तयाला,

बिम्बाच्या बिंबभावा विसरुनि सरली लाजुनी त्यास मागे,
कान्तें तों आयती ती कवळुनि हृदयीं चुंबिली गाढ वेगें।
—केशवसुत, स्फुट श्लोक.

प्रियेचें चुंबन घेण्याची इच्छा असणाऱ्या पतीस कर्मधर्मसंयोगानें अचानक अनुकूलता लाभल्याचें वर्णन असल्यामुळे वरील श्लोकांत 'समाधि' अलंकार झाला.

( २ ) अनुकूल ब्रह्म तसें तों झालें तन्मनोरथा पर्व ।
तीर्थस्नान कराया पुरवासी लोक चालिले सर्व ॥
——मोरोपंत, कृष्णविजय.

अर्जुनाच्या मनांत सुभद्रेला पळवून न्यायचें होतें. त्या कार्यांत कृष्णाची संमति होतीच, व तशांत त्या वेळीं पर्वणीचा सुयोग आला. त्यामुळे सुभद्राहरण अत्यंत सोपें झालें

येथेंहि समाधि अलंकार आहे.

कित्येकदा असेंहि वर्णन असते की कोणताहि प्रयत्न न करतांच कार्य-सिद्धि झालेली दिसते किंवा अपेक्षिलेल्या कार्यापेक्षा अधिक कार्यप्राप्ति होते. अशा ठिकाणीहि समाधि अलंकार होतो. या प्रकाराला कित्येकांनी **प्रहर्षण** असें नाव दिलें आहे.

उदा.—

आम्हासि आमची बहु, तीची चिंता वृथाच कां पडली
कवड्यांची न मिळावी परि मणिमाळा पथींच सापडली ॥
—मोरोपंत.

राधा आपल्या सखीजवळ कुब्जेला उद्देशून असें म्हणते की या कुब्जेला कुरूपतेमुळे कोणीहि पुसलें नसतें, परंतु तिच्यावर भगवान श्रीकृष्ण प्रसन्न झाला हें आश्चर्य आहे. अपेक्षेपेक्षा अधिक कार्यसिद्धि दर्शविल्यामुळे येथे ' प्रहर्षण ' अलकार झाला.

## (४७) यथासंख्य

**यथासंख्य म्हणजे संख्येला अनुसरून असणें.** पुढील पद्य पाहा—

अरि–बुध–याचक वृंदा एक असुनि तीन दाविसी रूपां।
शौर्यें–धीनें–दानें, हरिसा–गुरुसा–कुबेरसा भूपा ॥

या पद्यांतील शब्द एका विशिष्ट क्रमाने आले आहेत. ते असे—

| | | |
|---|---|---|
| अरि | बुध | याचक |
| शौर्यें | धीनें | दानें |
| हरिसा | गुरुसा | कुबेरसा |

—मासमी.

आणि हीच यांतील चमत्कृति आहे. कांही वस्तु पद्यांत एका क्रमाने येतात व त्यांशी संबंधित असलेल्या तितक्याच गोष्टी त्याच विशिष्ट क्रमाने येतात. यांची रचना अशी असते. एका जातीच्या वस्तूंची एक पंक्ति असते, दुसरी, तिसरी, तशीच एकएका जातीची पंक्ति असते. त्या प्रत्येक पंक्तींतील एक एक शब्द एका विशिष्ट क्रमाने घेऊन अन्वय करावयाचा असतो. म्हणून ते शब्द त्या पंक्तींतील 'क्रमिक' होत. उदा. अरि-बुध-याचक ही एक पंक्ति, शौर्य–धी--दान ही दुसरी पंक्ति, हरि-गुरु कुबेर ही तिसरी पंक्ति. पहिल्या पंक्तींतील अरि हा पहिला शब्द दुसऱ्या व तिसऱ्या पंक्तींतील पहिल्या शब्दाबरोबर घेऊन अन्वय करावा लागतो. अरि-बुध इत्यादि त्या त्या पंक्तींतील क्रमिक होत. म्हणून यथासंख्य म्हणजे क्रमिकांचा समन्वय होय.

यथासंख्य अलंकारांत काव्यगत रमणीयत्व फारच थोडें असतें; किंबहुना नसतेंच. यांतील सौंदर्य अर्थामध्ये नसून शब्दांच्या विशिष्ट मांडणींत आहे. म्हणून यथासंख्य हा अलंकार मानू नये असें अनेकांचें मत आहे.

यथासंख्यांतील विशेष गोष्टी—

१. यथासंख्यांत दोन किंवा अधिक वस्तूंचे समूह असतात.

२. प्रत्येक जातीच्या वस्तू एका एका पंक्तींत असतात.

३. पहिल्या पंक्तींतील शब्दांचा एक विशिष्ट क्रम असतो.

४. त्याला अनुसरूनच पुढील पंक्तींतील वस्तूंचा क्रम असतो.

५. पहिल्या पंक्तींतील पहिल्या शब्दाचा पुढील पंक्तींतील पहिल्याच शब्दाशी अन्वय होतो.

६. एका पंक्तींतील शब्दांना क्रमिक म्हणतात.

७. अशा प्रकारे प्रत्येक पंक्तींतील क्रमिकांचा समन्वय म्हणजे यथासंख्य.

८. यथासंख्यांतील वर्णनीय वस्तु रमणीय असेल तर यथासंख्य बहारदार होतो.

९. जितक्या पंक्ती जास्त तितका चमत्कार अधिक.

व्याख्या—**क्रमिकांचा समन्वय म्हणजे यथासंख्य होय**; किंवा **पहिल्या पंक्तींत ज्या क्रमाने पदार्थ असतात, त्याच क्रमाने पुढील पंक्तींतील पदार्थ घेऊन त्यांचा संबंध जेथे जोडला जातो तेथे यथासंख्य अलंकार होतो.**

उदा.—

( १ ) तृण जल वनधान्यें देउनी अंजलीने
मृग तरु शकुनी जे पोषिले मैथिलाने
निरखुनिच तयांतें होय कांही विकार
द्रवसम हृदयाला स्पष्ट हा भेदणार ॥

—गोडबोले, उत्तररामचरित.

वरील श्लोकांतील प्रथम चरणांत तीन वस्तूंची एक पंक्ति आहे. त्या वस्तूंचा संबंध द्वितीय चरणांत आलेल्या तीन वस्तूंशीं आहे. हा संबंध

त्या विशिष्ट क्रमानेच जोडलेला आहे. म्हणजे तृणाचा मृगाशी, जलाचा तरूशी व वनधान्यांचा शकुनीशी संबंध आहे. म्हणून येथे यथासंख्य अलंकार झाला.

( २ ) तृणें मृगाला, सलिलें झषाला, ।
संतोष हे वृत्ति महाजनांला, ॥
तयास निष्कारण तीन वैरी ।
किरात, कैवर्तक, दुष्ट, भारी ॥

——वामन.

वरील श्लोकांत मृग, झष ( मासा ) व महाजन या तीन गोष्टी क्रमाने आल्या आहेत त्याच क्रमाने त्यांचा संबंध किरात ( शिकारी ) कैवर्तक ( कोळी ) व दुष्ट या तीन गोष्टींशी जुळविलेला आहे. म्हणून येथे यथासंख्य अलंकार झाला.

(३) दंडगदापाशाशनिधर काल कुबेर की वरुण शक्र ।
यांचेंहि भय नसे मज जरिहि श्वभ्रीं पडेल रथचक्र ॥

—मोरोपंत, कर्णपर्व.

वरील आर्येंत दंड, गदा, पाश व अशनि या चार गोष्टींची एक पंक्ति आहे. त्यानंतर आलेल्या काल, कुबेर, वरुण व शक्र या चार गोष्टींची दुसरी पंक्ति आहे. प्रथम पंक्तींतील गोष्टींचा संबंध त्याच अनुक्रमाने द्वितीय पंक्तींतील वस्तूंशी जुळविला आहे. म्हणून यथासंख्य अलंकार झाला.

## (४८) पर्याय

क्रमावर आधारलेला पर्याय हा दुसरा अलंकार. क्रमामध्येंहि एक प्रकारची सुसंगतता असते; आणि सुसंगततेंत सौंदर्य असतें. एकच मनुष्य आपल्याला आता येथे भेटला, मग तेथे भेटला, मग तिसऱ्या ठिकाणी भेटला तर आपण चकित होतोच की नाही? तसेंच एखादे वेळीं आपल्या घरीं एक पाहुणा येतो, तो जातांच दुसरा येतो, तो गेल्यावर तिसरा येतो

तेव्हाहि आपण चकित होतों. काव्यांतहि अशा प्रकारें सौंदर्यनिर्मिती होते. पार्वती उन्हाळ्यांत तप करीत होती. नंतर पाऊस आला तेव्हा पावसाचा पहिला थेंब तिच्या पापणीवर पडला तो तेथून लागलीच घसरून तिच्या वक्षःस्थळावर पडला, तेथून तो पोटावरून घसरत नाभिप्रदेशीं गेला. हा क्रम आहे, आणि **क्रम म्हणजे पर्याय**.

वरील क्रम साधा आहे. पण तोच अतिशयोक्तीवर ( अध्यवसायावर ) आधारलेला असला म्हणजे अधिक रमणीय होतो. हालाहल विष प्रथम समुद्राच्या हृदयांत होतें, तेथून तें शंकराच्या कंठांत गेलें; आणि आता तें दुर्जनाच्या जिभेवर आलें. येथील क्रमांत अध्यवसाय आहे. पहिला अध्यवसाय म्हणजे कटु बोलणें याला हालाहल म्हटलें आहे; आणि दुसरा म्हणजे हृदय, कंठ आणि जीभ हे तिघांचे असले तरी एकाच कल्पनेंत घेतल्याने ते एकाचेच वाटतात व त्यांचा चढता क्रम दिसतो.

**पर्याय १ आणि विशेष २**—पर्याय १ आणि विशेष २ यांत एकच वस्तु निरनिराळ्या ठिकाणी दिसते. पण पर्यायांत ती क्रमाने दिसते तर विशेषांत ती एकाच वेळीं दिसते.

पर्यायाच्या या प्रकारांत एकच वस्तु अनेक ठिकाणीं क्रमाने गेलेली दिसली. पण पर्यायाचा दुसराहि प्रकार आहे. तेथे एकाच ठिकाणी अनेक वस्तु क्रमाने येतात. " पूर्वी जेथे रमणी फिरत असत, तेथेच आज कोल्हीं-कुत्रीं फिरावीत ना ! " हें ओसाड अयोध्येचें वर्णन कोणाला चटका लावत नाही ! जे शरीर पूर्वी सुवर्णानेच झाकलें जात असे, तेथे आज फाटकीं लक्तरें दिसावींत ! "—येथेहि आकर्षकता आहे. हा दुसरा पर्याय.

पर्यायाचे विशेष—

१. पर्यायांत एकच वस्तू क्रमाने अनेक ठिकाणी दिसते असें वर्णन असतें.
२. हें वर्णन अतिशयोक्तीवर आधारलें असेल तर अधिक रमणीय होतें.

३. पर्यायामध्ये जसा आरोह ( वर चढणें ) असूं शकतो तसा अवरोहहि ( खाली येणें ) असूं शकतो. उदा. गंगे, काय हें तुझें कृत्य ! पूर्वी तूं शंकराच्या शिरावर होतीस, तेथून हिमालयावर पडलीस, तेथून जमिनीवर आलीस; आणि आता रसातळास चाललीस !

हा क्रम स्थल किंवा काळांतहि असूं शकतो.

४. पर्यायोक्ताच्या दुसऱ्या प्रकारांत एकाच ठिकाणी अनेक वस्तु एका मागे एक येतात असें दाखविलें असतें.

५. दुसरी वस्तु येतांना पहिली वस्तु निघून गेली पाहिजे.

६. याचा विषय मूळचाच काव्यमय असला पाहिजे. जेथे घट होता तेथे आता पट आहे यांत पर्याय नाही. यांत अतिशयोक्तीला फारशी जागा नसते.

७. पहिल्या पर्यायांत एक आधेय क्रमाने अनेक आधार घेतें तर दुसऱ्या पर्यायांत अनेक आधेयें क्रमाने एकच आधार घेतात.

म्हणून पर्यायाची व्याख्या अशी––

**जेथे एकच वस्तु क्रमाने अनेकांचा आश्रय करते, किंवा अनेक वस्तु क्रमाने एकाचाच आधार घेतात तेव्हा पर्याय अलंकार होतो.**

उदाहरणें––

(१) या घराण्यांतील विद्याव्यासंग पाहून असें वाटतें की, सरस्वती ब्रह्मलोकांतून त्रैलोक्य पाहावयास निघाली. स्वर्गात कांहीं काळ घालविल्यावर पृथ्वीतलावर येऊन तिने कांहीं काळ महाकवींच्या सहवासांत घालविला व आज ती या गृहांत स्थिर झाली आहे.

येथे सरस्वती क्रमाक्रमाने एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं गेलें असें दाखविलें आहे म्हणून पर्याय अलंकार.

(२) हालाहला ! शिकविलें तुज सांग कोणें
ये ज्यामुळे तुज महत्त्व असें क्रमाने
आधी समुद्रहृदयीं, मग शंकराच्या
कंठीं, अता दिससि तूं वचनीं खलांच्या ॥

हालाहल विष हृदय, कंठ व जीभ अशा क्रमाने चढत गेल्याचें येथे दाखविलें आहे.

(३) स्वर्गापासुनि शर्वमस्तकतटीं, तेथूनिया भूधरीं
शैलाग्राहुन भूतलीं उतरली ते स्वर्णदी सत्वरीं ।
गेली तेथुनि अर्णवाप्रति मदें, ते वंद्यही कष्टली
जे का दुर्मद त्यां अधःपतनता आहे बरी निर्मिली

—वामन पंडित.

गंगानदी क्रमाक्रमाने खाली उतरली असें वर्णन आहे म्हणून पर्याय.

**पर्याय प्रकार दुसरा—**

भृंगे गुंजारवातें करिति शिरिं असे मत्त हत्तीहि जीतें
डोळां देखोनि होते पळत भयभरें सोडुनीया धृतीतें, ।
जेथे मुक्ताफळांचा खच बहु पडला, त्या गुहेमाजि आता ।
सिंहाच्या, क्षुद्र कोल्हे कलकल करिती मृत्युने त्यास नेतां ॥

—कृष्णशास्त्री चिपळूणकर, 'सिंहान्योक्ति'

मुक्ताफळें व कोल्हे या दोन भिन्न गोष्टी क्रमाने एकाच वस्तूचा, म्हणजे सिंहाच्या गुहेचा आश्रय करतात असें वर्णन असल्यामुळे येथे पर्याय अलंकाराचा दुसरा प्रकार झाला.

# (४९) परिवृत्ति

परिवृत्ति म्हणजे अदलाबदल किंवा देवघेव. अर्थात् ही देवघेव काव्यमय असली पाहिजे; वास्तव नको. ' वाऱ्याने लतांना नर्तन दिलें आणि सुगंध घेतला ' असें कवि वर्णन करतो. मालविकेने अशोकाला रक्तचरणाचा स्पर्श दिला आणि फुलें घेतलीं; या ठिकाणीहि कविकल्पित अदलाबदल आहे. म्हणून येथे परिवृत्ति अलंकार आहे.

**परिवृत्ति आणि पर्याय प्र.** २ यांत फरक आहे. पर्यायांत व परिवृत्तींत एक वस्तू जाते व त्या ठिकाणी दुसरी वस्तु येते. पण परिवृत्तींत अदलाबदल असते ती पर्यायांत नाही. लतांचा सुगंध वायूपाशी गेला व वायूजवळचें नर्तन लतांना मिळालें. ही परिवृत्ति होय. सुदाम्याची झोपडी जाऊन तेथे राजवाडा आला. पण जेथून राजवाडा आला तेथे झोपडी गेली नाही. हा पर्याय होय.

परिवृत्तीमध्ये ज्या दोन गोष्टींची अदलाबदल असेल ती सारख्या ( सम ) वस्तूंची असेल किंवा असम वस्तूंची असेल. त्याप्रमाणे तिचे प्रकार होतील.

**परिवृत्तीला लागणाऱ्या आवश्यक गोष्टी अशा —**

१. परिवृत्तीमध्ये देवघेव किंवा अदलाबदल असते.
२. ही देवघेव कविकल्पित असली पाहिजे; वास्तव नको.
३. त्यांत देणारा आणि घेणारा अशा दोन व्यक्ति पाहिजेत.
४. परिवृत्ति समवस्तूंचीहि असेल किंवा असम वस्तूंची असेल.
५. घेण्यादेण्यांत जितकी सूक्ष्मता असेल तितकें वैचित्र्य अधिक.

व्याख्या—

**दोन व्यक्तींमध्ये दोन सारख्या किंवा कमीअधिक वस्तूंची कविकल्पित देवघेव किंवा अदलाबदल वर्णन केली असते तेथे परिवृत्ति अलंकार होतो.**

उदाहरणें--

**समपरिवृत्ति**

(१) देउनि सुतरत्न करीं, घेउनि पतिचित्तवित्त ती गेली;।
नेत्रोदकें तिघांच्या गंगा गंगातटीं नवी केली ॥

—मोरोपंत, आदिपर्व. अ. १२ गी. ७०

सुतरूपी रत्न देऊन पतिचित्त-रूपी द्रव्य घेतलें असें वर्णन केल्यामुळे येथे समपरिवृत्ति झाली आहे.

(२) गमो मधुर हें विषस्तवन; सेवितां माजवी;
करी मलिन सद्यशोमुख; हलाहला लाजवी;।
हरापरिस तूं बरा प्रभुवरा ! सदा जो पिशी
असा रस समर्पि, त्या अमृत आपुलें ओपिशी ॥

—मोरोपंत, केकावलि.

परमेश्वर ( स्तुतिरूप ) विषाचा स्वीकार करून त्याहून मौल्यवान जें अमृत तें भक्तांना देतो, असें वर्णन असल्यामुळे येथे 'अधिकपरिवृत्ति' झाली.

(३) जाय पुरीप्रति जोडी अपकीर्ति, सुकीर्ति हातची दवडी।
मातेप्रति पोर जसें मुद्रा हरवूनि मेळवुनि कवडी ॥

—मोरोपंत, विराटपर्व

मुलाने अंगठी देऊन कवडी घेण्याची नुकसानकारक देवघेव केल्यामुळे द्वितीय ओळींत न्यूनाधिक परिवृत्ति झाली.

## (५०) परिसंख्या

परिसंख्या हा मीमांसेंतील पारिभाषिक शब्द आहे. अनुमान, काव्यलिंग, दृष्टांत या कल्पना जशा आलंकारिकांनी तर्कशास्त्रांतून घेतल्या तशीच परिसंख्येची कल्पना त्यांनी मीमांसकांपासून घेतली व काव्यसौंदर्याकरिता तिचा उपयोग करून घेतला.

परिसंख्या हें विशिष्ट प्रकारचें बोलणें आहे. तें वाक्य "अमुक करावें" अशा स्वरूपाचें असतें; पण त्याचा अर्थ " इतर तशा गोष्टी करूं नयेत " असा असतो.

उदा.—" दिवाळींत सोंगट्या खेळाव्यात " या वाक्याचा अर्थ दिवाळींत सोंगट्या खेळल्याच पाहिजेत असा नाही. इतर वेळीं खेळूं नका असा त्याचा अर्थ आहे. ही परिसंख्या होय. म्हणजे परिसंख्येंत जें सांगितलें असतें त्याचा अर्थ " तसल्या प्रकारच्या दुसऱ्या वस्तू वर्ज्य कराव्यात " असा असतो. म्हणून परिसंख्येंत दुसऱ्या सदृश वस्तूचा निषेध किंवा वर्जन असतें. परिसंख्या म्हणजे तादृश अन्यव्यपोह ( वर्जन ) किंवा वर्जनबुद्धि. ( परि = वर्जन; संख्या = बुद्धि. )

या परिसंख्येचा किंवा वर्जनबुद्धीचा उपयोग कवि कसा करून घेतो तें आता पाहा. " मरण कोणतें ? " असा प्रश्न विचारला. याचें उत्तर श्वासोच्छवास बंद होणें, हालचाल बंद होणें; असें आपण देऊं. पण कवि म्हणतो " मूर्खपणा म्हणजे मरण ! " हें ऐकतांच आपल्याला धक्का बसतो आणि आपण म्हणतों " अस्सं ! आपण समजतों तें मरण नव्हे तर ! " —अगदी हेंच उत्तर कवीला आपल्याकडून काढून घ्यावयाचें असतें. काव्यांतील सदृश–अन्य–व्यपोह तो हा. " अलंकार कोणता ? " या प्रश्नाला कवि उत्तर देतो " शील हा अलंकार " यांतहि अन्यव्यपोह आहे.

परिसंख्येमध्ये पुष्कळदा श्लेषाचाहि उपयोग करण्यांत येतो. शूद्रक राजाचें वर्णन करतांना बाण म्हणतो, " त्याच्या राज्यांत वर्णसंकर चित्रकलेंतच दिसत होता; दण्ड फक्त यतींनाच मिळत असे; करग्रहण फक्त विवाहकालींच दिसे. " येथेहि प्रजेंत वर्णसंकर नव्हता; गुन्हेगार नसल्याने कोणालाहि दण्ड होत नसे; व लोकांवर कर लादले जात नसत असें सांगण्याचा कवीचा अभिप्राय आहे. येथे श्लेषावर परिसंख्या उभारली आहे.

परिसंख्येचे अनेक प्रकार कल्पिले आहेत.

" काय भूषण मानवा ? यश शुभ्र; रत्न न तैजस "

या पद्यांत परिसंख्येचीं सर्व अंगें आहेत. यांत (१) प्रश्न आहे. (२) त्याचें उत्तर आहे; व (३) वर्जन करावयाची वस्तूहि सांगितली आहे. पण कवि नेहमीच इतक्या गोष्टी सांगत नाही. तो कित्येकदा प्रश्न विचारतो किंवा विचारतहि नाही. याला अनुसरून प्रश्नपूर्वक परिसंख्या व शुद्ध परिसंख्या असे भेद होतात. शिवाय जी वस्तु वर्ज करावयाची ती तो शब्दाने सांगेल किंवा रसिकांनी ओळखावी म्हणून सोडून देईल. असे परिसंख्येचे एकूण चार प्रकार होतात.




परिसंख्येचे विशेष असे—

१. अन्यव्यपोह किंवा दुसऱ्या सदृश वस्तूंचें वर्जन हा परिसंख्येचा हेतु असतो.

२. कवीने एखादी गोष्ट अशी सांगावयाची असते की तिचा परिणाम अन्यव्यपोहांत झाला पाहिजे.

३. वर्जनीय वस्तु सूचित करण्यांत अधिक स्वारस्य असतें.

४. कवीच्या विधानापूर्वी प्रश्न असतो किंवा नसतोहि.

५. वर्जनीय वस्तु सांगितली असते किंवा नसतेहि.

६. श्लेषमूलक परिसंख्याहि असू शकते.

व्याख्या —

**इतर सारख्या वस्तूंचें वर्जन करण्याच्या उद्देशाने जेव्हा एखादी गोष्ट सांगितलेली असते; किंवा एखादी गोष्ट सांगितल्या-बरोबर इतर सर्व गोष्टींचें वर्जन होतें अशा ठिकाणी परिसंख्या अलंकार होतो.**

उदा.—

(१) रात्रिंदिवस चिंतावी कोण ? गुरुवरा स्वदासविश्रमदा ।
कुशलें संसाराची ध्यावी निःसारताचि, न प्रमदा ॥१॥
स्वामी कोण सुदुःसह सर्वां नरकांपरीसही नरक ? ।
परवशताचि निरय, हें जाणुनि तूं संग सोडुनी सरक ॥२॥

—मोरोपंत.

वरील आर्यांमध्ये कांही गोष्टींचा निर्देश केला असून, इतर ज्या वर्ज्य गोष्टी त्याहि स्पष्ट शब्दांत निवेदन केल्या आहेत.

(२) कोणा अंध म्हणावें ? न दिसे सन्मार्ग उघडही ज्यास ।
कोण बधिर ? जो नाही परिसत केल्या हितोपदेशास ॥१॥
कोण दरिद्री ? ज्याच्या हृदयीं तृष्णा सदा विशाल वसे ।
श्रीमान् कोण म्हणावा ? जो नर संतुष्टचित्त नित्य असे ॥२॥

—कृष्णशास्त्री चिपळूणकर.

येथे प्रश्न विचारले आहेत, त्यांचीं उत्तरें दिलीं आहेत, परंतु वर्जन करण्याच्या वस्तु स्पष्ट शब्दांनी सांगितल्या नाहीत. वर्जनीय वस्तु वाचकांनी ओळखावयाच्या आहेत. म्हणून प्रश्नपूर्वक आर्थी परिसंख्येचें हें उदाहरण होय.

शुद्ध शाब्दी परिसंख्याः —

(१) श्रुतींचि कीं श्रोत्र न कुंडलानें ।
दानेंचि कीं पाणि न कंकणानें ॥
साजे तसा देहहि हा न आनें ।
परोपकारेंचि न चंदनानें ॥

---वामन

येथे ' कशामुळे काय शोभतें ' तें सांगितलें असून वर्जनीय वस्तु कोणती ( म्हणजे ' कशामुळे शोभत नाही ' ) हें स्पष्ट शब्दांत सांगितलें आहे. वरील श्लोकांत अशा प्रकारचीं तीन विधानें आहेत. मात्र प्रश्न विचारलेला नाही, म्हणून येथे ' शुद्ध शाब्दी परिसंख्या ' झाली.

(२) आता भार नसे कुणास पण तो शिंक्यास भारी असे,
हातां काम नसे, परंतु पडतें तोंडास तें फारसें;
कोणा मार नसे, परी पण शिरीं तो सांगव्यांच्या बसे;
कोणा त्रास नसे, परंतु नयनां तो जागरें होतसे !

—केशवसुत, ' दिवाळी '

वरील श्लोकांत दिवाळीच्या सणांत काय काय घडतें व काय घडत नाही याचें वर्णन आहे. या उदाहरणांत वर्जनीय वस्तु प्रारंभीं व नंतर विधिरूप विधान असा क्रम ठेवलेला आहे. हेंहि शुद्ध शाब्दी परिसंख्येचें उदाहरण मानण्यास हरकत नाही.

शूर भुजांनी क्षत्रिय, शब्दांनी विप्र, पार्थ चापानें ।

——मोरोपंत.

क्षत्रियांचें शौर्य भुजांमुळे सिद्ध होतें, विप्रांचें शौर्य शब्दपांडित्यानें व अर्जुनाचें शौर्य धनुष्यानें असें विधान केलें आहे. येथे प्रश्न नाहीत, तसेंच वर्जनीय वस्तु शब्दांनी सांगितल्या नसून त्या ओळखावयाच्या आहेत. म्हणून या ठिकाणी ' शुद्ध आर्थी परिसंख्या ' हा अलंकारप्रकार झाला.

## (५१) उत्तर

परिसंख्येंत प्रश्नाचें जें उत्तर मिळतें त्यांत 'अन्यव्यपोह' हें प्रयोजन असतें, तर उत्तरालंकारांत जें उत्तर मिळतें त्यांत खुद्द उत्तरांतच चमत्कृति असतें. पुढील पद्य पाहा—

काय विषम? दैवगती; दुर्लभही काय? जन गुणग्राही।
सौख्यद काय? सुपत्नी; दुःख जगीं काय? दुष्टजन पाही॥
----( अलंकारचंद्रिका ) भाषांतर.

येथे प्रश्नाला जीं उत्तरें मिळालीं आहेत तीं विचारणाऱ्याच्या स्वप्नींहि नसतील. हीं उत्तरें ऐकल्याबरोबर आपल्याला आश्चर्य वाटतें. उत्तराची चमत्कृति हा उत्तर अलंकाराचा प्राण आहे.

येथे प्रश्न आणि उत्तरें दोन्हीहि आपल्या समोर आहेत. त्या प्रश्नाच्या दृष्टींतून पाहिलें म्हणजे उत्तराची चमत्कृति अधिकच नजरेंत भरते. पण कित्येकदा आपल्या समोर कवि नुसतें उत्तरच ठेवतो. तें वाचल्याबरोबर तें कशाला उद्देशून असेल हें आपल्या लक्षांत येतें व मग त्या उत्तराची खुमारी आपल्याला अधिकच कळते. उदा.—

वैधव्य शूरनिधनीं मज ताप देतें
तैसें उदार पुरुषीं मन खिन्न होतें।
मद्वैरिणीवरि सदा विबुधानुसक्ती
या कारणें कृपण म्या वरिला स्वचित्तीं॥
—ना. न. फडणीस

असें लक्ष्मी म्हणते. असें ती कां म्हणत असेल?—हें तिने कशाला उत्तर दिलें असेल?— "शूर, उदार किंवा विद्वान् यांपाशी लक्ष्मी राहत नाही आणि कृपणापाशी राहते असें कां?" या प्रश्नाला लक्ष्मीचें हें मार्मिक उत्तर आहे. हा प्रश्न लक्षांत आला म्हणजे उत्तराची खुमारी अधिकच वाढते.

पहिल्या प्रकारचें उत्तर घ्या किंवा दुसऱ्या प्रकारचें उत्तर घ्या, **उत्तराच्या अनपेक्षितपणांत उत्तरालंकाराचें वैचित्र्य आहे.**

सारांश, विचित्र उत्तर ऐकल्याबरोबर त्यामागील प्रश्न लक्षांत येतो; किंवा प्रश्नांना दिलेलीं उत्तरें जेथे ऐकणाऱ्यांस चकित करून सोडतात तेथे उत्तर अलंकार होतो.

उत्तर अलंकाराचे विशेष—

१. उत्तराच्या एका प्रकारांत फक्त उत्तर दिलेलें असतें.

२. तें उत्तर वैचित्र्यपूर्ण असतें आणि त्यावरून ज्या प्रश्नाला म्हणजेच ज्या परिस्थितींत तें उत्तर दिलेलें असतें त्या परिस्थितीचा बोध होतो व त्यामुळे उत्तराची खुमारी वाढते.

३. उत्तराच्या दुसऱ्या प्रकारांत प्रश्नाला अनपेक्षित उत्तर दिलेलें असतें. सामान्यतः असे अनेक प्रश्न व अनेक उत्तरें एकत्र असतात; पण एकच उत्तरसुद्धा चमत्कृति निर्माण करूं शकतें.

व्याख्या—

**चमत्कृतिपूर्ण उत्तर ऐकतांच ज्या प्रश्नाचें तें उत्तर आहे तो प्रश्न तात्काल मनांत येतो, किंवा विचारलेल्या प्रश्नाला किंवा प्रश्नांना अनपेक्षित उत्तरें जेथे दिलेलीं असतात, तेथे उत्तर अलंकार होतो.**

उदाहरणें—

(१) विश्वाचा बिस्तार केवढा ?—ज्याच्या त्याच्या डोक्याएवढा

—केशवसुत

वरील उदाहरणांत एक प्रश्न असून त्याचें वैचित्र्यपूर्ण उत्तर आहे.

(२) स्वामी, शूर म्हणावें कोणाला ? हें मला तुम्ही बोधा ।
शिष्या, स्त्रीनेत्रशरें पावेना जो व्यथेसि तो योधा ।
गुरुजी, मरण कवण हें सांगुनि मजला निवृत्ति द्या विपुला ।
बाळा ! मूर्खत्वाचि रे निधन महा तें नसो नसो रिपुला ॥

—मोरोपंत

येथेंहि प्रश्नांस दिलेलीं उत्तरें वैचित्र्यपूर्ण व सहज न सुचणारीं अशीं आहेत. म्हणून हेंहि उत्तर अलंकाराच्या पहिल्या प्रकाराचें उदाहरण होय.

( ३ ) धनपति जरि तूं रे, मी असे शास्त्रवेत्ता।
भट समरिं जरी तूं, मी महा वादि-जेता ॥
अनुचर जरि तूंतें सेविती, छात्र मातें।
न गणिशि मज, जातों तुच्छ मानूनि तूतें ॥

—वामन

येथे प्रश्न सांगितलेला नाही, नुसतें उत्तर दिलें आहे, तथापि त्या उत्तरावरून 'गरीब माणसाचें येथे काय काम?' असा प्रश्न ध्वनित होतो व वाचकांच्या लक्षांत येतो, म्हणून उत्तर अलंकाराच्या दुसऱ्या प्रकाराचें हें उदाहरण होय.

**मीलितापासून उत्तरापर्यंत अभ्यासार्थ उदाहरणें--**

(१) भलें स्मरण जाहलें समयिं, कंसदासी करें
कशी उजरली समुज्ज्वलदयासुधासीकरें?
तुम्हां स्वरिपुची तशी बटिक आवडे, मत्कृती
नको, न सजवे, असा बहुत काय मी दुष्कृती?

—मोरोपंत, केकावलि.

(२) लिंबलोण ग कोणी उतरा
जगदंबेचा ग अंगारा
लावा, बांधा गंडा—दोरा
काळजि घ्या चांगली।

—भा. रा. तांबे.

(३) मानी मनोजशर हारतुरे फुलांचे
कंदर्पकोपवचन ध्वनि कोकिलांचे
राका—शशी मदनदर्पण भाविला, हे—
ने घेचि, तो न परिसे, न तयासि पाहे ॥

—रघुनाथ पंडित, दमयंतीस्वयंवर

(४) समागम तुझा घडो, म्हणुन जाहले लाकडें
तपोऽनलिं, तसे मुनि त्यजुनि, जोडिलीं माकडें ।
अयुक्त बहु ज्या जनास्तव घडे पडे साकडे,
तदुक्तिहुनि आमुचें बहुत बोलणें वाकडें ॥

—मोरोपंत, केकावलि.

(५) दिलें हिरण्मय
हातीं मृण्मय
हा हत विनिमय !

—केशवसुत.

(६) बल्लव म्हणे, ' विराजे पाणि श्रितसमवनें, न वलयशतें ।
केलें कलत्ररक्षण पतिने, तरि काय हो ! नवल यश तें ? ॥

—मोरोपंत, विराटपर्व.

(७) काय निराशा असे बरें ? बुजगबाहुलें जगांतलें ।

—केशवसुत

(८) या दारावरुनि का एकच वाट भऱ्याला ।
ते चुगल पाय पारि ओढिति या मार्गाला ॥
कां इथेच कमरेवर घागर खळखळते ।
कां इथेच तुमचें पाउल हो अडखळतें ॥
कां इथेच तुमचे कांकण रुणझुणती
कां इथेच तुमचे पैंजण हो झुमझुमती ॥
कां इथेच मुरडुनि मुरडुनि बघतां मागे
कां इथेच बहिणिस रोजच भरतां रागें

—तांबे, स्त्रीहृदय.

# (५२) सार

सार म्हणजे उत्कर्ष किंवा परासीमा. जेव्हा काव्यांत एखादा धर्म पायरीपायरीने जातां जातां अखेर परासीमा गाठतो तेव्हा सार अलंकार होतो. सार अलंकार शृंखलामूलक अलंकारांपैकी एक आहे. " मधु मधुर, सुधा त्याहुनी, कविवाणी परि सुधेहुनि मधुरा " यांत माधुर्यधर्म कवि-वाणींत उत्कर्ष पावला असें दाखविलें आहे. येथे माधुर्यधर्म सांगितला आहे. पण कित्येकदा धर्म सांगितलाहि नसतो. " संसारांत सचेतन, त्यांतहि पंडित, तयांत साधुजन । साधुजनांतहि निःस्पृह ... " येथे श्रेष्ठता किंवा धन्यता हा धर्म आहे.

सार अलंकारांत ज्याप्रमाणे उत्कर्ष दाखवितां येतो तसा अपकर्षहि दाखवितां येतो.

> " कार्पास लघु तृणाहुनि, कार्पासाहून याचक लहान ।
> प्रार्थील मला म्हणुनी वायूहि तया न नेत वाहून ।। "

येथे याचकाचा अपकर्ष दाखविला आहे.

सारालंकाराला आवश्यक गोष्टी अशा—

१. सारालंकारांत शृंखला असते.

२. त्या शृंखलेच्या द्वारें एखाद्या धर्माचा एखाद्या वस्तूंत परमोत्कर्ष दाखविला असतो.

३. सारामध्ये अपकर्षाची परावधीहि दाखवितां येते.

व्याख्या—**पूर्वीच्या वस्तूहून पुढील वस्तूंत एखाद्या धर्माचें क्रमाक्रमाने आधिक्य आहे असें व शेवटच्या वस्तूंत त्याची परमावधि झाली आहे असें जेथे वर्णन असतें तेथे सार अलंकार होतो.**

उदाहरण--

(१) स्त्री ही घराची शोभा होय. सुशिक्षित स्त्री म्हणजे संसाराचें भूषण आणि शीलवती स्त्री ही तर साक्षात् देवताच !

या उदाहरणांत स्त्रीमधील सद्‌गुणांचा वाढता उत्कर्ष वर्णिला असून तिला ' देवता ' म्हणण्याने त्या उत्कर्षाचा कळस झाला आहे. म्हणून सार अलंकाराचें हें उदाहरण होय.

(२) अग्नि असे हा तेजस्वी रे फार
त्याहुनि भारी सूर्य नभींचा थोर
परी किरण तुजमध्ये जो सत्याचा
प्रकाश सर्वोत्तम तो आहे त्याचा

--केशवसुत, ' विद्यार्थ्याप्रत '

अग्नि, सूर्य व सत्याचा किरण या गोष्टी तेजस्वीपणांत एकापेक्षा एक सरस आहेत असें येथे वर्णन असल्यामुळे येथे ' सार ' अलंकार झाला. वरील उदाहरणाप्रमाणे याहि उदाहरणांत वस्तूंचा विशिष्ट गुणांबाबत उत्तरोत्तर उत्कर्ष वर्णिला आहे.

(३) आधीच मर्कट तशांतहि मद्य प्याला ।
झाला तशांत जरि वृश्चिकदंश त्याला ॥
झाली तयास तदनंतर भूत-बाधा ।
चेष्टा वदूं मग किती कपिच्या अगाधा ! ॥

—वामन.

माकडचेष्टा अगोदरच चमत्कारिक व हास्यास्पद असतात. तशांत वृश्चिकदंश झाल्यास त्या अधिकच चमत्कारिक व हास्यास्पद होणार, आणि त्यानंतर भूतबाधाहि झाली तर मग त्या गुणांचा अतिरेकच दिसणार !

( ४ ) व्रजावन करावया वसविलें नखाग्रीं धरा;
सलील तइं मंदराख्यहि नग स्वपृष्ठीं धरा;
वराहतनु घेउनी उचलिली रदाग्रें धरा,
सुदुर्धर तुम्हां कसा पतित हा ? न कां उद्धरा ? ॥

—मोरोपंत, केकावलि.

परमेश्वराने ( कृष्णावतारांत ) आपल्या बोटावर गोवर्धन पर्वत उचलला हा एक पराक्रम, ( कूर्मावतारांत ) पाठीवर ( गोवर्धनाहून मोठा असणारा ) मंदरपर्वत धारण केला, आणि ( वराहावतारांत ) सर्व पृथ्वीच दातांवर उचलून धरली. अशा प्रकारचे उत्तरोत्तर वाढते पराक्रम वर्णिले असल्यामुळे ' सार ' अलंकार झाला.

(५) कुंतीस काय सांगूं, कृष्णेला दाखवूं कसें वदन ।
दुष्कर मला सुभद्रा-सांत्वन, दुर्दर्श उत्तरासदन ॥

—मोरोपंत

या आर्येंत उत्तरोत्तर अधिक कठीण असें कार्य सांगितलें आहे. कार्याचें कठिनत्व उत्तरोत्तर वाढत गेलें आहे, तसेंच तीं कार्यें करतांना अर्जुनास वाटणारी लाज हीहि क्रमशः वाढत गेली आहे. येथेहि ' सार ' अलंकार झाला, मात्र तो अपकर्षाने झाला.

(६) म्लेंच्छ मनुष्याचा मळ, त्या म्लेंच्छांचा मळ स्वयें तेली ।
त्या तेल्याचा मळ ते ज्यांची पुंप्रकृति संक्षया गेली ॥

येथेहि अपकर्षाने सार अलंकार साधला आहे.

## (५३) कारणमाला

गीतेमधील पुढील श्लोक सर्वांच्या परिचयाचे आहेत—

ध्यायतो विषयान् पुंसः संगस्तेषूपजायते ।
संगात् संजायते कामः, कामात् क्रोधोऽभिजायते ॥
क्रोधात् भवति संमोहः, संमोहात् स्मृतिविभ्रमः ।
स्मृतिभ्रंशात् बुद्धिनाशो, बुद्धिनाशात् प्रणश्यति ॥

येथे कारणांची एक साखळी दिली आहे. विषयांची ओढ; त्यापासून संग; संगापासून काम; कामापासून क्रोध; क्रोधापासून मोह; मोहापासून स्मृतिभ्रंश; स्मृतिभ्रंशापासून बुद्धिनाश; आणि अखेर बुद्धिनाशापासून सर्वनाश--अशी ही परंपरा आहे. येथे पूर्वीपूर्वीची गोष्ट पुढील पुढील गोष्टीचें कारण आहे. कारणमालेचें हें सुंदर उदाहरण आहे.

या अलंकाराचें नांव कारणमाला असलें तरी ही खरोखर कारणरशना किंवा कारणशृंखला आहे. मालेप्रमाणे एका सूत्रांत अनेक गोष्टी ओवलेल्या नसून यांत तीच गोष्ट पूर्वीच्या गोष्टीचें कार्य व पुढील गोष्टीचें कारण होते. अशी ही परंपरा असल्याने ही शृंखलेप्रमाणे गोवली आहे.

अगोदर येणारी गोष्ट ही पुढील गोष्टीचें कारण, अशा प्रकारचा यांत सामान्यतः क्रम असला तरी कित्येकदा अगोदरची गोष्ट कार्य व पुढील गोष्ट कारण असाहि क्रम असू शकेल. उदा. "मिळे नरक पापाने, पाप दारिद्र्यसंभव; दारिद्र्य दानाभावाने–" येथे अगोदर कार्य व नंतर कारण आहे. कसेंहि असलें तरी यांत कारणशृंखला कायम आहेच.

**कारणमालेचे विशेष--**

१. कारणमाला ही खरोखर कारणशृंखला आहे.

२. यांत कारण–कार्य; किंवा कार्य–कारणाची साखळी असते.

३. ही साखळी जेवढी मोठी तेवढें वैचित्र्य अधिक.

४. यांतील साखळी एकाच प्रकारची असली पाहिजे; म्हणजे, कारण...कार्य असा क्रम घेतला तर तो तसाच राहिला पाहिजे, मध्येच कार्य...कारण असें नको.

५. शब्द तेच वापरले पाहिजेत.

व्याख्या—**पूर्वीपूर्वीची गोष्ट पुढीलपुढील गोष्टींचें कारण आहे; किंवा पूर्वीपूर्वीची गोष्ट पुढीलपुढील गोष्टींचें कार्य आहे असें जेथे वर्णन असतें तेथे कारणमाला अलंकार होतो.**

उदा.—

(१) खिळा न ठोकल्यामुळे नाल पडली, नाल पडल्यामुळे घोडा घसरला, घोडा घसरल्यामुळे त्यावरील सेनापति पडला, सेनापति पडल्यामुळे सैन्य घाबरलें, सैन्य घाबरल्यामुळे लढाई गमावली, लढाई गमावल्यामुळे राज्य गेलें !

वरील उदाहरणांत कारण–कार्यांची एक लांबलचक साखळी आहे. अगोदर सांगितलेली गोष्ट ही नंतरच्या गोष्टीचें कारण असून हाच क्रम शेवटपर्यंत कायम राहिला आहे. म्हणून येथे 'कारणमाला' अलंकार झाला.

(२) विद्या दे विनयास विनय तो दे पात्रत्व नरासी ।
पात्रत्वें धन धनें धर्म तो पावे मग सुखराशी ॥
—शि. रा. नित्सुरे.

येथेहि अगोदरची गोष्ट ही नंतरच्या गोष्टीचें कारण–असा क्रम असल्यामुळे कारणमाला अलंकार झाला.

(३) जरी हृदयीं विषय स्मरती । तरी निसंगाही आपजे संगती ।
संगें प्रकटे मूर्ति । अभिलाषाची ॥
जेथ कामु उपजला । तेथ क्रोधु आधींचि आला ।
क्रोधीं असें ठेविला । संमोह जाणें ॥
संमोहा जालिया व्यक्ति । तरी नाशु पावे स्मृति ।
चंडवातें ज्योति । आहत जैसी ॥
—ज्ञानेश्वरी अ. २, ओव्या ३२१।३२३

**अर्थ**—मनांत विषयांचें स्मरण केल्याने विरक्तालाहि विषयप्राप्तीसाठी काम उत्पन्न होतो, काम उत्पन्न झाला की तेथे क्रोध आलाच, क्रोधामुळे अविचार हा ठेवलेलाच, ज्याप्रमाणे दीपज्योत प्रचंड वाऱ्याने नष्ट होते त्याप्रमाणे अविचारामुळे स्मृति म्हणजे आत्मज्ञान नाश पावतें.

वरील ओव्यांमध्ये 'कारणमाला' स्पष्टच आहे.

## (५४) एकावलि

एकावलि म्हणजे एक पंक्ति किंवा एक ओळ. कारणमालेंत कारण-कार्यांची शृंखला असते तर एकावलींत विशेष्यविशेषणांची किंवा विशेषण-विशेष्यांची शृंखला असते. अर्थात् विशेषण हा शब्द येथे विशेष सांगणारी गोष्ट अशा व्यापक अर्थानें घ्यावयाचा. " सलिलीं विकसित कमलें; कमलेंहि सुगंधि मधु समृद्ध अशीं। मधु भृंगावलिवेष्टित, भृंगावलि गुंजते स्वरशीं "-- येथे पाण्याचा कमलयोग हा विशेष, कमलांचा मधुयोग, मधाचा भ्रमरयोग, आणि भ्रमरांचा गुंजनयोग असे पाहिल्या पाहिल्या गोष्टीचा पुढील पुढील गोष्टीने विशेष सांगितला आहे.

कित्येकदा हा विशेष निषेधमुखानेंहि सांगतात. जसें — " पुण्यक्षेत्र न सर्वत्र, पुण्यक्षेत्रीं न नास्तिक। नास्तिकांत नसे धर्म न धर्मी दुःख-हेतुता " येथे निषेधमुखाने विशेष सांगितला आहे. अशा प्रकारें एकावलि चार प्रकारें होऊं शकते —

एकावलीचे विशेष असे —

१. एकावलींत विशेष्य-विशेषणें, किंवा विशेषण-विशेष्यें यांची शृंखला असते.
२. विशेषण म्हणजे विशेष अभिधान.
३. हें अभिधान विधिमुखानें किंवा निषेधमुखानेंहि असूं शकतें.
४. कारणमालेप्रमाणेच पंक्तीचा प्रकार व शब्द एकच असले पाहिजेत.
५. अपकर्षावह शृंखला विनोदाला कारण होते.

व्याख्या---**पूर्वी आलेल्या प्रत्येक वस्तूचें नंतर आलेली प्रत्येक वस्तु विशेषण होते, किंवा पूर्वी आलेली प्रत्येक वस्तु, पुढील प्रत्येक वस्तूचें विशेषण होतें आणि हें विशेषाभिधान विधिमुखाने किंवा निषेधमुखाने केलें असतें. अशा प्रकारची विशेषणविशेष्यांची शृंखला जेथे असते तेथे एकावलि अलंकार होतो.**

उदाहरणें—

( १ ) पंडित, जो हित जाणे; हित तें जेथे नसे परापकृति ।
पर ते जे सुजन सदा, सौजन्यच केशवा जिथे वसति ।

" तो पंडित की जो हित जाणतो; तें हित की जेथे परापकार नाही; ते पर की जे सज्जन व तेंच सौजन्य की जेथे विष्णूचा वास असतो." येथे पुढील पुढील वस्तूने मागील वस्तूचा विशेष सांगितला म्हणून एकावलि अलंकार.

( २ ) जीवांचा प्रभव जया कर्मे तें कर्म धर्म बा ! समज ।
तो धर्म जी अहिंसा, हेंचि कळे तत्त्व केशवास मज ॥
—मोरोपंत, कर्णपर्व.

ज्या कर्माने लोकपोषण होतें तेंच कर्म म्हणजे धर्म होय व तोच धर्म की जो अहिंसेंत परिणत होतो. येथेहि मागील वस्तूचा पुढील पुढील वस्तूने विशेष सांगितला म्हणून एकावलि अलंकार.

(३) नव्हे सभा ती नच वृद्ध जींत
न वृद्ध ते धर्म न दावितात ।
न धर्म तो ज्यांत बसे न सत्य
न सत्य तें जें छलना प्रयुक्त ॥
—म. ना. काळे

येथे मागील मागील वस्तूच्या बाबतींत पुढील पुढील विशेष निषेधमुखाने सांगितला आहे म्हणून एकावलि अलंकार झाला.

(४) न वारि तें जें न सरोजयुक्त
न तीं सरोजें न जयांत भृंग ।
न भृंग ते ज्यांस न मंजु गुंज
न गुंज ते जें न हरेंच चित्त ॥

येथेहि पुढील पुढील वस्तु मागील वस्तूंच्या बाबतींत निषेधमुखाने सांगितली आहे म्हणून एकावलि अलंकार झाला.

## (५५) मालादीपक

शृंखलामूल अलंकारांतील मालादीपक हा शेवटला अलंकार होय. हा दीपकाचाच एक प्रकार आहे. दीपकांत अनेक गोष्टींचा एक सामान्य धर्म एकदाच सांगितला असतो. तसाच मालादीपकांतहि सर्वांचा एक सामान्य धर्म एकदाच सांगितलेला असतो. पण यामध्ये पूर्वी पूर्वी येणारी गोष्ट पुढील पुढील गोष्टीचा उत्कर्ष करणारी असते आणि ज्या धर्मांत ती उत्कर्ष दाखविते तो धर्म एकदाच सांगितलेला असतो.

" मदनें हृदयांत तिच्या, हृदयेंहि तुझ्यांत स्थिति असे केली. " हें मालादीपकाचें उदाहरण होय. यांत 'स्थिति केली' हा धर्म दोघांनाहि समान असून तो एकदाच सांगितला आहे. मदनाने तिच्या हृदयांत स्थिति केली; " "तिच्या हृदयाने तुझ्यांत स्थिति केली. " असा एकूण अर्थ आहे. अशा प्रकारें दीपकासारखाच यांतहि सर्वांचा धर्म एकदाच सांगितला आहे आणि मदनयुक्ततेने तिच्या हृदयाचा उत्कर्ष आणि हृदययुक्ततेने नायकाचा उत्कर्ष दाखविला आहे.

पण मालादीपकाचें धर्मदीपकाशी एवढेंच साम्य आहे. दीपकांत एक प्रकृत व इतर अप्रकृत असतात. पण मालादीपकांत दोन्हीहि प्रकृत किंवा अप्रकृत असतात. या दृष्टीने मालादीपकाचें तुल्ययोगितेशी अधिक निकटचें साम्य आहे. तुल्ययोगितेमध्ये दीपकाचा अंतर्भाव जसा होऊं शकतो तसाच मालादीपकाचाहि होऊं शकतो. कारकदीपकाशी मालादीपकाचें मुळीच साम्य नाही.

दुसरी गोष्ट म्हणजे मालादीपकांत खरोखर रशना आहे; माला नाही. कारणमाला जशी कारणरशना आहे, तसेंच मालादीपक हें रशनादीपक होय.

**मालादीपक आणि एकावलि**---या दोन अलंकारांत कांही साम्य व कांही भेद आहे. दोन्हीहि शृंखलामूल आहेत. दोहोंतहि मागील गोष्ट पुढील गोष्टीचा एखादा धर्म सांगते. पण एकावलींतील विशेषण-

विशेष्याची प्रत्येक जोडी स्वतंत्र असते; तर मालादीपकांत सर्वच जोड्या एका धर्माशीं बांधल्या जातात. एकावलींत प्रत्येकीचा धर्म वेगळा असतो. मालादीपकांत तो एकत्र असतो. एकावलींतील वैचित्र्य शृंखलेंत आहे तर मालादीपकाचें शृंखला आणि एकधर्म यांत आहे. एका दृष्टीने मालादीपक हें एकावलि व दीपक यांचा समन्वय आहे.

मालादीपकाचे विशेष असे—

१. मालादीपकांत वेगवेगळया पदार्थांची एक शृंखला असते.
२. पूर्वींचा प्रत्येक पदार्थ पुढल्या प्रत्येक पदार्थाचा धर्म सांगतो.
३. सर्वांचा धर्म एकच असतो व तो एकदाच सांगितलेला असतो.
४. यांत दीपकाप्रमाणे गर्भित औपम्य नसतें.
५. शृंखला व धर्म एकदाच सांगणें या दोहोंत या अलंकाराचें वैचित्र्य आहे.

व्याख्या—**एकाच वाक्यांत जेव्हा पूर्वीची प्रत्येक गोष्ट पुढील प्रत्येक गोष्टीचा एकच धर्म सांगून शोभा वाढविते तेव्हा मालादीपक अलंकार होतो.**

उदा.—

( १ ) संग्रामांगणिं येउनी धनु तुवां घेतां करीं भूपते।
कोणा काय मिळे तयाक्षणेंच बा! शांतांतरें ऐक तें।
कोदंडा शर, शत्रुमस्तक शरा, त्या मस्तकातें मही,
तीतें तूं, तुजलाहि कीर्ति अमला, त्या कीर्तिला विश्वही।

—वि. वा. भिडे, 'अर्थालंकारांचें निरूपण.

एका राजाने रणांत शत्रूचें मस्तक आपल्या बाणांनी उडविलें, त्यामुळे कोणाला काय काय मिळालें हें काव्यमय रीतीने वर वर्णिलें आहे. ' धनुष्यास शर, शरास शिर, शिरास मही ( जमीन ), महीस तूं, तुला कीर्ति' व

कीर्तीस विश्व लाभलें. ' येथे वेगवेगळ्या वस्तूंची एक साखळी बनली आहे. ' मिळणें ' हा क्रियारूप धर्म प्रत्येक ठिकाणीं सारखाच असून तो एकदाच सांगितला आहे म्हणून ' मालादीपक' अलंकार झाला.

( २ ) आस्वादें रस कीं, रसेंच कविता, काव्येंहि वाणी सदा
वाणीनेच परोपकार--रत--धी--वक्ता, तयाने सभा
क्षोणीनाथ, सभेमुळे सतत ही काया त्वदीया पहा
कायेने तव कीर्ति शोभत असे, तीनेच भूलोक हा ॥

—अलंकारचंद्रिका.

येथेहि वेगवेगळ्या गोष्टींची एक साखळी बनली असून त्या सर्वांचा शोभणें हा एकच धर्म आहे म्हणून मालादीपक अलंकार झाला.

## शृंखलामूल अलंकारांचीं अभ्यासार्थ उदाहरणें--

(१) पटुत्व सकलेंद्रियीं, मनुजता, सुवंशीं जनीं,
द्विजत्वहि दिलें भलें, बहु अलभ्य जें कीं जनीं; ।
यशःश्रवणकीर्तनीं रुचि दिली; तरी हा ' वरा '
म्हणे ' अधिक द्याच कीं, ' अखिल याचकीं हावरा ॥

— मोरोपंत, केकावलि.

( २ ) वाहे महीतें स्वशिरीं फणींद्र तो ।
पाठीवरी कूर्म तयासि वाहतो ॥
त्यालाहि घे सागर मांडियेवरी ।
थोराचिये थोरिव जाण यापरि ॥

——वामन

( ३ ) उद्योगाने विद्या लाभते, विद्येमुळे धन मिळतें, धनामुळे मित्र लाभतात, मित्रांमुळे सुख मिळतें.

( ४ ) अंतःपुरें युक्त वरांगनांनी
वरांगना रूपगुणेंच मानी
मानीपणाही सुविलास युक्त
विलास ते की शर काममुक्त

—अलंकारचंद्रिका.

( ५ ) त्या राघवें पुरीला वियोग दिधला, नृपेंहि धरणीला।
ईर्ष्या पुत्रासह ही केली की दाखवून करणीला ॥

—मोरोपंत.

## (५६) स्वभावोक्ति

स्वभावोक्ति हा अत्यंत महत्त्वाचा अलंकार आहे. **स्वभावोक्ति म्हणजे यथातथ्य वर्णन.** इतर सर्व अलंकारांत कवीच्या कल्पनेचा विलास असतो, तर स्वभावोक्तींत त्याचें सूक्ष्म निरीक्षण आणि शब्दचित्र रेखाटण्याची शक्ति दिसून येते. स्वभावोक्ति म्हणजे वस्तूचें नुसतें वर्णन नव्हे. "दीर्घपुच्छ चतुष्पाद ककुद्मान् लंबकंबल। गवापत्य बलीवर्द मुखाने तृण खातसे ॥" येथे स्वभावोक्ति अलंकार नाही. कारण यांत कोणतीच चमत्कृति नाही. बैलाच्या या वर्णनात सर्वांना नेहमी दिसणाऱ्या गोष्टीच सांगितल्या आहेत.

नेहमीच्याच वस्तु पण एखाद्या वेळीं एखाद्या स्वरूपांत आकर्षक दिसतात. लहान मूल हसायला लागले म्हणजे मोहवितें; एखादा घोडा ऐटींत उभा असतो तेव्हा डोळ्यांत भरतो; हरिण पळत असतांना आपलें चित्त वेधतें; तरुणीच्या मनांत एखादी कल्पना येऊन ती आपल्याशीच हंसते त्या वेळीं नेहमीपेक्षा सुंदर दिसते; प्रत्येकच गोष्टींत कित्येक वेळा आकर्षक अशीं रूपें आणि क्रिया दिसून येतात. कविदृष्टीला त्या नेमक्या दिसतात; आणि तो त्या आपल्या लेखणींतून उतरवितो, त्या अशा की आपल्या समोर कवीने पाहिलेलं

चित्रच उभें राहतें. अशा वेळीं स्वभावोक्ति अलंकार होतो. कालिदासानें केलेलें हरिण आणि बालक यांचें वर्णन; भवभूतीनें केलेलें घोड्याचें वर्णन; बाणानें केलेलें शबरकन्येचें वर्णन; वामनानें केलेलें यशोदेचें वर्णन किंवा रघुनाथ-पंडितांनी केलेलें दमयंतीचें हंसामागे धावण्याचें वर्णन, इत्यादि ठिकाणी बहारदार स्वभावोक्ति आली आहे.

कवीच्या सूक्ष्म दृष्टीला दिसून येणारी एखाद्या वस्तूची क्रिया किंवा रूप हा स्वभावोक्तीचा विषय होय. हे रूप किंवा ही क्रिया एक क्षणभरच दिसून येते पण त्या क्षणात कवि त्याचें निरीक्षण करून घेतो. कवीची वृत्ति अशा वेळीं Snap घेणाऱ्यासारखी असते. नंतर तो त्याचें शब्दचित्र काढतो. व्यक्तिविवेककार महिमभट्टानें स्वभावोक्तीची कल्पना अशी दिली आहे—
**" वस्तुस्वभावाची उक्ति हा अलंकार आहे; कारण तींत प्रतिभेंतून उजळून निघालेले पदार्थ साक्षात् दिसू लागतात."**

स्वभावोक्तीमध्ये कल्पनावैचित्र्य नसलें तरी आकर्षकता किंवा चमत्कृति असते. ही चमत्कृति दोन कारणामुळे येते. (१) त्यात वर्णिलेली अवस्था किंवा क्रिया यांत वस्तूचें वैशिष्ट्य दिसून येतें आणि (२) ती इतकी सूक्ष्म असते की फक्त कविप्रतिभेलाच दिसू शकते.

स्वभावोक्तींत वस्तूच्या एखाद्या क्रियेचें वर्णन असतें, किंवा रूपाचें वर्णन असतें किंवा दोघांचेंहि वर्णन असतें. येथे रूप म्हणजे अवस्था होय. यांत रूप आणि संस्थान ( Posture ) याचा समावेश होतो.

स्वभावोक्तीचे विशेष —

१. स्वभाव म्हणजे वस्तूची विशिष्ट अवस्था, तिचें वर्णन ती स्वभावोक्ति.
२. वस्तूचें हें हुबेहूब वर्णन असतें.
३. वस्तूचा विशिष्ट वर्ण, संस्थान किंवा क्रिया यांचें तें वर्णन असतें.
४. त्यांत चमत्कारिता असते.

५. वर्णनांतून शब्दचित्र निघालें पाहिजे.

६. स्वभावोक्ति म्हणजे प्रतिभेने उजळलेल्या वस्तूचें यथार्थ दर्शन.

व्याख्या –

**जेथे बाल, स्त्री, मुग्ध, कातर, भ्रांत इत्यादिकांच्या विशिष्ट क्रियेचें किंवा रूपाचें जसेंच्या तसें चित्र उभें करील असें वर्णन असतें तेथे स्वभावोक्ति अलंकार होतो--**

उदाहरणें –

(१) तेथील एक कलहंस तटीं निजला ।
जो भागला जलविहार विशेष केला ।
पोटींच एक पद, लांबविला दुजा तो ।
पक्षीं तनू लपवि; भूप तया पहातो ॥
टाकी उपानह, पदें अतिमंद ठेवी ।
केली विजार वरि डौरहि मौन सेवी ॥
हस्तीं करी वलय उंच अशा उपायीं ।
भूपें हळूच धरिला कलहंस पायीं ॥

—रघुनाथपंडित, दमयंतीस्वयंवर

वरील दोन श्लोकांपैकी पहिल्या श्लोकांत निद्रिस्त हंसाच्या शरीरावस्थेचें हुबेहूब वर्णन आहे. उपानह ( जोडा ) काढून ठेवून, विजार व डौर ( अगरख्याचा घोळ ) वर उचलून धरून, तसेंच हातांतील कंकण वर सरकवून, हलक्या पावलांनी चुपचाप जाऊन नळराजाने हंसास कसें पकडलें हें दुसऱ्या श्लोकांत यथातथ्य रीतीने वर्णिलें आहे, तेथे क्रियेचें हुबेहूब वर्णन असल्यामुळे येथेहि सुंदर स्वभावोक्ति साधली आहे.

( २ ) मातींत ते पसरले अति रम्य पंख
केलें वरी उदर पांडुर निष्कलंक
चंचू तशीच उघडी, पद लांबवीले
निष्प्राण देह पडला, श्रमही निमाले ॥

— रे. टिळक, 'केवढें हें क्रौर्य.'

या श्लोकांत मृत पक्षिणीच्या शरिराचें हुबेहूब वर्णन केलें आहे. पक्षिणीचा वर्ण व शरीरस्थिति यांचें अगदी यथातथ्य वर्णन इतक्या सुबोध व थोड्या शब्दांत केलेलें इतरत्र आढळायचें नाही !

(३) निळी बुरख्याची डोईवरुनी घेऊनिया ओढणी
कुठे चालली मंदगामिनी अवगुंठित चांदणी
दो बोटांनी डोळयांपुढला पदर जरा सारुनी
फिरुन् फिरुन् का चोरुन बघशी बाई, बुरख्यांतुनी
नवनित-कोमल कांचन-काया वस्त्रांतरि दडवुनी
अमोल रत्नें विभूषणांनी देह तसा मढवुनी
पायीं पैंजण, बिंदि, बिजवरा, नथ नाकीं नव तिला
अंगिं कंचुकी, भव्य लहेंगा कटिवर गुंडाळला
बेहद्द वाढलें उदर पदर ना वरी
शृंखला रुपेरी लोळतसे त्यावरी
ती विशाल नाभी वैभव-शोभा खरी
शोधायातें रसिक नजर जव अचुक वळे कोम ।
फसवायातें भवरा जणुं तो यौवन गंगेंतला ।

राजा बढे, 'मारवाडवासिनी'

विनोदनिर्मितीसाठी लिहिलेल्या 'मारवाडवासिनी' या कवितेंत कवीने वरील शब्दांत मारवाडणीचें जें शब्दचित्र रेखाटलें आहे तें यथातथ्य व बहारदार नाही असें कोण म्हणेल ? येथेहि स्वभावोक्ति अलंकार आहे.

## (५७) भाविक

कवीला दिसलेल्या एखाद्या वस्तुस्वरूपाचें वर्णन स्वभावोक्तींत असतें; तर भाविकांत कवि वस्तूचें पूर्वी अनुभवलेलें, किंवा त्याच्या दृष्टीला दिसणारें त्या वस्तूचें भविष्यकालीन चित्र तो आज आपल्यापुढे ठेवतो. वर्णनीय वस्तूची पूर्वीची पाहिलेली स्थिति किंवा तिचें भविष्यकालीन चित्र कवि आजच आपल्या मनश्चक्षूंसमोर आणतो आणि तें यथातथ्यपणें आपल्यापुढे ठेवतो. **भूतकालीन किंवा भविष्यकालीन अवस्थेचें वर्तमानकालीन चित्र म्हणजे भाविक होय.** भाविक आणि स्वभावोक्ति यांचें इतकें जवळचें नातें आहे.

भाविक, उत्प्रेक्षा आणि अतिशयोक्ति यांत गल्लत करूं नये. उत्प्रेक्षा आणि अतिशयोक्ति यांच्यांत अध्यवसाय असतो. तो भाविकांत नसतो. भाविकांत अप्रत्यक्षाचें प्रत्यक्षाप्रमाणे वर्णन असतें; पण या प्रत्यक्षांत अध्यवसाय नसतो. कारण त्यांत आहार्यता नसते. योग्याला ज्याप्रमाणे भविष्य प्रत्यक्ष दिसतें तसें कवीला भाविकांत दिसत असतें. भाविक म्हणजे भ्रांतिमान्‌हि नव्हे. भ्रांतींतील दर्शन खोटें असतें. भाविकांतील दर्शन यथार्थ असतें, भ्रांतिमानांतील हेतु सादृश्यप्रतीति हा असतो. भाविकांत भावनाप्रकर्ष हा हेतु असतो.

भाविकाचे विशेष असे—

१. भाव म्हणजे कवीचा अभिप्राय. तो भाविकांत दिसून येतो.
२. यात कवि मागील अनुभव किंवा भविष्यकालीन चित्र आज नजरेसमोर आणतो. वर्तमानकालीन अनुभव म्हणजे भाविक नव्हे.
३. भाविकांत प्रसादगुण अवश्य आहे.
४. तें वाचतांना कवि व रसिक यांना त्या वस्तूचें प्रत्यक्ष चित्र दिसतें.
५. भाविकांत आहार्य ज्ञान किंवा भ्रांति नसते.

व्याख्या—**भूतकालीं होऊन गेलेल्या किंवा भविष्यकालीं घडणाऱ्या गोष्टी आजच घडत आहेत असें जेथे रमणीय वर्णन असतें तेथे भाविक अलंकार होतो.**

उदाहरणें:—

(१) गोष्टी घराकडिल मी वदतां गड्या रे
झालें पहा कितिक हें विपरीत सारें!—
आहे घरासचि असें गमतें मनास,
ह्या येथल्या सकळ वस्तु उगीच भास! ॥
ही देख म्हैस पडवीमधि बांधलेली
रोमंथभाग हळु चावित बैसलेली
मित्रा! गजामधुनिया पडवीचिया रे
मौजा पहा क्षणभरी रजनीचिया रे! ॥
हीं चारपांच चढुनी हळु पायडाणें
या ओसरीवर अतां जपुनीच येणें!
डावीस हा बघ निरेखुनि एक माचा
निद्रिस्त त्यावरि पिता अति पूज्य माझा ॥

—केशवसुत, 'गोष्टी घराकडिल मी वदतां गड्या रे'

कवि पुण्यास राहत असतांना त्याला कोंकणांतील आपल्या घराची आठवण झाली. त्या वेळीं कवि सभोवतालची परिस्थिति विसरला. कवीच्या मनश्चक्षूंसमोर कोंकणांतील आपल्या घराचें चित्र उभें राहिलें. त्याचें हुबेहूब वर्णन कवीने येथे केलें आहे. म्हणून येथे 'भाविक' अलंकार झाला.

वरील उदाहरणांत पूर्वी पाहिलेल्या गोष्टी कवीने प्रत्यक्ष उभ्या केल्या आहेत, तर पुढील उदाहरणांत भविष्यकालीन गोष्टींचें चित्र कवि आपल्या डोळ्यांसमोर उभें करतो.

(२) निवासस्थानाची स्मृति सलिल आणील नयनीं।
स्मराच्या संतापें पहुडशिल तूं त्रस्त शयनीं॥
बहूष्ण श्वासाहीं सुकतिल तुझे ओष्ठ सरसे!।
दिसे तूझें म्लान, प्रमुदित मुख क्षीण विधुसें॥
—गं. गो. दामले

आपल्या पश्चात् आपल्या प्रियेची कशी शोचनीय स्थिति होईल याचें कल्पना-निर्मित चित्र नायकानें आपल्या डोळयांसमोर रेखाटलें आहे.

म्हणून येथेंहि 'भाविक' अलंकार झाला.

( ३ ) गहिंवरली नंदस्त्री घटकेंत पुसोनि नंदना शतदा;
तैसेंचि मनीं मानि निजसदनाचाहि नंद नाश तदा॥
—मोरोपंत, मंत्रभागवत.

पुढें होणारा विनाश नंद व नंदस्त्री याना अगोदरच डोळयांसमोर दिसत आहे असें येथें वर्णन आहे.

( ४ ) कुटिल रुळतिल ते केश मुखसरोजीं
हार थई थई नाचेल तो उरोजीं।
कृष्णवसनाचा पदर मुखिं धरोनी
मोहविशिल सखे! मजसि कटाक्षांनीं॥
—गं. गो. दामले.

या पद्यांत भविष्यकाळीं दिसणाऱ्या सुखद अवस्थेचें वर्णन आहे.

## (५८) उदात्त

उदात्त म्हणजे समृद्धिवर्णन. स्वभावोक्ति आणि भाविकांत वस्तूंचें यथावत् वर्णन असतें; तर उदात्तांत तेंच असंभाव्य वस्तूंचें वर्णन असतें. यक्षाचें अलकेमधील घर, त्याच्या भोंवतालचा बगीचा, त्यांतील विहीर, क्रीडाशैल, सारिका, मोर वगैरे वस्तु आपल्या सारख्याच आहेत. फरक इतकाच

की, त्याच्या घराची फरशी रत्नाची आहे; विहिरीच्या पायऱ्या पाचूच्या आहेत; आणि पिंजरा सोन्याचा आहे. असंभाव्य ऐश्वर्याने युक्त असलेल्या वस्तूंचें कविप्रतिभेने केलेल्या वर्णनांतून 'उदात्त' निर्माण होतों. स्वभावोक्तींत आता पाहिलेल्या वस्तूंचें यथार्थ वर्णन असतें; भाविकांत पूर्वीच्या किंवा पुढच्या वस्तूंचें आजच्याप्रमाणे वर्णन असतें; तर उदात्तांत असंभाव्य ऐश्वर्याचें यथार्थाप्रमाणे भासमान होणारें वर्णन असतें.

उदात्तामधील या वर्णनाचा हेतु केवळ वस्तुवर्णनापुरता नसून त्या वस्तु ज्याच्याजवळ आहेत त्याचा उत्कर्ष दाखविण्याचा असतो. मारुति जेव्हा रावणाच्या सभेत शिरला तेव्हा त्या सभेतील रत्नाच्या भिंतींत पडलेलीं रावणाचीं प्रतिबिंबें त्याला दिसलीं व खरा रावण कोणता हें क्षणभर त्याला कळेना! येथे रावणाची समृद्धि आपल्या समोर कवीला ठेवावयाची आहे.

उदात्ताचा दुसराहि एक प्रकार आहे. "हेंच तें घर, जेथे लोकमान्य राहत असत." "हीच ती जागा जेथे तानाजी लढतांना पडला." यांत आपण स्थानमाहात्म्य वर्णन करतों. हें स्थानमाहात्म्य उदात्ताचाच प्रकार आहे. यांत लोकमान्य किंवा तानाजी यांच्याबद्दल आपणास कांहीं सांगावयाचें नसतें त्यांचा निर्देश केवळ अंगत्वाने त्या स्थानाचें महत्त्व पटविण्याकरिता केलेला असतो.

उदात्ताच्या विशेष गोष्टी अशा—

१. उदात्त म्हणजे समृद्धिपूर्ण.

२. उदात्ताच्या पहिल्या प्रकारांत ऐश्वर्याचें वर्णन असतें.

३. ऐश्वर्यांतील गोष्टी असंभाव्य किंवा अतिशयोक्तिपूर्ण असतात.

४. उदात्तांत नेहमी चांगल्याच गोष्टींचें वर्णन असतें. घोर अरण्याचें किंवा गलिच्छ गोष्टींचें वर्णन उदात्तांत येणार नाही.

५. उदात्ताच्या दुसऱ्या प्रकारात सामान्य गोष्टींचें उदात्तीकरण केलेलें असतें.

६. त्याकरिता सामान्य गोष्टीचा संबंध मोठ्या व्यक्तीशी आणलेला असतो.

७. मोठ्या व्यक्तीचा निर्देश त्यांत केवळ अंगत्वाने आलेला असतो.

व्याख्या—

**एखाद्या वस्तूच्या समृद्धीच्या वर्णनाने प्रकृत वस्तूच्या समृद्धीचा अतिशय जेथे दाखविला असतो; किंवा वर्णनीय वस्तूचा उत्कर्ष दाखविण्याकरिता जेथे एखाद्या महान् व्यक्तीचें अंगत्वाने वर्णन केलेलें असतें तेथे उदात्त अलंकार होतो.**

उदाहरणें—

( १ ) भूमि त्या नगरिं रत्नमणींची ।
कोंदणें जडित इंद्रमणींची ॥
वाटते गजरथाश्वनृपाची ।
हेम दिव्य परि सुंदर पाची ॥
हेमरत्नरचिता पडशाळा ।
सत्सभा बहु तशाचि विशाळा ॥
पंक्ति रत्नमय हाट-वट्यांची ।
दीप्ति रातिस दिसे दिवट्यांची ॥

—वामन.

वरील श्लोकांतून केलेल्या वर्णनावरून द्वारकानगरीच्या लोकांचें वैभव व माहात्म्य लक्षांत येतें.

( २ ) झाले धनी पुढिल याचक या नळाचे
येतां असंख्य समुदाय पथीं तयांचे
मागावयास जन मागिल देखियेले ।
त्याहींच ते सततपूरित काम केले ॥

नलराजाकडून ज्यांना दान मिळालें तेच याचक आता पुढील याच-कांचे दाते झाले. त्यांना नळाकडून मिळालेल्या द्रव्यांतूनच त्यांनी इतर याचकांना संतुष्ट केलें, असे येथे सांगितलें आहे. नलराजाची समृद्धि केवढी होती हें यावरून दिसतें म्हणून येथे उदात्त अलंकार.

( ३ ) हें पाहा जांब गांव, याच गांवांत समर्थ रामदास जन्मले व बालपणीं नांदले.

या उदाहरणांत जांब गांवाचें वर्णन प्रस्तुत आहे, परंतु त्याचें वर्णन करतांना त्या गांवाशी संबंध आलेल्या श्रीसमर्थांचा उल्लेख केलेला आहे. या उल्लेखामुळे जांब गांवाचें माहात्म्य वाढल्याचें सूचित केलें आहे.

( ४ ) श्रीकाशि ! तुझें दर्शन सर्व सुखाधिक म्हणे सदाशिव तो ।
स्वशिरोमणि किरणांहीं सुरगण ज्याच्या पदा सदा शिवतो ॥
—मोरोपंत, काशीस्तुति.

येथे काशी क्षेत्राचें वर्णन प्रस्तुत आहे. ज्याच्या चरणावर देव आपलीं मस्तकें ठेवतात त्या सदाशिवास काशीचें दर्शन सर्वांत अधिक सुखदायी वाटतें असें वर्णन करून काशीचें माहात्म्य निदर्शनास आणून दिलें आहे. येथेंहि ‘ उदात्त ’ अलंकाराचा दुसरा प्रकार झाला.

## (५९) व्याजोक्ति

(१) उदयन उद्यानांत बसला असतां त्याला वासवदत्तेची आठवण होऊन त्याच्या डोळ्यांत पाणी आलें. इतक्यांत त्याची नवविवाहित पत्नी पद्मावती आली. तो तिला सांगतो “ काशपुष्पाचें कुसळ डोळ्यांत गेल्याने हें पाणी आलें आहे. ” (२) विवाहप्रसंगीं शंकराने पार्वतीचा हात आपल्या हातांत घेतल्याबरोबर त्याच्या अंगावर रोमांच आले. त्या वेळीं शंकर म्हणतो “ अहो ! काय ही हिमालयावरील थंडी ! ”

या दोन्हीहि उदाहरणांत बोलणाऱ्याची कोणती तरी गोष्ट ( प्रेम ) प्रकट होऊं पाहत आहे. आणि ती लपवण्याकरिता बोलणारा तिचा संबंध

दुसरीकडे लावीत आहे. ही व्याजोक्ति होय. व्याज म्हणजे कपट किंवा मिष. **एखादी गोष्ट उघड होत असतां कोणत्या तरी मिषानें ती लपवणें ही व्याजोक्ति होय.**

**व्याजोक्ति आणि अपन्हुति**—यांच्यांतील फरक ओळखला पाहिजे. या दोन्हींहि अलंकारांत एक वस्तु हेतुपूर्वक लपवलेली असते, आणि त्याकरिता जी गोष्ट पुढे करण्यांत येते त्या गोष्टींत व मूळ गोष्टींत सादृश्य असतें. पण अपन्हुतींत प्रकृत गोष्टीचा निषेध केलेला असतो तसा व्याजोक्तींत नसतो. शिवाय त्यांच्या हेतूंत भेद आहे. व्याजोक्तींत ऐकणाऱ्यापासून मूळ गोष्ट लपविणें हा हेतु असतो; तर अपन्हुतींत सादृश्यप्रतीति हा हेतु असतो. व्याजोक्ति आणि छेकापन्हुति यांच्यांतहि भेद आहे. दोहोंमध्येहि एक गोष्ट लपविण्याकरिता दुसरी गोष्ट पुढे करणें हा हेतु आहे. पण छेकापन्हुतींत श्लेषाच्या साह्यानें निर्माण केलेली द्व्यर्थता ही प्रमुख असते; ती व्याजोक्तींत नसते.

व्याजोक्तीचे विशेष——

१. व्याजोक्तींतील विधान हें कवीचें नसून कविनिर्मित पात्राचें असतें.

२. एखाद्या उघड होऊं पाहणाऱ्या गोष्टीशीं त्या विधानाचा संबंध असतो.

३. जी गोष्ट दिसूं लागते ती गोष्ट एका कारणामुळे निर्माण झाली असते पण बोलणारा तिचा संबंध दुसऱ्याच गोष्टीशी लावतो.

४. असें करण्यांत त्याचा हेतु खरी गोष्ट लपवणें हा असतो.

व्याख्या——

**जी गोष्ट आपणास गुप्त ठेवावयाची आहे ती गोष्ट कोणत्याना कोणत्या तरी प्रकारें उघडकीस येत असतां, दुसऱ्या कोणत्या तरी मिषानें झाकण्याचा प्रयत्न जेथे वर्णिलेला असतो तेथे व्याजोक्ति अलंकार होतो.**

उदाहरणें—

( १ ) एक तरुणी आपल्या मैत्रिणीबरोबर रस्त्याने चालली होती. वाटेंत प्रियकर दिसल्यामुळे ती त्याच्याकडे वळून वळून पाहू लागली. ' मागे काय पाहतेस ?' असें मैत्रिणीनें विचारतां ती उत्तरली, ' माझा रुमाल कोठेंतरी पडला आहे ! '

प्रियकराकडे आपण पाहत होतों ही गोष्ट मैत्रिणीच्या लक्षांत येऊं नये या हेतूने ' रुमाल हरवला ' हें कल्पित कारण निर्माण करून त्याच्याशी तिने मागे वळून पाहण्याचा संबंध जोडला व प्रकट होऊं पाहणारी परिस्थिति लपविली, म्हणून येथे ' व्याजोक्ति ' अलंकार झाला.

(२) येता क्षण वियोगाचा पाणी डोळयास ये तिच्या ।
' गेले डोळयांत कांही अन् ' म्हणोनी लागली पुसूं ॥

—काव्यविभ्रमावरून

येथे वियोगदुःखाची भावना अश्रुपाताने उघड होऊं लागली ती लपविण्यास ' डोळयांत कांही गेलें ' हें निमित्त सांगितलें म्हणून 'व्याजोक्ति'.

(३) शंकरपार्वतीचा पुढील संवाद पाहा—

पार्वती—' तनू कां तुझी व्यापिली जीवनाने '
शंकर—' पथीं चालतां घाम आला उन्हाने '
पार्वती—' वधूचे रदाचा दिसे दंश ओष्ठीं '
शंकर—' रुते शंख ओठीं नसे मिथ्य गोष्टी '
पार्वती—' नखाचीं क्षतें दीसती ठाइं ठाइं '
शंकर—( म्हणे ) " खेळलों फार भूतांशि पाही "
पार्वती—" बहू येतसे वास तुझे शरीरीं "
शंकर—'पुजा—भक्ति केली सुगंधोपचारीं'

——सदाशिव कवि

शंकराने गंगेशी विलास केला असावा अशीं चिन्हें पार्वतीला दिसलीं पण शंकर दुसरें निमित्त सांगून मूळ गोष्ट लपवितो. म्हणून व्याजोक्ति अलंकार.

## (६०) सूक्ष्म

सूक्ष्म या शब्दाचा " सूक्ष्म प्रकाशन " असा येथे अर्थ आहे. अर्थात् येथील हें प्रकाशन शब्दांनी केलेलें नसून खुणांनी केलेलें असतें. आपण रस्त्याने चाललों असतां आपला मित्र आपल्याला भेटतो. आपण हातानेच ( न बोलतां ) त्याला विचारतों " कसें काय ? " तोहि न बोलतांच हातानेच सांगतो " ठीक आहे. " सूक्ष्म अलंकारांत शब्दांची भाषा नसते; खुणांची भाषा असते.

पण सूक्ष्म अलंकाराचें वरून दिसणारें हें कवच झालें. याला अलंकारत्व येण्याकरिता आंतील अभिप्रायहि मनोरम पाहिजे. एखाद्या व्यंक्तीकडे पाहतांच त्याच्या चेहऱ्यावरून म्हणा किंवा हावभावावरून म्हणा त्याने काय केलें असावें किंवा त्याच्या मनांत काय असावें हें आपल्याला कळतें. आणि मग आपणहि हंसून त्याला खूण करतों आणि " ओळखलं बरं का ? " असें त्याला कळवितों व मग दोघेंहि हंसतों. येथे सूक्ष्म अलंकार आहे. एका अत्यंत सनातनी घरांतील नवविवाहित तरुण ऐन आषाढी एकादशीला हॉटेलांतून कांद्याचीं भजीं खाऊन आला. घरांत येतो तोंच त्याची पत्नी समोर होती. तिने हंसून लागलीच वेलदोड्याची वाटी समोर केली. येथे सूक्ष्म अलकार आहे.

सूक्ष्म अलकारांतील विशेष—

१. सूक्ष्म अलकारांत सूक्ष्म प्रकाशन असतें.
२. एखाद्या व्यक्तीच्या आकारावरून किंवा इंगिता (हावभावा) वरून एखादी गोष्ट दुसऱ्या व्यक्तीच्या लक्षांत येते.
३. ती गोष्ट आपल्याला कळली असें ती दुसरी व्यक्ति पहिल्या व्यक्तीला कळविते.
४. मात्र तें कळवितांना शब्द न वापरतां खुणेनेच कळविते.
५. या अलंकारांतील स्वारस्य दोन गोष्टींवर असतें.—(१) खुणेवरून ओळखणें; (२) खुणेनेच कळविणें.

व्याख्या—

**कोणाची तरी एखादी गोष्ट कोणत्या तरी खुणेवरून किंवा आकारावरून चतुर माणसाच्या लक्षांत येते; आणि ती तशी आपल्याला कळली असें तो त्या दुसऱ्या व्यक्तीला खुणेनेच कळवितो असें वर्णन जेथे असतें तेथे सूक्ष्म अलंकार होतो.**

उदाहरणें—

(१) हेम--जंबीर पैं कान्त हातीं धरी।
खेळवी त्यास देखोनिया सुंदरी ॥
सूर्य रेखाटला चित्रभित्तीवरी।
चंद्र-- बिंबानना बिंदु दे त्यावरी ॥

—विठ्ठल कवि.

हेम--जंबीर हातीं धरून नायक--नायिकांनी क्रीडेची उत्सुकता दर्शविली. सूर्याचें चित्र काढून क्रीडेसाठी 'सायंकाळचा समय' नायकाने सुचविला, तेव्हा नायिकेने त्यावर बिंदु देऊन चंद्रोदयाचा काळ दर्शविला. येथे नायक व नायिका यांनी आपलें मनोगत शब्दांनी व्यक्त न करतां तें चित्रादि साधनांनी व्यक्त केलें, म्हणून 'सूक्ष्म' अलंकाराचें हें उदाहरण होय.

(२) प्रियदृष्टिकडे पाही, जाणे संकेतकाल पुसियेला।
आणि करीच्या कमला मिटवीते मंद हासुनी बाला ॥

—भाषांतर

'केव्हा भेटायचें' असें प्रियकर विचारतो असें त्याच्या डोळ्याकडे पाहतांच तिने ओळखलें. आणि आपल्या हातांतील कमल मिटवून 'संध्याकाळीं भेटूं' (कारण कमल संध्याकाळीं मिटतें) असें तिने सुचविलें. येथे सूक्ष्म अलंकार आहे.

## गुढार्थमूल अलंकारांचीं अभ्यासार्थ उदाहरणें--

(१) पृथु नितंब नितंबिनिचा वरी
कटितटीं कटिसूत्रचि सांवरी
कनककंकण— वृंदहि वाजती
मुखिं सुखश्रमबिंदु विराजती ॥

—वामन

(२) चिमकुली पगडी झळके शिरीं। चिमकुली तरवार करीं धरी।
चिमकुला बहु शोभत चोळणा। चिमकुला सरदार निघे रणा ॥

—कुंटे, राजा शिवाजी.

(३) जगद्गुरुमहेश्वरप्रभुशिरीं जिचें नांदणें,
तिच्या जळमळें तुळे न शरदिंदुचें चांदणें, ।
प्रजा हरिहरा अशा यदुदरीं अनेका; कवी
भिऊनि म्हणतील कां ' जशि सुधा तशी काकवी ! ' ॥

—मोरोपंत, केकावलि.

(४) जळ घाली रुक्मिणी पदावरि मणिकनकाच्या पात्रें
प्रक्षालन केलें श्रीनाथें सुखरोमांचितगात्रें ॥
शंभुशिरीं ज्याचें चरणोदक, वेद जयाचे बंदी
तो तीर्थरूप तीर्थांचाही मुनिपादोदक वंदी

—सुदामचरित्र

(५) अद्यापि ती श्रुतिमनोहर मंजुवाणी
जी वर्णिली कुशल किन्नरगायकांनी ।
जीच्यापुढे परुष ते रववल्लरीचे
मातें स्मरे अखिल तें स्थल रंजनाचें ॥

--वि. म. लेंभे.

(६) येथे वास बरा न कृष्ण भुजग स्थानीं निशी या फिरे
नंदाचें घर नाति दूर, पथिका आनंदवी आदरें ॥
नंदा पांथ कथी वचासि, हरि तैं संकेत झांकावया
बोले 'या घर आपुलें, बहु बरें आलात राहावया' ॥

—अलंकारचंद्रिका

(७) दारावरुनी प्रियकर जातां दिसली त्याच्या हातीं ॥
नववंजुलमंजरी, आणि ती खिन्न जाहली चित्तीं ॥

—भाषांतर.

(८) अर्पिला तुहिनाद्रिने गिरिशासुताकर जेधवा
पावला पुलक प्रकंप तदीय विग्रह तेधवा ।
स्त्रीजनीं परिहास होइल या भयें वदला शिव
'काय शीत हिमाद्रिचा कर' तो करो तुमचें शिव ॥

—वि. वा. भिडे.

## अलंकारसंसृष्टि आणि अलंकारसंकर—

आतापर्यंत एका एका अलंकाराचें स्वरूप स्पष्ट करून सांगितलें. पण काव्य वाचत असतांना एका पद्यांत एकच अलंकार आढळेल असें नाही. कित्येकदा एकाच पद्यांत एकाहून अधिक अलंकार आढळतात. ते परस्परा-पासून निरपेक्षहि असतात किंवा एकमेकांत मिसळलेलेहि असतात. त्यामुळेहि कित्येकदा अधिक शोभा येते. अलंकारांच्या मिश्रणाचे दोन प्रकार आहेत—(१) संसृष्टि, आणि (२) संकर.

### संसृष्टि

**जेव्हा एकाच पद्यांत एकाहून अधिक अलंकार आढळून येतात, मात्र ते परस्परावर अवलंबून न राहतां स्वतंत्रपणें अस-तात तेव्हा तेथे अलंकारांची संसृष्टि असते.** संसृष्टीमधील अलंकार

एकमेकांपासून अगदी स्वतंत्र असतात व ते वेगवेगळे काढून दाखविले जाऊं शकतात. तीळ आणि तांदुळ एकत्र मिसळले असतां जसे ते वेगळे करतां येतात तसे हेहि वेगळे होऊं शकतात म्हणून " **तिलतंडुलवत् संसृष्टिः** " असें म्हणण्यांत येतें.

संसृष्टि तीन प्रकारें होऊं शकते--(१) शब्दालंकारांची; (२) अर्थालंकारांची; किंवा (३) शब्दार्थालंकारांची.

**शब्दालंकारांची संसृष्टिः--**

उदाहरणें—

(१) जगज्जीवन श्री--हरी आणि काळा ।
करी तो जगीं जीवनाच्या सुकाळा ॥
असा मेघही या निमित्तें सखा हो ।
सुहृद्भाव ऐसा नसे आणिकां हो ॥

--वामनपंडित, वेणुसुधा.

वरील श्लोकाच्या पहिल्या दोन चरणांत यमक आहे, ' ज ' हें अक्षर अनेकवार आल्यामुळे अनुप्रास आहे, आणि ' जीवन ' शब्दाचे (१) पाणी (२) जीवित—असे दोन अर्थ ( एक मेघाला उद्देशून व दुसरा श्रीहरीला उद्देशून ) होत असल्यामुळे श्लेष साधला आहे. अशा प्रकारें येथे तीन शब्दालंकारांची संसृष्टि झाली.

(२) श्रीवर–कृपा जयावर श्रीवर ज्याचें न चित्त किमपीही ।
श्रीवरद–साधुवर्णा श्रीवरदा प्रणति एकनाथा ही ॥

—गोविंदाग्रज, सत्सुम--दाम.

येथे ' वर ' हीं अक्षरें अनेकवार आवृत्त झाल्यामुळे वृत्त्यनुप्रास, ' श्रीवर ' अक्षरांनी आदियमक, व एकाक्षरी अन्त्ययमक साधल्यामुळे शब्दालंकारांची संसृष्टि झाली. आदियमकांतील अक्षरें बदलून तें यमक नष्ट केलें तरीहि वृत्त्यनुप्रास कायम राहतोच. म्हणून हे शब्दालंकार स्वतंत्र आहेत.

(३) न रंजे कारंजें निरखुनि, फणीने फणफणी ।
मुदेंने मोदेना नळगुणगणीं जे गुणगुणी ॥
न बैसे जे सेजेवरि न पगिसे जे शुकगिरा ।
न नाहि, माना हे न धरि ललना हेतु दुसरा ॥

—रघुनाथ पंडित, दमयंतीस्वयंवर.

वरील श्लोकांत अन्त्ययमक, छेकानुप्रास व चरणमध्ययमक या शब्दालंकारांची संसृष्टि आहे.

**अर्थालंकारांची संसृष्टि--**

(१) पाठीवरी रुळति धूसर मुक्त बाल,
जैसे गुलाब फुलले दिसतात गाल;
विस्तीर्ण हे निढळ पानच केवड्याचें;
जेथे सुभाग्य, मतिमन्त गुढा ऽ नाचे !

—रे. टिळक

या पद्यांतील दुसऱ्या ओळींत उपमा अलंकार असून तिसऱ्या ओळींत रूपक आहे. हे दोन्हीं अलंकार स्वतंत्रपणें आले असल्यामुळे येथे अर्थालंकारांची संसृष्टि झाली.

(२) सरसिज खुलतें तें शैवलेंही नितांत
शशधर मलिनेंही लांच्छनें होइ कांत ।
रुचिर दिसतसे ही वल्कलानें कुमारी
द्युति मधुर पदार्थां काय देई न भारी ॥

—शाकुंतल ( भाषांतर—वि. वा. भिडे )

येथे पहिल्या तीन ओळींत प्रतिवस्तूपमा असून संपूर्ण पद्यांत अर्थांतरन्यास आहे. हे दोन्हीहि अलंकार निरपेक्ष आहेत म्हणून प्रतिवस्तूपमा व अर्थांतरन्यास यांची संसृष्टि झाली.

( ३ ) तम लिंपी जणूं अंगा, वर्षे वा नभ काजळी ।
दुष्ट सेवेपरी दृष्टी अधे निष्फळ जाहली ॥
—भाषांतर.

येथे पूर्वार्धात दोन उत्प्रेक्षा व उत्तरार्धात उपमा असून त्याची संसृष्टि झाली आहे.

**शब्दार्थालंकारांची संसृष्टि—**

( १ ) हेलावे कचश्रीच्नि फूग धरुनी मेनात पाळी बुडी,
त्यापि गौर, तयास गौरबुनिया ही माणकांची कुडी
ओठाशी करितात राहुन दुरी स्पर्धा—परी ना टिके—
ही ओठापरि लाल केवळ, न हीं जाल्या मृदू माणिकें.
—माधव ज्यूलियन, विरहतरंग.

वरील श्लोकांत ' गौर ' या अक्षरांची एकवार आवृत्ति झाल्यामुळे छेकानुप्रास, चरणांच्या शेवटी एकाक्षरी यमक, असे दोन शब्दालंकार आहेत. शिवाय ओठांशी माणिकांची स्पर्धा दर्शवून व माणिकांपेक्षा ओठ तुलनेंत श्रेष्ठ दाखवून ' व्यतिरेक ' आहे. एकमेकांवर अवलंबून नसणारे दोन शब्दालंकार व दोन अर्थालंकार एकाच श्लोकांत आल्यामुळे येथे शब्दार्थालंकार संसृष्टि झाली.

(२) तो शर गरधरवरसा पविसा रविसा स्मरारिसायकसा ।
पार्थभुजांतरिं शिरला वल्मीकामाजि नागनायकसा ॥
—मोरोपंत, कर्णपर्व.

मोठा सर्प जसा वारुळांत शिरतो तसा कर्णाने सोडलेला बाण अर्जुनाच्या छातींत घुसला. येथे ' उपमा ' अलंकार झाला. याशिवाय तो बाण ' गरधरवरसा ' ' पविसा ' ' रविसा ' ' स्मरारिसायकसा ' होता. येथे चार उपमा आहेत. म्हणजे एकंदर पांच उपमा झाल्या. याशिवाय खालील चार शब्दालंकार या आर्येत आहेतः—

(१) शर–गर–घर–वर यांत ' र ' हें अक्षर मागील ' अ ' या स्वरा सह चार वेळा आवृत्त झाल्यामुळे ' वृत्त्यनुप्रास ' झाला.

(२) ' विसा ' हीं दोन अक्षरें एकवार आवृत्त झाल्यामुळे ' छेकानुप्रास ' साधला.

(३) तीन अक्षरी अन्त्ययमक आर्येत आहे.

(४) ' र ' हें व्यंजन अनेकवार आवृत्त झाल्यामुळे वृत्त्यनुप्रास.

अशा प्रकारें पांच उपमा व चार शब्दालंकार असे एकंदर नऊ अलंकार झाले. हे सारे अलंकार स्वतंत्रपणें आले आहेत. कोणताहि एक अलंकार नाहीसा झाला तरी इतर सारे अबाधित राहतात. म्हणून येथे शब्दार्थालंकरांची संसृष्टि झाली.

(३) वाटे सूक्तिश्रवणें मस्तक वाल्मीकिनेहि डोलविला ।
प्रभुने, भुलवाया मन, वामन हा वेणुसाचि बोलविला ॥
—मोरोपंत, सन्मणिमाला

या आर्येत यमक, छेकानुप्रास व वृत्त्यनुप्रास हे शब्दालंकार आणि उत्प्रेक्षा व उपमा हे अर्थालंकार स्वतंत्रपणें आले आहेत. म्हणून येथे शब्दार्थालंकार संसृष्टि झाली.

## संकर

संसृष्टि तिलतंडुलवत् असते, तर **संकर नीरक्षीरवत् असतो** ज्याप्रमाणे दूध आणि पाणी एकत्र मिसळलें असतां ओळखता येतें पण वेगवेगळें राहूं शकत नाहीत, त्याप्रमाणे संकरांतील सर्व अलंकारांचा संमिश्र आस्वाद घेता येतो व ते ओळखतां येतात; पण परस्परनिरपेक्ष राहूं शकत नाहीत. म्हणून **ज्या पद्यांत अनेक अलंकार एकमेकांशी असे जखडलेले असतात की ओळखतां आले तरी निरपेक्षपणें वेगळे होऊं शकत नाहीत, अशा ठिकाणी संकर असतो–**

संकराचे तीन प्रकार आहेत–(१) अंगांगिभाव संकर; (२) संदेहसंकर; आणि (३) एकपदाश्रित संकर.

**(१) अंगांगिभाव संकर--जेथे एक अलंकार प्रधान असतो व इतर अलंकार गौण असतात मात्र ते सर्व परस्परांची शोभा वाढविण्यास कारणीभूत होतात तेथे अंगांगिभाव संकर होतो.**

उदाहरणें—

( १ ) निर्वीर भूमितल पाहुनि अंधकार
चाले मदांध–गज हर्षभरें पुढार,
पूर्वेस त्यास मृगराज मृगांक भेटे,
हें अंधकार–गज–रक्तच लाल वाटे !

—वा. वा. खरे.

या श्लोकांत चंद्रोदयाचें वर्णन आहे. यांतील पहिल्या तीन ओळींत अंधकार हाच गज आहे आणि मृगांक ( चंद्र ) हाच मृगराज ( सिंह ) आहे, असें अभेदानें वर्णन केल्यामुळे रूपक अलंकार झाला आहे. चौथ्या ओळींत ' हें लाल अंधकार–गज–रक्तच वाटे ! ' अशी कल्पना केल्यामुळे उत्प्रेक्षा अलंकार झाला आहे. मात्र हा अलंकार स्वतंत्र नाही. पहिल्या तीन ओळींतील रूपकावर हा आधारलेला आहे व यां दोहोंनी परस्परांची शोभा वाढविली आहे. म्हणून या श्लोकात ' अंगांगिभाव संकर ' झाला.

(२) विंध्य तसा तो निजला; वदनदरीमाजि निबिड अंधार ।
फार भयंकर भासे, पातालाचेंच काय तें दार ॥

—मोरोपंत.

निद्रिस्त कुंभकर्णाच्या विशाल देहाचें काव्यमय वर्णन या आर्येंत केलेलें आहे. ' विंध्य तसा तो निजला ' ही उपमा असून हा या आर्येंतील प्रधान अलंकार आहे. पुढील ' वदन–दरी ' व ' पातालाचेंच काय तें दार ' हे अनुक्रमें रूपक व उत्प्रेक्षा अलंकार असून ते प्रारंभीं आलेल्या उपमेवर अवलंबून आहेत. ती उपमा काढून टाकली तर हे अलंकार स्वतंत्रपणें राहत नाहीत. या आर्येंत उपमा या प्रधान अलंकाराची शोभा वाढवण्यासाठी पुढील दोन अलंकार योजले आहेत. म्हणून येथे अंगांगिभाव संकर झाला.

**(२) संदेहसंकर—जेव्हा एकाच पद्यांत अनेक अलंकारांची शक्यता असते; मात्र त्यांपैकी येथे हाच अलंकार आहे असें सांगावयास साधक प्रमाण नसतें, आणि हा अलंकार नाही असें सांगावयास बाधक प्रमाणहि नसतें, अशा वेळीं कोणत्याच अलंकाराबद्दल निश्चय न झाल्यामुळे संदेहसंकर होतो.**

उदाहरणें—

१. रत्नाकर हा सागर, गंभीर तसाच निर्मलच्छाय ।
परि तृष्णाकुल पांथा पाठवि विन्मुख, नसे नवल काय ?

—भाषांतर.

येथे 'अप्रस्तुतप्रशंसा' आणि 'समासोक्ति' हे दोन्हीहि अलंकार संभवतात. सागराचें निमित्त करून हें मनुष्याला उद्देशून म्हटलें असेल तर अप्रस्तुतप्रशंसा होईल. सागरवर्णन प्रस्तुत मानलें तर समासोक्ति होईल. यांपैकी एकच मानावा असें म्हणावयास साधक प्रमाण नाही; किंवा दुसरा मानूं नये असें म्हणावयास बाधक प्रमाण नाही. म्हणून येथे अप्रस्तुतप्रशंसा व समासोक्ति यांचा संदेहसंकर झाला.

२. शशिवदना, सितसरसिजनयना, सितकुंददंतपंक्ति अशी ॥
गगन-जल-स्थलसंभवहृद्याकारा कलाच ही विधिची ॥

—भाषांतर

येथे रूपक व उपमा यांचा संदेहसंकर आहे. स्त्री ही ब्रह्मदेवाची अपूर्व कलाकृति आहे. चंद्र हेंच तिचें मुख, नीलकमल हेंच तिचे नेत्र व कुंदकळ्या हेच तिचे दंत होत. अशा प्रकारें गगनांतील चंद्र, पाण्यातील कमळ व जमिनीवरील कुंद यांनी तिची काया घडवल्यामुळे ती या सर्वच ठिकाणीं हृद्य आहे. अशा प्रकारें येथे रूपक आहे. उलट चंद्रासारखें मुख, नीलकमलासारखे डोळे व कुंदासारखे दांत असल्याने तिचा आकार गगन, जल व स्थल या त्रिलोकांत हृद्य झालेला आहे असें म्हटलें तर उपमा होईल.

यांपैकी एक घ्यावयास किंवा दुसरें टाकावयास साधक किंवा बाधक कारण नाही म्हणून येथे उपमा व रूपक यांचा संदेहसंकर झाला.

३. नयनानंददायी हें इंदुबिंब मनोरम ।
अजून परि रुद्धाश लोपलें हें नसे तम ॥

—भाषांतर

या पद्यात किती अलंकार असू शकतात हे पाहा—

१. चंद्रबिंब उगवलें असें सांगून ही विलासाला अनुकूल वेळ आहे असें बोलणाऱ्यास सुचवावयाचें असेल तर **पर्यायोक्त.**

किंवा २. इंदुबिंब हे प्रियामुखाला अनुलक्षून म्हटलें असेल तर मुखाचें चंद्रत्वाने अध्यवसान झाल्यामुळे **अतिशयोक्ति;**

किंवा ३. हे 'मुख' असें निर्देशून इंदुबिंब म्हटलें असेल तर मुखावर इंदुबिंबाचा आरोप झाल्यामुळे **रूपक;**

किंवा ४. हें मुख व इंदुबिंब असा अभिप्राय असून मुख प्रकृत असेल तर **दीपक;**

किंवा ५. त्यांतच दोन्हीहि प्रकृत असतील तर **तुल्ययोगिता;**

किंवा ६. चंद्राचें वर्णन प्रस्तुत असून तें श्लिष्ट शब्दांनी केलेलें असल्याने **समासोक्ति;** (तम=अंधार, रुसवा. रुद्धाश= ज्यानें आशा म्ह. दिशा व्यापल्या आहेत; किंवा आशा=सुखाशा)

किंवा ७. चंद्राचें वर्णन अप्रस्तुत असून मुख प्रस्तुत असेल तर **अप्रस्तुतप्रशंसा;**

अशा प्रकारें अनेक अलंकार सारख्याच तऱ्हेने शक्य होतात म्हणून येथे अनेक अलंकारांचा संदेहसंकर आहे.

संदेहसंकरासंबंधीं एक गोष्ट नीट लक्षांत ठेवली पाहिजे. अनेक अलंकार संभवत असतांना त्यांपैकी अमुक घ्यावा याकरिता साधक प्रमाण नसलें

किंवा अमुक घेऊं नये याकरिता बाधक प्रमाण नसलें तरच संदेहसंकर होतो. पण असें प्रमाण आढळलें तर संदेहसंकर होत नाही. साधक प्रमाण व बाधक प्रमाण यांची कल्पना पुढील उदाहरणांवरून येईल—

उदा. (१) 'तुझ्या या मुखचंद्राला शोभे हास्यप्रभा कशी' या ओळींत 'मुखचंद्र' या समासांत रूपक घ्यावें की उपमा मानावी असा संशय येण्याचें कारण नाही. हास्यप्रभा ही मुखाशींच संबद्ध असल्याने या समासांत मुख या उपमेयाला प्राधान्य आहे म्हणून येथे हास्यद्युति हें उपमेचें साधक प्रमाण होय.

(२) 'तुझा मुखचंद्र असतां या दुसऱ्या चंद्राला उगवावेसें तरी कसें वाटतें?' —येथे दुसरा चंद्र (आकाशांतील) असें म्हटल्यामुळे 'मुखचंद्र' यांतील उपमानाला प्राधान्य येतें म्हणून येथे 'हा दुसरा चंद्र' हें रूपकाचें साधक प्रमाण होय.

(३) 'लक्ष्मी आलिंगिते नित्य राजनारायणा तुला' या वाक्यांत 'राजनारायण' येथे रूपक घ्यावें की उपमा हा संशय आला असतां 'लक्ष्मी आलिंगिते' हें वचन उपमेला बाधक होतें. कारण उपमा घेतली तर नारायणासारख्या राजाला केवळ सारखेपणावरून लक्ष्मी आलिंगन देते असा इष्ट नसलेला अर्थ निघेल. म्हणून हें वचन उपमेला बाधक आहे.

४. 'नूपुराच्या ध्वनीने रमणीय असें दुर्गेचें चरणकमल तुमचें रक्षण करो;' येथ चरणकमल हें रूपक मानतां येणार नाही. कारण नूपुराने रमणीय हा प्रयोग कमलाशी संबद्ध होत नसल्याने तो रूपकाला बाधक होईल. अशा प्रकारें संदेहाचे वेळीं साधकबाधक प्रमाणांनी निश्चय करावा व तो होत नसेल तेव्हाच संदेहसंकर मानावा.

**(३) एकपदाश्रित संकर—जेव्हा शब्दालंकार आणि अर्थालंकार दोन्हीहि एकाच पदामध्ये स्पष्टपणें आढळतात तेव्हा एकपदाश्रित संकर होतो—**

उदा.—

( १ ) शरचित वृषवपु **केसरनिकरवृतकदंबकुसुमसें** गमलें ।
भरतकुळप्रवरांचे तेथे क्षण नयनमधुपयुग रमलें ॥
—मोरोपंत, कर्णपर्व.

' केसरनिकरवृतकदंबकुसुमसें ' या सामासिक पदांत **उपमा** ( परागसमुदायातें वेष्टित अशा कदंबपुष्पाप्रमाणे ) अलंकार असून ' क ' ' स ' वर्णांच्या आवृत्तिमुळे **अनुप्रास** साधला आहे. म्हणून हें एकपदाश्रित संकराचें उदाहरण होय.

( २ ) होतां न्यून सहस्रीं एक **नयन–नीरजें** यथाविधिनें ।
पूजन करितां, दिधलें पूर्वी जें काय तुज दयानिधिनें ॥
—मोरोपंत, अनुशासनपर्व.

या आर्येतील ' नयन–नीरज ' या सामासिक पदांत ' न ' मुळे अनुप्रास असून ' नयनरूपी नीरज ' हें रूपक आहे. म्हणून येथेहि एकपदाश्रित संकर झाला.

## संसृष्टि व संकर यांचीं अभ्यासार्थ उदाहरणें—

(१) मागें भूमातेला तिचीं पवित्र लेकरें रक्तचंदनाचा नुसता सडा टाकून शोभवीत असत, आता तीं जों जों शहाणीं होत चाललीं तों तों तिला वारंवार रुधिरस्नानाची महापर्वणी लाभते !

——विष्णुशास्त्री चिपळूणकर, ' आमच्या देशाची स्थिति. '

(२) शास्त्रांची अटक झुगारून सिंधूनदी अटकपार होणं हें एकवेळ सोपं आहे, बाष्पशक्तीच्या जोरावर महासागराच्या तोंडीचे काळा समुद्र, पिवळा समुद्र किंवा तांबडा समुद्र ओलांडणें हें तर त्यापेक्षाहि सोपं आहे, पण मानससरोवरांत उत्पन्न झालेल्या, डोळ्यांतून बाहेर येणाऱ्या आणि गालांवरच्या गुलाबी समुद्राला मिळणाऱ्या या टीचभर गंगायमुना तुडवून जाणं, हें अजून कोणाहि पुरुषाला साध्य झालं नाही !

——गडकरी, एकच प्याला.

(३) अद्भुत कर्णशरासनघन जनितामितविशुद्धशरधारा ।
तारवितो, कांपविती, निर्मिति तटिनी जपासुमाकारा ॥
—मोरोपंत, कर्णपर्व.

(४) जगद्गुरुमहेश्वरप्रभुशिरीं जिचें नांदणें,
तिच्या जळमळें तुळे न शरदिंदुचें चांदणें,
प्रजा हरिहरा अशी यदुदरीं अनेका; कवी
मिळोनि म्हणतील का ' जशि सुधा तशी काकवी ? ' ॥
—मोरोपंत, केकावलि.

(५) नयनाग्निकील नीलग्रीवाचा मीन केतुवरि जैसा ॥
अरिवरि सायक नायक जाय कराया क्षय त्वरित तैसा ॥
—मोरोपंत, कर्णपर्व.

(६) कर्ण म्हणे गुणवद्गुण जाणे गुणवंत, अगुण नेणेची ।
प्रसवे तीच अभिज्ञा, शल्या तैसी न वांझ वेणेची ॥
—मोरोपंत, कर्णपर्व.

(७) संसारध्वांताच्या विध्वंसी हंस कंसरिपु मजला ।
फुल्लेंदीवरलोचन रक्षो जगदार्ति हरणि जो सजला ॥

(८) मोठे संशयशीळ केश नयन अत्यंतही पावले
अंतर्वक्र सुनिर्मळ द्विजगणीं जे सर्वदा सेविलें ।
मुक्तांचा सतताधिवास हृदयीं सद्वृत्तता ही स्तनीं
ऐसें शांत शरीर ताप करितें कां सांग वो कामिनी ।
—वामनपंडित, शृंगारशतक.

# परिशिष्ट १.



## आणखी कांही अलंकार

मम्मटाच्या ग्रंथांत नसलेले पण उद्भट, रुय्यक, अप्पय्यदीक्षित इत्यादि आलंकारिकांनी मानलेले कांही अलंकार पुढ दिले आहेत.

### १. रसवत्

जेव्हा पद्यामध्ये एक रस दुसऱ्या रसाच्या किंवा भावाच्या अंगत्वाने येतो तेव्हा रसवत् अलंकार होतो. उदा.—

" हंससि असा कां, कितिक दिसांनी दर्शन तव मज झालें ।
प्रवास तुज आवडे कठोरा, दूर मला तूं केलें ॥
पण आता तूं जाशील कसा तुडवुनि मम प्रीतीस "।
वदुनी ऐसें प्रियतमकंठीं घाली बाहूपाश ॥
तोंच जाग ये, रिक्त बाहुचा विळखा दिसे तियेस
स्वप्नच सारें ! जाणवतां हें रमणी होय हताश ॥

—भाषांतर

येथे करुणरस प्रधान असून विप्रलंभ त्याच्या अंगत्वाने आला आहे म्हणून रसवत् अलंकार.

### २. प्रेयस्

प्रेयस् म्हणजे रसिकांना अत्यंत प्रिय असलेले. जेव्हा एखादा भाव दुसऱ्या वस्तूच्या अंगत्वाने दिसून येतो तेव्हा प्रेयस् अलंकार होतो.

उदा.—

सुख—गीत नृत्य तेथे, मजलाही तोचि एक थारा हो !
स्मरला स्मरहर, भरला कंठ, न वदवेचि ते कथा राहो ॥

—मोरोपंत, सभापर्व, अ. १

कुबेराच्या समृद्धिपूर्ण सभेचें वर्णन करीत असतांना नारदाला शंकराचें स्मरण झालें व भक्तिभावानें नारदाचा कंठ दाटून आला. वरील आर्येच्या द्वितीयार्धांत भक्तजनांचें ईश्वरावरील उत्कट प्रेम सुचविलें आहे, म्हणून प्रेय किंवा भाव हा अलंकार झाला.

## ३. समाहित

रस, भाव अगर त्यांचे आभास हे दुसरा कोणताहि अनुभाव, भाव अगर आभास इत्यादि उत्पन्न न करतां शांत होतात तेव्हा समाहित अलंकार होतो.

उदाहरण —

'माझें कोण ?' पुसें, तिने चढविला स्कंधीं निर्जी मत्कर
'तूझें कोण ?' म्हणे, तधीं मज तिने आलिंगिलें सत्वर ।
'माझ्याशी नच बोलशी, तर तुझा मी नाहि जा !' बोललों
तों अश्रू गळती तिचे टपटपां !– मी फार पस्तावलों ॥

—केशवसुत.

## ४. भावोदय, भावसंधि व भावशबलता.

'भावा'ची पूर्ण वाढ नव्हे तर नुसता उदय होऊं लागणें याला **भावोदय** म्हणावयाचें. दोन विरुद्ध भाव एके ठिकाणीं होऊन स्पर्धेनें वाढूं पाहतात तेव्हा **भावसंधि** नामक अलंकार होतो; पुष्कळ भाव क्रमानें एकमेकांची जागा घेतात म्हणजेच जेथे एकामागे एक असे अनेक भाव दिसतात तेथे **भावशबलता** अलंकार होतो.

भावोदय–उदा.—

कोण तुम्ही ? कवणाचे कोठुनि येथे कां आला हो ? ।
काय निमित्तें दिधला मजला हा निज दर्शन लाहो ? ॥
संभवला कवणाचे वंशीं सांगा हो ! अकलंकीं ? ।
उभे असा कां ? भागतसां हो ! या बैसा पर्यंकीं ॥

येथे नलाविषयी दमयंतीच्या मनांतील उत्कंठारूप भावाचा उदय असून तो शृंगाराचें अंग आहे, म्हणून भावोदय अलंकार झाला.

भावसंधि—उदा.—

घेऊनि तलवार बळी । गेला शेजेजवळी ।
प्रेमाची ती पुतळी । भंगाया सज्जला
बघतां ती मूर्ति परी । धडकी भरली तदुदरीं ।
एक चित्त जाय रणीं । एक न सोडी रमणी ।
एका प्रिय कीर्ति जनीं । एका स्त्री प्रेमला ॥

--- विनायक

भावशबलता ---उदा.---

चंद्राचा वंश कोठे ? दुरित कृति कुठे ? काय भेटे पुन्हा ती ।
दोषांच्या शांतिला तें श्रुत, वदनि कशी कोप येतांहि कांति ॥
ज्ञाते ते काय मातें वदतिल सुकृती स्वप्निंही दुर्लभा ते ।
चित्ता तूं स्वस्थ होई कवण तरुण त्या प्राशि बिंबाधरातें ॥

येथे तर्क, उत्कंठा, विचार, स्मरण, भय, दैन्य, धैर्य व चिंता हे विकार मिश्र झाल्याने येथे भावशबल अलंकार झाला.

## ५. परिणाम

उपमान हें उपमानरूपाने अन्वर्थक न होतां उपमेयरूपाने अन्वर्थक होतें तेव्हा परिणामअलंकार होतो.

सदैव नमितां जरी पद ललाट केलें किणें,
नसे इतर तारिता मज भवत्पदाब्जाविणें; ।
नतां करुनि मुक्तही म्हणसि 'मी बुडालों रिणें'।
अशा तुज न जो भजे मनुज धिक तयाचें जिणें ! ॥

— मोरोपंत, केकावलि

या केकेंत परमेश्वराच्या 'पदा' ला 'अब्ज' म्हटलें आहे. येथे रूपक आहे. 'तुमच्या चरणकमलावाचून मला कोणीहि तारणार नाही' असा

द्वितीयचरणाचा अर्थ आहे. वस्तुतः 'अब्ज' हें उपमान दुसऱ्यास तारण्यास असमर्थ होय. परंतु 'पद' या उपमेयरूपाने तारण्याची क्रिया तें करूं शकतें असा अर्थ अभिप्रेत असल्यामुळे 'परिणाम' अलंकार झाला.

## ६. लोकोक्ति

प्रचारांत असलेल्या म्हणीचा जेव्हा काव्यांत उपयोग केला जातो.

(१) मीहि मिळविन माझा सूर
लाडें लाडें जे कमसूर,
करुनी टाकूं त्याचा चूर
'गुळाचेच गणपती' जगीं जे त्यां वेशीवर टांगूं ॥

— गोविंदाग्रज, 'घुबडास'

सूर मिळविणें, गुळाचे गणपती व वेशीवर टांगणें या वाक्प्रचारांचा या कडव्यांत उपयोग केलेला आहे.

(२) यानंतर परत आपल्या गांवीं आल्यावर मी मुंबईच्या दीपोत्सवाचें खोटेंनाटें वर्णन आपल्या **बगलेंतून काढून** व त्यास **तिखटमीठ लावून** मित्रमंडळींसमोर कित्येक वेळा विस्ताराने मांडीत आलों आहे.

— श्री. कृ. कोल्हटकर, सुदाम्याचे पोहे.

(३) पायांतली वहाण पायांतच ठेवणारा व्यवहारी मनुष्य मी !

— गडकरी, भावबंधन.

## ७. चेतनगुणोक्ति

जेव्हा अचेतन पदार्थांवर चेतनत्वाचे धर्म आरोपित केले असतात ( Personification ) तेव्हा हा अलंकार होतो. यास 'चेतनोक्ति' असेंहि म्हणतात.

युगयुगें घेउनी लोळण पायावरी
गिरिकडे कशाची सागर विनती करी !
गंभीर न बघतो वळुनि मुळी हा गिरी
दुःख गिळुनिया अंतरिं सिंधू फेसाळे परि वरी,
हासतो निराश जणु वरिवरी !

—अनंत काणेकर, ‘ चांदरातीं खाडीच्या किनाऱ्यावर—’

गिरि व सागर या निर्जीव वस्तूंचें आचरण मानवांप्रमाणे घडत असल्याचें येथे वर्णन आहे. गांभीर्य, दुःख, निराशा वगैरे मनोभाव अचेतन पदार्थांच्या ठायीं असून ते पदार्थ मानवांप्रमाणे आचरण करतात असें वर्णन वरील कडव्यांत असल्यामुळें ‘ चेतनोक्ति ’ झाली.

## ८. अनुज्ञा

अनिष्ट गोष्टीमध्येंहि गुण दिसल्यानें तिची अभ्यर्थना करणें.

बरा कुणबी केलों । नाहीं तरि दंभें असतों मेलों ॥ १ ॥
भलें केलें देवराया । नाचे तुका लागे पायां ॥ २ ॥
विद्या असती कांहीं । तरी पडतों अपायीं ॥ ३ ॥
सेवा चुकतों संतांची । नागवण हे फुकाची ॥ ४ ॥ —तुकाराम.

कुणब्याची जात ही हीन मानली जाते, पण कुणबीपणा हा दोष नसून हितप्रद असा गुण आहे असें सांगितलें. तसेंच विद्येचा अभाव असल्यामुळे मी संतसेवा करतों. विद्या असणें हा दोष व विद्येचा अभाव हा गुण-स्वरूप दर्शविल्यामुळे येथेंहि ‘ अनुज्ञा ’ अलंकार झाला.

लहानपण देगा देवा । मुंगी साखरेचा रवा ।
ऐरावत रत्न थोर । त्यासी अंकुशाचा मार ।
ज्याचे अंगीं मोठेपण । तया यातना कठिण ।
तुका म्हणे बरवें जाण । व्हावें लहानाहूनि लहान ।

—तुकाराम.

### ९. अत्युक्ति

जेथे एखाद्या गुणाचें अद्भुत व असंभवनीय प्रकारें वर्णन के असतें. उदा. तुझ्या प्रतापाने आटलेले सातहि समुद्र शत्रुस्त्रियांच्या अश्रु पूराने भरले.

भूमि विदारीन शरें, तेजें शोषीन वारिराशि, खरी ।
गोष्टि तुला कथितों, मी पिष्ट करिन कौरवेश्वरा ! शिखरी ॥
—मोरोपंत, कर्णपर्व.

. बाणाने भूमि दुभंगून टाकीन, तेजाच्या योगें समुद्र सुकवीन, पर्वताचे पीठ करीन, असे कर्णाने दुर्योधनापाशी उद्गार काढले. येथे कर्णाने आपल्य शौर्य, तेज वगैरे गुणांचें असंभवनीय व अद्भुत वर्णन केलें असल्यामु ' अत्युक्ति ' अलंकार झाला.

सर्वस्वाचा नाश जयाने वर्णु तयातें अता किती ।
व्यास वर्णितां थकेल यातें मग मी कोठे अल्पमति ॥
---गोविंदाग्रज, वाग्वैजयंती, पानपतचा फटका.

---

## परिशिष्ट २ रें



### कांही नवे अलंकार

श्री. रा. अ. काळेले यांनी आधुनिक मराठी कवितेंत आढळणा कांही नवे अलंकार दिलेले आहेत. विद्यार्थ्यांना त्यांची कल्पना यावी म्हणू त्यांपैकी निवडक अलंकार येथे दिले आहेत----

### १. अविषय

अविषयाशी विषयास जोडणें यास अविषय म्हणावें ( इंग्रजींती Broken Metaphor हा अलंकार अशाच तऱ्हेने होतो).

१. ती उभी तुष्टशी
हिरव्या पिवळया आठवणींना चघळीत।
—पु. शि. रेगे.

१. सचेतनांचा हुरूप शीतल.
— मर्ढेकर

## २. अनुनाद

विवक्षित अर्थाचें नादद्वारा अनुकरण करणें यास अनुनाद म्हणावें.

(१) ही भरली घागर तुझ्या शिरावर बाळे !
तूं उभी ! लागले कुठे कुठे तव डोळे ?
ही खडखड खडखड करिते गाडी दूर
हें घडघड उडतें इकडे तवही ऊर
——लक्ष्मीबाई टिळक, ‘ मी तुझी मावशी
तुला न्यायला आलें !’

(२) वायुने पदर फडफडे, ऊर घडधडे, केस भुरभुरती।
रसरसित लालसर ओठ कसे थरथरती ॥
——संजीव, ‘ ही नार रूपसुंदरी ’

( ३ ) खड्गांचा खणखणाट त्यामधि शर सणसण येती।
——सावरकर.

## ३. विपर्यय

एका क्रमांत आलेले वर्ण लगतच उलट क्रमांत योजणें, किंवा विभक्ति बदलून उलटसुलट वाक्यें योजणें किंवा एकदा योजलेल्या शब्दांतील वर्ण कमीअधिक करून त्यांचा दुसरा शब्द लगत योजणें किंवा प्रसिद्ध वचनांत थोडा फेरफार करून मूळ वचनाशी जुळतेंच पण विपर्यस्त अर्थाचें वचन तयार करणें यास विपर्यय म्हणावें.

उदा. -

(१) **प्रभाकर**---लतिके, हें तुझें प्रेमाचें बोलणें नव्हे.

**लतिका**--हें माझें बोलण्याचें प्रेम आहे.

---गडकरी, भावबंधन – अं. १ प्र. २

(२) शेवटीं आम्ही एकदांची मुंबई गाठली. आम्ही मुंबई गाठली असें म्हणण्यापेक्षा मुंबईने आम्हाला गाठलें असें म्हणणेंच विशेष खरें होईल.

– श्री. कृ. को., सुदाम्याचे पोहे

(३) जो फकीर झाला त्याला फिकीर कशाची ?

## ४. अंशभक्ति

अंशवाची शब्दाने पूर्णाचा अर्थ लक्षित करणें यास अंशभक्ति म्हणावें -- उदा.

त्वरित पूर्ववत् समर चाललें
हले भरवसा विजयाचा ।
दाढी शेंडी एक जाहली
खेळ शहाच्या दैवाचा । —गोविंदाग्रज.

## ५. निपात

एखाद्या वस्तूची श्रेष्ठता सांगूं लागून एकदम निकृष्ट गुणाचा हास्य-जनक उल्लेख करणें, यास निपात म्हणावे.

उदा.— १. बंब पुकारिन आगीचा मी
ज्वलंत या--आगूकाडी खातर.

---मर्ढेकर

२. ते आम्ही---परवाङ्मयांतिल करूं
चोरून भाषांतरें

—केशवकुमार.

## ६ श्रेय:संधि

झालेल्या वाईटाशी कांही चांगलें चतुरतेने सांधणें यास श्रेय:संधि म्हणावें.

उदाहरणें — १. चुंबणार तुला, तोंचि मुख हालविलेंच की ।
आणि बिंबाधराजागीं चुंबिलें हनुलाच मी ॥
फसलों जरि मी ऐसा धीर ना तरि सोडतों
'स्वर्ग दोनच बोटें हा उरला' मज वाटतो.

— अनंत काणेकर.

२. आणि अचानक आज कळे की
तुझा दुज्याशी विवाह झाला
उपहासुनि मी मनास म्हटलें
कवितेसाठी विषय मिळाला. — माडगूळकर

## ७. समान्तिक

परस्परतुल्य एककालीन घटना जोडीने सांगणें, यास समांतिक म्हणावें----उदा----

(१) आकाशीच्या अंतराळीं तारकांना तेज चढे ।
तुझी माझी प्रीत जडे ॥
परसांतल्या फुलांचा वास कांनोकोनी खुले ।
तुझा माझा श्वास मिळे ॥ —अनिल.

## ८. सह्य

अप्राप्य अशी परीप्सित वस्तु जर आपत्तिकारक निमित्ताने मिळणार असेल तर ती आपत्ति देखील पत्करणें यास सह्य म्हणावें---उदा.----

ये रागवावयाही
परि येइ येइ वेगें ॥

—यशवंत, आई.

———

## परिशिष्ट ३.

### कांही इंग्रजी अलंकार

संस्कृत किंवा मराठीतील अलंकारांशीं बऱ्याच अंशीं जुळणारे असे इंग्रजीतील कांही अलंकार--

अनुप्रास--alliteration.
आक्षेप—Paralepsis, Prolepsis.
उपमा— Simile.
रूपक—Metaphor.
चेतनगुणोक्ति—Personification
लक्षणा— { Metonymy<br>Psyneidoche.
सार—Climax, anticlimax or Bathos.
अतिशयोक्ति—Exaggeration or Hyperbole.
विरोध—Antithesis, epigram.
शब्दश्लेष—Pun, Paronomasia.
भाविक—Prosopopoeia.
पर्यायोक्त—Curcumlocution or Periphrasis.
यमक—Rhyme.
उत्प्रेक्षा—Poetic fancy; poetic probability.
दृष्टान्त—example; parable.
अर्थान्तरन्यास—Corroboration, Poetic generalization, maxims.
व्याजस्तुति—Irony.
अपन्हुति—Concealment.
अप्रस्तुतप्रशंसा ( अन्योक्ति )—Indirect description.
स्वभावोक्ति—Natural description.
अनुनाद—Onomatopoeia.
रूपकातिशयोक्ति—Far-fetched Metaphor.
लोकोक्ति—Colloquialism.
विरोध—Antithesis or Paradox. ( परांजपे के शास्त्री )
अविषय—Broken Metaphor.